सामाजिक कादंबरी नं. ९

# गणपतराव.

## ( पूर्वार्ध ).

रचणार:

हरि नारायण आपटे.

आवृत्ति दुसरी

पुणें पेठ भांबुर्डा, घ. नं. ९३६।२ येथें
आर्यभूषण छापखान्यांत अनंत विनायक पटवर्धन
यांनी छापून प्रसिद्ध केलें.

१९३०.

# प्रकाशकाचे दोन शब्द.

## आवृत्ति पहिली.

कै० हरिभाऊंच्या निधनानंतर अपूर्ण स्थितींत प्रसिद्ध होणारी त्यांची ही दुसरी कादंबरी आहे. ही कादंबरी 'मनोरंजन व निबंध-चंद्रिका' या मासिक पुस्तकांत खंडशः छापली होती. सदर मासिक सन १८९२ मध्यें बंद झाल्यामुळें ती अपुरी राहून गेली. परंतु कादंबरी अपूर्ण असली तरी संविधानकावरून गोष्टीचें पर्यवसान कसें होईल हें कोणासही सहज समजण्यासारखें आहे. हरिभाऊंच्या इतर कृतींप्रमाणें 'गणपतराव' ही कादंबरीही महाराष्ट्र वाचकांस प्रिय होईल यांत शंका नाहीं.

आर्यभूषण प्रेस,
पुणें २७।११।१९

---

## आवृत्ति दुसरी.

कै० हरिभाऊ आपटे यांनीं आपल्या शोचनीय निधनापूर्वीं एक मृत्युपत्र करून त्यांतील एका कलमान्वयें आपलीं पुस्तकें, लेख वगैरे वाङ्मयसंपत्तीची मालकी पुणें **आर्यभूषण** छापखान्यामार्फत सर्व्हंटस् ऑफ इंडियासोसायटीकडे कांहीं शर्तींवर दिलेली आहे. कै० हरिभाऊ यांचें प्रेम **आर्यभूषण** व **ज्ञानप्रकाश** या छापखान्यांवर आजन्म होतें व त्याचें मूर्तस्वरूप वरील मार्गानें त्यांनीं कायमचें जाहीर केलें आहे. हरिभाऊ आपटे यांचे पश्चात् त्यांच्या पुस्तकरूपानें प्रसिद्ध न झालेल्या कादंबऱ्या इतर कादंबऱ्यांप्रमाणेंच आर्यभूषण छापखान्यानें छापून

महाराष्ट्र वाचकांस क्रमाक्रमानें सादर केल्या होत्या. प्रस्तुतची कादंबरी सन १९१९ च्या अखेरीस प्रथम पुस्तकरूपानें प्रसिद्ध केली होती. या कादंबरीची पहिली आवृत्ति खलास होण्याचे सुमारास "**आर्य-भूषण व ज्ञानप्रकाश**" छापखाना असलेल्या किबे वाड्यास ता. २५ मे सन १९२६ रोजीं आग लागली व त्या अग्निप्रलयांत छापखान्याच्या सामानाबरोबर छापखान्यानें छापून ठेवलेल्या पुस्तकांचा संग्रहही जळून खाक झाला. हा प्रसंग ओढवल्याबरोबर सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटीच्या सर्व सभासदांपुढें एक मोठाच प्रश्न येऊन पडला होता. परंतु सोसायटीनें स्थापनेपासून केलेल्या लोकसेवेकडे नजर देऊन हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रांतांतील दानशूर हिंदपुत्रांनीं व हिंदी स्त्रियांनीं सोसायटीस मदत करण्यास तत्परता दाखविली व त्यामुळें सोसायटीस आपले छापखानें पूर्ववत्प्रमाणें चालविण्याचा उत्साह वाटून तिच्या चालकांनीं आपलें काम दुप्पट उमेदीनें हातीं घेतलें. या कामांपैकीं कै. हरिभाऊ आपटे यांच्या पुस्तकांच्या पुनर्मुद्रणाचें काम हें एक महत्त्वाचें काम होतें. कै. हरिभाऊ यांची वाङ्मयसंपत्ति फारच मोठी असल्यानें त्यांच्या सर्व पुस्तकांचें पुनर्मुद्रण करण्याचें काम बऱ्याच जबाबदारीचें व खर्चाचें होतें. हरिभाऊ यांच्या पुस्तकांपैकीं जीं पुस्तकं बाजारांत मुळींच नव्हतीं किंवा ज्या पुस्तकांस विशेष मागणी असते अशीं पुस्तकें क्रमाक्रमानें पुणें व मुंबई येथील सोसायटीच्या छापखान्यांतून छापण्यास सुरुवात करण्यांत आली. या कादंबरीचा नंबर खालीं लागावा हें साहाजिकच असल्यामुळें या कादंबरीच्या प्रकाशनाचें काम आजवर मागें पडलें याबद्दल वाचक आम्हांस क्षमा करतील अशी आम्हांस खात्री आहे. हरिभाऊंच्या अन्य कादंबऱ्याप्रमाणें या कादंबरीसही लोकाश्रय महाराष्ट्र वाचकांकडून भरपूर मिळेल अशी आमची आशा आहे.

आर्यभूषण छापखाना,
तारीख २।१०।३०

**प्रकाशक.**

# अनुक्रमणिका.

## हरि नारायण आपटे.



जन्म– ता. ८।३।१८६४. ] [ मृत्यु– ता. ३।३।१९१९

*

# हरि नारायण आपटे यांचें

# अल्प चरित्र

## वि. जी. नाडकर्णी यांनीं लिहिलेलें.

दृष्टीसमोर असलेल्या माणसाचें अंतरंग शोधणारी, ओष्ठ संभाषणासाठीं आतूर, मुखावर स्मिताची छटा, उंच आणि विस्तीर्ण भालप्रदेश, वाटोळा चेहरा, आणि साधारण स्थूल–फार उंच नव्हे, व ठेंगूही नव्हे, अशी शरीरयष्टि, अशी त्यांची बाह्यरूपाकृति होती. प्रिय कन्येचा वियोग झाला त्या दिवसापासून त्यांच्या चर्येवरील स्मिताची छटा मावळली, आणि त्या ठिकाणीं विरक्तीनें पसरलेली गंभीरपणाची छाया दृग्गोचर होऊं लागली. ह्या दारुण कालाघाताचा त्यांच्या देहावरही परिणाम झाला. जरा जोरानें त्यांच्या देहावर आपला पगडा बसवूं लागली, आणि पन्नाशीच्या घरांत पोंचण्यापूर्वींच ते पंचावन्न साठ वर्षांच्या वयाचे असे वृद्ध दिसूं लागले. यानंतर सातच वर्षें त्यांनीं इहलोकांत वास्तव्य केलें. १८६४ सालच्या मार्च महिन्याच्या आठव्या तारखेस त्यांच्या इहलोकवासास प्रारंभ झाला आणि १९१९ सालच्या मार्च महिन्याच्या तिसऱ्या तारखेस त्यांचा इहलोकवास संपला. एकंदर पंचावन्न वर्षांत पांच दिवस कमी इतका काल ते आमच्यामध्यें राहिले, आणि एवढ्या अर्धशतावधीच्या आयुष्यांत महाराष्ट्र शारदेच्या भक्तमंडळींत फार मोठ्या मानाचें, फार मोठ्या कीर्तीचें व चिरस्मरणीय स्थान मिळवून ते निघून गेले.

नारायण चिमणाजी ऊर्फ नानासाहेब आपटे यांचे **हरि नारायण आपटे** हे ज्येष्ठ पुत्र. हरिभाऊंचा जन्म वऱ्हाडांत त्यांच्या आजोळीं झाला. बारशाच्या दिवशी या मुलाचें नांव ‘ बाळकृष्ण ’ असे ठेवलें होतें, पण कुटुंबांत दुसरा ‘ बाळकृष्ण ’ आहे, असें आढळल्यावर तें नांव बदलून या नव्या बाळकृष्णाचें ‘ हरि ’ हें दुसरें नांव ठेवण्यांत आलें. हरिभाऊंना मातृसुख फारसें लाधलें नाहीं. ते चार वर्षांचे असतांना त्यांची मातुःश्री इहलोक सोडून गेली. या मातृसुखास आंचवलेल्या मुलाचे बापानें विशेष लाड करावयाचे पण बापानें आपल्या मुलाला उचलून घेणें, त्याला खेळवणें, त्याचे लाड करणें ह्या गोष्टी त्या वेळच्या जुन्या वळणाच्या कुटुंबांत अमर्यादपणाच्या म्हणून मानल्या जात. बापानें आपल्या मुलास न देतां, चुलत्यानें किंवा दुसऱ्या कोणी आप्तानें त्याला घ्याव-

याचें, खेळवावयाचें, अशी रीत त्या वेळी असे. त्यामुळें मातेच्या वियोगानंतर हरिभाऊंचें लालनपालन त्यांच्या चुलताचुलतीकडून— महादेव चिमणाजी आपटे व त्यांच्या पत्नी सौ० पार्वतीबाई यांजकडून— होऊं लागलें व या काकाकाकींचा हरिभाऊंस फार लळा लागला. या वेळीं महादेव चिमणाजी ऊर्फ अण्णासाहेब आपटे हे मुंबईत फणसवाडींतील एका चाळींत रहात असत. याच ठिकाणीं हरिभाऊंचे लहानपणचे खेळण्याचे दिवस गेले, व त्यांच्या मनावर बालपणांत जे संस्कार झाले असतील तेही याच ठिकाणीं झाले. फक्त मुंजीसाठीं मात्र हरिभाऊ पुण्यास गेले होते. हा आपल्या लाडक्या ' हरि ' च्या मुंजीचा समारंभ थाटानें करण्याची त्यांच्या काकीची फार इच्छा होती, पण तत्पूर्वीच सौ० पार्वतीबाई परलोकवासी झाल्या. अशा रीतीनें हरिभाऊ जरा मोठे होतात न होतात तोंच काकीच्या मायेचें छत्रही काळानें हिरावून नेलें. नानासाहेबांनी प्रथम पत्नी निवर्तल्यावर दुसरा विवाह केला. अण्णासाहेबांनीं पुन्हां विवाह केला नाही. कर्त्या बायका घरांतून नाहींशा झाल्यावर संसाराची सगळी व्यवस्था नानासाहेबांच्या मावशी— चिमा मावशी— ह्या पाहूं लागल्या. हरिभाऊंनाही काकींच्या मागून त्यांनीच वाढविलें. त्यांना स्वतःचें मूलबाळ असें कांहीच नव्हतें. आपल्या बहिणीच्या मुलांचा संसार तोच आपला संसार असें मानून तो त्या मोठ्या दक्षतेनें चालवीत असत. हरिभाऊंवर त्यांचें अतिशय प्रेम होतें, पण आई नसलेलें मूल म्हणून त्याचे फाजिल लाड न करतां, हरिभाऊंना चांगलें वळण लावण्याची त्यांनीं फार काळजी घेतली. हरिभाऊंचे वडील नानासाहेब हे सरकारी नोकर असून त्यांचे आचारविचार पक्क्या कर्मठ ब्राह्मणासारखे. चुलते महादेव चिमणाजी— हे पुढें नामांकित वकील झाले.— ( पुण्यांतील ' आनंदाश्रम ' ही संस्कृत ग्रंथांचें संशोधन व पुनरुज्जीवन करणारी संस्था यांनींच स्थापन केली. ) यांचे आचारविचार पूर्णपणें सुधारक पंथाचे. हरिभाऊंचें बालपण यांच्याच सान्निध्यांत गेलें व या मातृविहीन मुलाचें कोडकौतुक त्यांनींच पुरविलें. आईची माया कशी असते याचा अनुभव हरिभाऊंना मिळाला नाहीं; समजावयास लागण्याच्या वयापूर्वीच ती त्यांना सोडून गेली व तिची जागा प्रथम काकीनें व तिच्या पश्चात् वडिलांच्या मातुःश्रीच्या बहिणीनें भरून काढली. हरिभाऊंचे बालपण अशा कौटुंबिक परिस्थितीत मुंबईतील एका चाळींत गेलें.

'श्रीगणेशा' शिकण्याचा आरंभ हरिभाऊंनीं मुंबईत केला व त्यांचें मराठी व तीन इयत्तांपर्यंतचें इंग्रजी शिक्षण मुंबईस झालें. हा वेळपर्यंत हरिभाऊंचे वडील

व चुलते एकत्र रहात होते, पण महादेव चिमणाजी यांचें स्वैर वर्तन असह्य झाल्यामुळें नानासाहेबांनीं आपलें बिऱ्हाड पुण्यास नेलें, व आपल्याबरोबर आपल्या मुलास—हरिभाऊंसही—ते पुण्यास घेऊन गेले, व तेथील हायस्कुलांत त्यांनीं त्यांना घातलें. या वेळीं हरिभाऊंचें वय चौदा वर्षांचें होतें. पुण्यांत त्यांना घरीं संस्कृत शिकविण्यासाठीं शास्त्री ठेवण्यात आला होता व त्याच्याजवळ हरिभाऊंनीं काव्यनाटकादिकांचा बराच अभ्यास केला. हरिभाऊ पुण्यास आल्यानंतर दोन वर्षांनीं ' न्यू इंग्लिश स्कूल ' ही कांही तडफदार तरुण देशभक्तांनी स्थापन केलेली नवीन शाळा निघाली व हरिभाऊ हायस्कूल सोडून या शाळेंत गेले, व याच शाळेंतून ते मॅट्रिक्युलेशनच्या परीक्षेंत उत्तीर्ण झाले. यानंतर पुढील शिक्षणासाठी ते डेक्कन कॉलेजांत गेले, व ' न्यू इंग्लिश स्कूल ' च्या मंडळीनें ' फर्ग्यूसन कॉलेज ' काढताच डेक्कनमधून ते फर्ग्युसनमध्यें आले. या कॉलेजांत एक वर्ष घालवून पुन्हां ते डेक्कनमध्ये गेले. या दोन्ही कॉलेजांत मिळून सरासरी पांच वर्षें त्यांनीं काढलीं; पण कॉलेजाच्या शिक्षणक्रमांतील सगळ्या विषयामधील 'पास'ची हद्द ओलांडून जाण्याइतकी तयारी त्यांच्या हातून होऊं न शकल्यामुळें कॉलेजांत पांच वर्षें काढलीं; तथापि 'पासा'चा टिळा त्याना लावून घेता आला नाही. हरिभाऊंचा ओढा, आसक्ति एका विषयाकडे; त्यांचें मन विशिष्ट विषयांतच रममाण व्हावयाचें; कांही विषय त्यांच्या डोक्यांत शिरावयाचेच नाहींत; या विषयांची त्याना शिसारी यावयाची; पण पासाचा शेक्का पाहिजे तर सगळ्या विषयांत ठराविक मार्कांची मर्यादा ओलांडणें भाग होतें; हरिभाऊंचा आणि गणिताचा तर छत्तिसांचा आंकडा; यामुळें हरिभाऊंची कॉलेजाच्या परीक्षेंत प्रगति होऊं शकली नाही आणि अर्थात् युनिव्हर्सिटीला आपली एखादी पदवी त्यांना अर्पण करतां आली नाही. तथापि हरिभाऊ कॉलेजांत ' चमकले ' नाहींत असें नाही. ते शाळेंत चमकले, आणि कॉलेजांतही चमकले. त्यांच्या अंगच्या रसज्ञता व मर्मज्ञता या गुणांचें तेज शाळा व कॉलेज या दोन्ही ठिकाणच्या गुणज्ञ गुरुजनांच्या नजरेस आलें व त्यामुळें हरिभाऊ त्यांच्या सकौतुक आदरास व प्रेमास पात्र झाले. कॉलेजांत त्यांनीं पांच वर्षें काढलीं, पण हें परीक्षांचें कुंपण उल्लंघून जाण्याचें आपल्याला कांहीं साधत नाही, असें दिसून येतांच हरिभाऊंनीं कॉलेजच्या अभ्यासक्रमाला रामराम ठोकला, आणि लोकदृष्टीचें त्यांचें शिक्षण येथेंच संपलें.

हरिभाऊ यांच्या विद्यार्थिव्रताची समाप्ति मात्र तेथेंच झाली नाहीं व ती त्यांच्या आयुष्याच्या अखेरपर्यंत पुढेंही केव्हां झाली नाहीं. पहिल्यानें ते जेव्हां

मुंबईंत मराठी शाळेंत गेले त्यावेळीं विद्यार्थ्यांचें जें व्रत त्यांनीं घेतलें तें इहलोकांतून निघून जाण्याच्या अखेरच्या दिवसापर्यंत तें त्यांनीं अखंड चालविलें; पहिला 'श्रीगणेशा' शिकविणाऱ्या शाळेंत जशा नव्हेचे ते विद्यार्थी होते, तसेच इंग्रजी शाळेंत होते, तसेच कॉलेजांत होते व तसेच कॉलेजांतून बाहेर पडल्यानंतर अखेरच्या दिवसापर्यंत होते. त्यांचा ज्ञानार्जनाचा हव्यास एकसारखा वाढतच होता. त्यांना लागलेला वाचनाचा छंद म्हणा, व्यसन म्हणा, वेड म्हणा, जबरदस्त होतें, व त्या 'व्यसना' पायीं हजारों रुपये त्यांनीं वेंचले. त्यांनीं जेवढें वाचलें तेवढें वाचलेली किंवा वाचणारीं माणसें थोडींच सांपडतील. आपली वाचनाची तृष्णा तृप्त करण्यासाठीं ते नव्या नव्या भाषा शिकले. मराठी ही तर त्यांची मायभाषाच; इंग्रजी व संस्कृत या भाषांचें ज्ञान त्यांनीं शाळेंत व कॉलेजांत संपादन केलें; पण फ्रेंच व जर्मन भाषांतील सरस वाङ्मयाचा आस्वाद घेण्याकरितां ह्या भाषांचेंही अध्ययन त्यांनी केलें. कैंक हजार ग्रंथ त्यांनीं सर्व भाषांतलि मिळून वाचले आणि वाङ्मयप्रासादाच्या प्रत्येक दालनांत प्रवेश केला त्यांची वृत्ति मधुलोलुप भ्रमरासारखी होती. वाङ्मयाच्या उद्यानांत नवें फूल फुललेलें त्यांना दिसल्यावर त्यांनीं तिकडे धांव घेतली नाहीं व त्यांतील रसास्वाद घेण्यांत ते तल्लीन झाले नाहींत असें केव्हांही झालें नाहीं. अखेरच्या दुखण्यांत रुग्णशय्येवर वेदनानीं विव्हळ होऊन पडले असतांना देखील नव्या नव्या ग्रंथांचा परिवार त्यांच्या सभोंवार पसरलेला होता, आणि कोणतेंना कोणतें नवीन पुस्तक वाचून घेऊन ते तशा असहाय स्थितीतही आपली ज्ञानार्जनपिपासा तृप्त करून घेत.

हें एवढें वाचन त्यांनीं कशासाठीं केलें? स्वतःची वाचनाची तहान भागविण्यासाठीं? नव्हे 'दांडगा वाचक' म्हणून म्हणवून घेण्यासाठीं? नाहीं. विद्वत्परिषदेंत बहुमानाची जागा मिळविण्यासाठीं? तसेंही नव्हे. कीर्ति मिळविण्याची धडपड त्यांनीं केव्हांही केली नाहीं. तिच्या प्राप्तीचा हव्यास त्यांना केव्हांही लागला नव्हता. ती आपण होऊन त्यांच्याकडे धांवत आली, आणि मराठींतील अद्वितीय कादंबरीकाराचा मुकुट तिनें त्यांच्या मस्तकावर ठेवला. हरिभाऊंचें जीवितकार्य त्यांनीं लिहिलेल्या कादंबऱ्या हेंच आहे. ह्या कादंबऱ्या त्यांनीं जनमनोरंजनार्थ लिहिल्या नाहींत. त्या पतितांच्या उद्धारासाठीं, दीनांच्या दुःखविमोचनासाठीं, मार्गभ्रष्टांना सन्मार्गदर्शनासाठी, हताश झालेल्या हृदयांत नवचैतन्य उत्पन्न करण्यासाठीं, समाजशुद्धीसाठीं, राष्ट्रीय भावना उद्दीपित करण्यासाठीं त्यांनीं लिहिल्या. यासाठीं, त्यांनीं अखंड वाचन चालविलें, वाङ्मयाच्या क्षेत्र-

क्षेत्रांतरीं फिरून सुविचारांचीं बीजें गोळा केलीं आणि तीं आपल्या कादंबऱ्यांच्या द्वारा आपल्या देशबांधवांच्या मनांत मोठ्या चातुर्यानें पेरण्याचा महदुद्योग केला.

"न हि कस्तूरिकामोदः शपथेन प्रकाश्यते" ह्या कविवचनांची आठवण हरिभाऊंच्या "आजकालच्या गोष्टी– मधली स्थिति" ह्या पहिल्या कादंबरीच्या प्रकाशनाचा इतिहास करून दिल्याशिवाय रहात नाहीं. ही कादंबरी हरिभाऊनीं कॉलेजांत असतांना लिहिली, व "पुणेवैभव" ह्या अस्तंगत साप्ताहिक पत्रात ती १८८५ साली प्रसिद्ध झाली. ह्या कादंबरीचीं पहिलीं दोन प्रकरणें प्रसिद्ध होतांच केवळ पुण्यासच नव्हे, तर सगळ्या महाराष्ट्रांतील वाचकवर्गांत मोठी खळबळ उडाली व या कादंबरीचा कर्ता कोण म्हणून प्रत्येक वाचक विचारूं लागला. हरिभाऊंची इच्छा आपलें नांव कोणाला कळूं न देतां आपलें कादंबरीलेखनाचें कार्य चालवावें अशी होती आणि 'केसरी' नें कांहीं कारणावरून त्याचें नांव मुद्दाम लोकांना सांगितलें नसतें, तर हरिभाऊंची इच्छा सफल होऊन कर्त्याचें नाव अज्ञात राहून, फक्त कृति तेवढी वाचकवर्गापुढें आली असती. "मधली स्थिति" या कादंबरीनंतर हरिभाऊंची "आजकालच्या गोष्टींतली" दुसरी गोष्ट "गणपतराव" ही कानिटकर मंडळीच्या 'मनोरंजन' मासिक पुस्तकात प्रसिद्ध होऊं लागली, तेव्हां त्या कादंबरीवरही हरिभाऊंनीं लेखकाचें नांव "पुणें वैभवांतील आजकालच्या गोष्टींचा कर्ता" असें दिलें होतें. कांहीं पाश्चात्य कादंबरीकारांप्रमाणें आपलें नांव गुप्त ठेवून कादंबऱ्या लिहाव्या अशी हरिभाऊंची इच्छा असल्यामुळें केसरीनें केलेला गौप्यस्फोट हरिभाऊंना आवडला नाहीं. कांहीं खरीं व कांहीं काल्पनिक पात्रें योजून समाजांतील सुखदुःखाच्या प्रसंगांचीं हृदयस्पर्शी चित्रें रंगवावीत व लोकजागृति करावी हा कादंबरीलेखनांतला हरिभाऊंचा हेतु त्यांच्या ह्या पहिल्या कादंबरीपासून स्पष्ट दिसतो. हरिभाऊंची ही कादंबरी प्रसिद्ध झाली त्या काळात कादंबरीसारख्या पुस्तकांकडे तत्कालीन शिष्टमंडळी अनादराच्या दृष्टीनें पहात असत; असलीं पुस्तकें वाचल्यापासून "वाचणारांचीं मनें बिघडून ते नीतिभ्रष्ट होतात" असें त्या वेळचे शिष्ट मानीत असत; असें असतांही विशीएकविशींत लिहिलेल्या हरिभाऊंच्या ह्या पहिल्या कादंबरीनें तिच्या वाचनाची शिष्टमंडळाच्या मनांतही उत्कट उत्कंठा उत्पन्न केली; इतकेंच नव्हे तर कित्येकांना तिचें पुढचें प्रकरण केव्हा प्रसिद्ध होईल व केव्हां तें आपण वाचूं इतका चटका लावला; यावरून या उदयोन्मुख कादंबरीकाराच्या लेखणींत वाचकांच्या मनांत खळबळ उडवून देण्याचें कसें सामर्थ्य होतें याची साक्ष पटते.

कानिटकर आणि मंडळीच्या 'मनोरंजन' या मासिक पुस्तकाचा पहिला अंक १८८६ सालच्या जुलई महिन्यांत प्रसिद्ध झाला, व त्यांत हरिभाऊंनीं लिहावयास घेतलेली दुसरी कादंबरी 'गणपतराव' हिचें पहिलें प्रकरण आलें. या पहिल्या अंकांत हरिभाऊंच्या नव्या कादंबरीच्या पहिल्या प्रकरणास पहिलें स्थान देण्यांत आलें व याच अंकांत हरिभाऊंनी लिहिलेल्या 'श्रुतकीर्तिचरित्र' या नाटकाचा पहिला कांहीं भाग प्रसिद्ध झाला. या दोन्ही विषयांवर लेखकाचें नांव 'आ. का. गो.' च्या कल्याकडून असेंच घालण्यांत आलें होतें. हें मासिक पुस्तक कांही काळ नियमितपणें निघालें, परंतु पुढें या मासिकाचे अंक अनियमितपणें प्रसिद्ध होऊं लागले व शेवटी तें बंद पडलें. या मासिक पुस्तकांत हरिभाऊंनीं 'गणपतराव' व 'चाणाक्षपणाचा कळस' या दोन कादंबऱ्या, 'श्रुतकीर्तिचरित्र' व 'जयध्वज' ही दोन नाटकें, 'मारून मुटकून वैद्यबोवा' 'पळपुट्या वैद्य' इत्यादि मोलियरच्या आधारें लिहिलेली प्रहसनें, कांही लहान-सहान गोष्टी, निबंध व कविता लिहिल्या. या मासिक पुस्तकाच्या शिरोभागीं "**आपरितोषाद्विदुषां न साधु मन्ये प्रयोगविज्ञानम्**" ही कविकुलगुरूंची उक्ति 'ध्येयवाक्य' म्हणून घातलेली असे व त्याप्रमाणें हें मासिक पुस्तक अल्पावधींतच विद्वज्जनांच्या प्रशंसेस पात्र होऊन अशा तऱ्हेच्या वाङ्मयाची आवश्यकता त्यानें सिद्ध करून दिली. या मासिकपुस्तकाशीं हरिभाऊंचा संपादकीय संबंध होता, व आपल्या 'मनोरंजना'चा हरिभाऊंना फार अभिमानही होता. तो इतका कीं, कै. काशिनाथ रघुनाथ मित्र यांनीं त्यानंतर आपल्या नवीन काढलेल्या मासिक पुस्तकास 'मनोरंजन' नांव दिलें ही गोष्ट हरिभाऊंस आवडली नाही व पुढें कैक वर्षें तरी ती त्यांच्या मनांत वसत होती. कै. मित्रांनी आपल्या 'मनोरंजना'चा पहिला दिवाळी अंक काढला त्यांत घालण्यासाठीं हरिभाऊंकडे त्यांचें छायाचित्र मागितलें; परंतु तें सुद्धां देण्याचें त्यांनीं नाकारलें होतें. पुढें अनेक वर्षांनंतर कांहीं व्यवसायपरत्वें काशिनाथ रघुनाथ मित्र आणि हरिभाऊ यांचा निकट संबंध आला, तेव्हां हरिभाऊंनीं मित्राच्या 'मनोरंजनां'त लिहिण्यास पहिल्यानें लेखणी हातीं घेतली. हरिभाऊंनीं आपलें 'मनोरंजन' काढण्यांतला हेतु पहिल्याच अंकाच्या प्रस्तावनेंत व्यक्त केला तो असाः "यांत येणारे विषय, शिक्षणाचा हेतु मुख्य धरून, जितके मनोरंजक व प्रतिष्ठित करवतील तितके करण्याचा आमचा विचार आहे" आणि हाच "हेतु मुख्य धरून" हरिभाऊंनीं आपल्या कादंबऱ्या लिहिल्या, गोष्टी लिहिल्या, नाटकें लिहिलीं—आपल्या सर्व ललितवाङ्मयाची रचना हाच हेतु मनांत धरून हरिभाऊंनीं केली.

आपलें लोकशिक्षणाचें, बहुजनसमाजांत विचारजागृति करण्याचें कार्य विस्तृत प्रमाणावर करण्यासाठीं सन १८९० सालच्या आक्टोबरांत हरिभाऊंनीं '**करमणूक**' पत्र काढलें. यावेळीं जुन्यानव्याचा झगडा जोरानें चाललेला होता. 'केसरी' आणि 'सुधारक' यांची एकमेकांशीं 'दोन हात' करण्याची खडाजंगी चालू होती. सुधारक व त्यांचीं मतें यांच्याविषयी बहुजनसमाजांत आदर किंवा प्रेम बिलकुल उत्पन्न झालें नव्हतें; सुधारकांच्या मतांचा उच्चारही बहुजनसमाजास अभद्र वाणीसारखा वाटे, इतकी त्यांविषयीं लोकांच्या मनांत अप्रीति होती. ही अप्रीति नाहींशी करून इष्ट सुधारणांना लोकमत अनुकूल करण्याचें कार्य हरिभाऊंनीं 'करमणुकी'च्या द्वारें आरंभिलें. आपल्या लेखणीच्या सामर्थ्याविषयी हरिभाऊंस आतां आत्मविश्वास उत्पन्न झाला होता; आपल्या मनोरंजनाच्या शर्करावगुंठित गुटिकांचें लोक मोठ्या आनंदानें व उत्कंठेनें सेवन करतात हें हरिभाऊंच्या उत्तम रीतीनें प्रत्ययास आलें होतें; म्हणून रुक्ष, तात्त्विक वादविवादाच्या मार्गात न शिरतां करमणुकीच्या बहुजनसमाजास आवडणाऱ्या मार्गानें त्यांनीं आपलें लोकशिक्षणाचें कार्य जोरानें करण्यास प्रारंभ केला.

'पण लक्षांत कोण घेतो!' ही 'करमणुकी'त अगदीं प्रारंभीं प्रसिद्ध झालेली त्यांची सामाजिक कादंबरी होय.

'करमणूक' पत्र त्यांनीं अठ्ठावीस वर्षें चालविलें आणि स्वभाषेची आणि स्वदेशाची सेवा त्यांनीं या पत्राच्या द्वारें प्रामुख्यानें केली. 'पुणें वैभवां'त प्रसिद्ध झालेली 'मधली स्थिति' व त्यानंतर आपल्या 'मनोरंजनां'त लिहिलेल्या 'गणपतराव' (ही अपुरीच राहिली) व 'चाणाक्षपणाचा कळस' ह्या दोन, ह्या कादंबऱ्यांखेरीज बाकी आपल्या सर्व कादंबऱ्या त्यांनीं 'करमणुकी'तूनच प्रसिद्ध केल्या. ह्या कादंबऱ्यांशिवाय शेंकडों मोठ्या व छोट्या गोष्टी, लहान लहान निबंध, छोटीं चरित्रें, निवडक माहिती, कविता, चुटके वगैरे वगैरे कितीतरी मजकूर त्यांनीं लिहिला. हा त्यांनीं लिहिलेला सर्व मजकूर एकत्र करून छापल्यास हजार हजार पानांचे कितीतरी ग्रंथ भरतील. हा सर्व मजकूर लिहिण्यांत–'करमणुकीं'त येणाऱ्या कोणत्याही मजकुरांत,–त्यांनीं आपलें धोरण मात्र केव्हांही ढळूं दिलें नाहीं. आपल्या लिहिण्याचा लोकशिक्षण हा जो मुख्य हेतु त्याला विघातक अशी एक ओळही त्यांनी कधीं आपल्या 'करमणुकीं'त येऊं दिली नाहीं. आणि अश्लीलतेला तर त्यांनीं आंतल्या मजकुरांतच नव्हे तर जाहिरातींतसुद्धां कधी डोकावूं दिलें नाहीं. आपल्या समाजास आपल्याला

विशिष्ट विचारांचें वळण लावावयाचें आहे, लोकांच्या अंतःकरणांतला अंधार नाहींसा करून कर्तव्याच्या स्फूर्तीची ज्योत तेथें प्रज्वलित करावयाची आहे, हें धोरण डोळ्यांपुढें ठेवून 'करमणुकी'चा अठ्ठावीस वर्षांचा मार्ग त्यांनीं आक्रमण केला. त्यांचा पहिला जोम पुढल्या वयांत टिकला नाहीं. 'करमणुकी'चें काम त्यांनीं पहिल्या पहिल्यानें जितक्या नेटानें केलें तितक्या नेटानें त्यांजकडून तें पुढें होईनासें झालें; तथापि 'करमणुकी' चें त्यांनीं निराळ्या तऱ्हेच्या स्वरूपांत पुढें केव्हांही स्थित्यंतर होऊं दिलें नाहीं. प्रचलित राजकारण व सामाजिक, धार्मिक इत्यादि प्रश्नांवर वर्तमानपत्रांतून होणारे वादविवाद यांपासून आपल्या 'करमणुकीस' अलिप्त ठेवावयाची असें जें धोरण त्यांनीं प्रारंभींच ठरविलें तेंच अखेरपर्यंत मोठ्या दक्षतेनें कायम राखलें. आपलीं राजकीय, सामाजिक, धार्मिक इत्यादि बाबतींतील मतें त्यांनीं आपल्या कादंबऱ्यांतील पात्रांच्या मुखांतून वदविलीं, आणि तींही मोठ्या खुबीनें व चटकदार रीतीनें वदविलीं; पण इतर वर्तमानपत्रांसारखी या विषयांची चर्चा त्यांनीं 'करमणुकीं' तून कधींही केली नाहीं. या प्रश्नांची विशेष चर्चा करण्याची विशेषतः सामाजिक प्रश्नांची चर्चा करण्याची, त्यांना आवश्यकता वाटली त्यावेळीं त्यांनीं 'सुधारका'चें पुनरुज्जीवन केलें, व या कार्यासाठीं एक दिवसाआड निघणारें एक वर्तमानपत्र काढण्याची वाटाघाट याच सुमारास ते व माजी बाबाजी सखाराम कंपनीचे मालक गोविंदराव डुकले यांच्यामध्यें चालली होती. 'करमणुकी'ची व्यवस्था या वेळीं मेसर्स बाबाजी सखाराम कंपनीकडेच होती व तिच्या उत्कर्षासाठीं गोविंदराव डुकले यांनीं पुष्कळ परिश्रम केले व पुष्कळ पैसाही खर्च केला. गोविंदराव वारल्यानंतर बाबाजी सखाराम कंपनी बंद झाली; त्यावेळीं व त्यानंतरही अनेक वेळां 'करमणूक आमच्या स्वाधीन करा आम्ही ती चालवितों' अशी कांहीं जणांनीं हरिभाऊंकडे मागणी केली; तिच्या स्वामित्वासाठीं हरिभाऊंस मोठाल्या रकमाही कित्येकांनीं देऊं केल्या, पण आपली 'करमणूक' आपल्या धोरणानें पुढें कोणी चालवील असा भरंवसा न वाटल्यामुळें हरिभाऊ ती कोणाच्याही स्वाधीन करावयास तयार झाले नाहींत. हरिभाऊंची 'करमणूक' हरिभाऊंबरोबरच विराम पावली।

हरिभाऊंनी 'करमणुकीं' तून एकंदर १८ मोठ्या कादंबऱ्या लिहिल्या; त्यांपैकीं ८ सामाजिक असून, १० ऐतिहासिक आहेत. सामाजिक व ऐतिहासिक हे दोन वर्ग खेरीज करून तिसऱ्या वर्गांत घालतां येण्यासारखी एकच कादंबरी त्यांनीं आपल्या लेखनव्यवसायाच्या अगदीं आरंभीं लिहिली व ती म्हणजे

'मनोरंजनां'त प्रसिद्ध झालेली 'चाणाक्षपणाचा कळस' ही होय. अशा तऱ्हेची अगर वरील दोन प्रकारच्या कादंबऱ्यांहून भिन्न केवळ मनोरंजन कादंबरी त्यांनीं पुढें लिहिली नाही.

ह्याशिवाय 'गड आला पण सिंह गेला' ही कादंबरीवजा मोठी गोष्ट त्यांनीं लिहिली; पण कादंबऱ्यांपैकी 'म्हैसूरचा वाघ' 'सूर्यग्रहण' व 'कालकूट' ह्या कादंबऱ्या अपूर्ण आहेत. 'कालकूट' ही कादंबरी त्यांनीं योजिल्याप्रमाणे पुरी असती, तर ती त्यांची एक अत्युत्कृष्ट कादंबरी झाली असती. ती त्यांना अर्धीच सोडून द्यावी लागली, याचें कारण त्यांच्या 'करमणुकी' वर व त्यांच्या कांहीं कादंबऱ्यांवर त्या वेळीं येऊं पाहणारें गंडांतर होय. तें गंडांतर त्यांच्या एका हितचिंतकाच्या व थोर मित्राच्या खटपटीमुळें टळलें म्हणून बरें, नाहींपेक्षां त्यांच्या कांहीं उत्कृष्ट कादंबऱ्यांस कायमचा— निदान कांहीं काळ तरी— महाराष्ट्र मुकला असता. 'मी' व 'यशवंतराव खरे' या कादंबऱ्या पुस्तकरूपानें प्रसिद्ध करतांना त्यांची शेवटचीं प्रकरणें आज त्या पुस्तकांत जी आहेत त्याहून निराळ्या तऱ्हेनें लिहिण्याचें त्यांच्या मनांत होतें. पण सदर गंडांतराच्या वावटळीमुळें तो विचार त्यांना सोडून देणें भाग पडलें. 'वज्राघात' ही त्यांनी संपूर्ण लिहिलेली शेवटची कादंबरी होय. त्यांनीं 'वज्राघात' लिहिण्यास आरंभ केला त्या वर्षी त्यांच्या आवडत्या मुलीच्या मृत्यूनें त्यांच्या हृदयावर वज्राघात झाला, 'करमणुकी'चे तेव्हांचे चालक गोविंदराव डुकले त्याच वर्षी दिवंगत होऊन बाबाजी सखाराम कंपनीवर वज्राघात झाला व त्यांच्या कादंबरीलेखनावरही वज्राघातच झाला. यानंतर त्यांनी 'करमणुकीं'त नवीन कादंबरी लिहिली नाहीं. 'पुणेंवैभव,' कानिटकर मंडळीचें 'मनोरंजन' व स्वतःची करमणूक' यांशिवाय त्यांची कादंबरी अन्यत्र कोठेंही प्रसिद्ध झाली नाहीं. 'काळ तर मोठा कठीण आला' ह्या त्यांनीं दुष्काळावर लिहिलेल्या मोठ्या गोष्टीचें त्यांनीच इंग्रजींत केलेलें भाषांतर मात्र 'रामजी' या नांवानें विलायतेंतील प्रख्यात 'मेसर्स फिशर अनविन कंपनी' नें पुस्तकरूपानें प्रसिद्ध केलें आहे.

'मनोरंजनां'त प्रसिद्ध केलेल्या नाटकांशिवाय 'संत सखूबाई' व 'सती पिंगला' हीं दोन नवीन नाटकें त्यांनी लिहिली. यांपैकी 'संत सखूबाई' हें त्यांनीं 'करमणुकीं'त ('वसंत अंकां'त) लिहिलें. 'करमणुकी' शिवाय इतरत्रही त्यांनीं पुष्कळ लिहिलें. निरनिराळ्या विद्वज्जनसभांपुढें वाङ्मयावर सुंदर भाषणें केलीं व निबंध वाचले. विद्यार्थिदशेंतही त्यांनीं कांहीं चांगले निबंध

लिहिले व काव्यरचना केली. साप्ताहिक अँग्लो–मराठी ‘ ज्ञानप्रकाशा ’ चीं व पुढें ज्ञानप्रकाश ’ दैनिक झाल्यावर त्याचीं संपादकीय सूत्रें कांहीं काल त्यांच्याकडे होतीं व ‘ सुधारका ’ चें पुनरुज्जीवन केल्यावर त्यांत कांहीं सुंदर निबंध त्यांनीं लिहिले. हा त्यांचा सगळा लेखनोद्योग मनांत आणला म्हणजे वाङ्मयक्षेत्रांत त्यांनीं केलेली कामगिरी केवळ संख्येच्या दृष्टीनेंही फारच मोठी आहे अशी खात्री पटल्यावांचून रहात नाहीं. त्यांच्या आयुष्याचा लेखनव्यवसायांत गेलेला काल साधारणतः पसतीस वर्षांचा आहे. पण त्यांत जास्त नेटाची व उत्साहपूर्वक कामगिरी करमणुकीच्या सुरवातीपासून पुढील २०–२१ वर्षांतच झाली.

हा सगळा लेखनाचा प्रचंड खटाटोप त्यानी लोकशिक्षणासाठीं, बहुजनहित साधनासाठीं केला; पैशासाठीं अगर कीर्तिसाठीं केला नाहीं. त्यांच्या गुणावर लुब्ध होऊन कीर्ति त्यांच्याकडे धांवत आली तशी लक्ष्मी मात्र आली नाहीं. श्री आणि सरस्वती यांच्यांत छत्तिसांचा आंकडा असतो हाच सिद्धांत पुनश्च प्रस्थापित करणारें महाराष्ट्रांतील ह्या कादंबरीकारकुलगुरूचें चरित्र आहे. आयुष्याच्या शेवटीं शेवटीं तर सांपत्तिक अडचणींनी त्यांचें चित्त अत्यंत अस्वस्थ झालें होतें. जे हरिभाऊ कर्तृत्वाच्या आयुष्याच्या सुरवातीस महादेव चिमणाजी यांनीं पुनः पुनः प्रयत्न केले असतांही सरस्वतीची सेवा सोडून धनार्जनाचा कोणताही उद्योग करण्यास तयार झाले नाहीत, व हा त्यांचा हेका पाहून महादेव चिमणाजींनी तूं माझें न ऐकल्यास “ मी तुला माझ्या इस्टेटींतली एक कपर्दिकही देणार नाहीं ” असें निक्षून लिहिल्यावर “ मी मुळीं तुमच्या संपत्तीचा अभिलाष केव्हांच केला नाहीं ” असा खणखणीत जबाब दिला, त्याच हरिभाऊंना पैशाच्या फिकिरीमुळें बंगाल्यांत एक नवा रेल्वेचा फांटा बांधण्यास निघालेल्या कंपनीचा व्याप मागें लावून घेऊन आयुष्याच्या अंतिम प्रहरांत ‘शेअर घ्या हो’ म्हणून कैकांच्या दारीं हिंडावें लागलें ! हा दैवदुर्विलास नव्हे तर काय ? हरिभाऊंना ‘ करमणुकी’ पासून कांहीं प्राप्ति झाली नाहीं, अगर त्यांच्या कादंबऱ्यानींहीं त्यांना लक्ष्मीची जोड जोडून दिली नाहीं. उलट ह्या सर्व व्यवसायांत कर्जाचा बोजा त्यांच्या शिरावर झाला. बाबाजी सखाराम कंपनी बुडण्यास जीं अनेक कारणें झालीं त्यांपैकीं गोविंदराव डुकले यांनीं हरिभाऊंना प्रोत्साहन देण्यासाठीं, त्यांच्या ‘ करमणुकीसाठीं ’ व त्यांच्या ग्रंथप्रकाशनासाठीं वेंचलेला पैसा हें एक होतें. आणि ‘आर्यभूषण छापखान्या ’ ने आणि महाराष्ट्रांतील या नामांकित मुद्रणालयाचे निःसीम सेवक रा. रा. केशवराव बाळ यांनीं वेळोवेळीं त्यांना जें साह्य केलें तें केलें नसतें व अखेर त्यांचे परममित्र गोपाळराव गोखले यांच्या ‘सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटी ’नें त्यांच्या ऋणविमोचनाची व त्यांच्या कुटुंबाच्या आजन्म निर्वाहाची व्यवस्था केली नसती तर त्यांच्या मनाला होणाऱ्या सांपत्तिक दुःस्थितीच्या वेदना अखेरच्या क्षणापर्यंत वाढत गेल्या असत्या.

चुलते अण्णासाहेब यांनी आपल्या संपत्तींतली एक कपर्दिकही जरी हरिभाऊंना दिली नाहीं तथापि त्यांनीं आयुष्याच्या अखेरीस 'आनंदाश्रम' ही संस्था स्थापन करून शिल्लक संपत्तीचा सद्व्यय केला, व त्या आश्रमाची व्यवस्था ठेवण्याचें काम हरिभाऊंच्या हाती सोंपवून त्या 'आश्रमाच्या' खर्चांतून हरिभाऊंच्या संसारयात्रेची थोडीशी सोयही करून ठेविली. हरिभाऊंनीं या 'आश्रमांत' पंचवीस वर्षें वास्तव्य केलें. त्यांचा लेखनाचा बहुतेक उद्योग याच आश्रमांत झाला. 'आश्रमाच्या' वरच्या मजल्यावर त्यांची लिहावयास बसण्याची लहानशी खोली होती. या खोलींत आपलें लिहिण्याचें काम ते बहुधा रात्रौ व पहांटेस करीत; केव्हां केव्हां दिवसाही ते लिहावयास बसत, पण दिवसाचा बहुतेक वेळ भेटावयास आलेल्या मंडळीशीं काव्यशास्त्रविनोदांत जाई. त्यांचें लिहिणें नियमित नव्हतें. ज्या वेळीं त्यांची प्रतिभा जागृत होई, तंद्री लागे त्याच वेळीं त्यांच्या हातून तावाचे ताव लिहून तयार होत. अशा वेळीं तासांचे तास ते एकसारखे लिहीत बसत आणि त्यांच्या लेखणीतून कागदावर अक्षरपंक्ति झरझर उमटत जात. 'वाचमर्थोनुधावति' हे त्यांच्या बाबतींत अगदीं खरें होतें. त्यांची भाषा अलंकारादि आभरणांनीं, संस्कृत शब्दांच्या चातुर्यानें अथवा पदलालित्यानें नटलेली नाहीं. तथापि वाचकांचें अंतःकरण ती मोहून टाकते. ती अत्यंत गोड वाटते याचें कारण वरीलच होय. अशा वृत्तींत ते जेव्हां लिहीत असत तेव्हां वर काय लिहिलें हें ते कधीही पहात नसत. ज्यावेळीं त्यांची तंद्री लागत नसे-आणि शेवटच्या दहा बारा वर्षांत असें वारंवार होऊं लागलें-तेव्हां लिहिण्यासाठीं कागद पुढ्यांत घेऊन बसले तरी त्यावर त्यांची लेखणी चालेनाशी होई. एरवी ते एका शब्दाची खोडाखोड न करतां झपाझप लिहीत जात. 'वज्राघाताचें' पहिलें प्रकरण त्यांनीं अत्यंत सुंदर लिहिलें आहे. तें लिहिण्याची तयारी करून ते चार पांचदां बसले! पण तितक्याही वेळां पांच दहा ओळी लिहून त्यांनीं कागद फाडून टाकले. शेवटीं एका पहांटेस त्यानीं तें सुंदर प्रकरण लिहिलें आणि त्या पुढचींही दोन प्रकरणें त्याच बैठकीत लिहिलीं. 'करमणुकी'च्या सबंध अंकाचा मजकूर-कादंबरीचें प्रकरण, गोष्ट, माहिती, चरित्र, चुटके वगैरे-त्यांनीं असाच पुष्कळदां एका अगर दोन बैठकींत लिहिला आहे. त्यांनीं इतक्या कादंबऱ्या लिहिल्या; पण कोणतीही कादंबरी आधीं संपूर्ण तर राहोच, पण तिचीं बरीचशीं प्रकरणें लिहून मग ती प्रसिद्ध करण्यास आरंभ केला असें कधींच झालें नाहीं. 'करमणुकी'चा अंक निघण्याचा दिवस आजउद्यांवर आला म्हणजे त्यांनीं त्या अंकाचें प्रकरण लिहावयाचें; पण तें इतकें सरस उतरावयाचें कीं, तें वाचल्यावर वाचकांच्या मनाला त्याचा चटका लागून 'करमणुकी' च्या पुढील अंकाच्या आगमनाकडे नो डोळे लावून बसावयाचा. हा क्रम सतत पावशतकाहून अधिक काल चालला आणि तेवढा दीर्घकाल या श्रेष्ठ कादंबरीकारानें मराठी वाचकवर्गास गुंगत ठेविलें.

कौटुंबिक सुखाचा वांटा या कादंबरिकाराच्या भागधेयांत विधीनें लिहिला नव्हता असें म्हटलें पाहिजे. अगदी शैशवांत मातृसुख संपलें, जुन्या वळणामुळें व जुन्या विचारांमुळें पित्याचा लळा लागला नाहीं, तारुण्यांत प्रथम पत्नी व तिला झालेलीं तिन्ही मुलें गेलीं; द्वितीय विवाह केल्यावर नव्या विचारांमुळें वडिलांच्या घरी मानासिक त्रासांत दिवस काढावे लागले, द्वितयि कुटुंबाच्या पोटीं फार वर्षांनीं त्यांना एक मुलगी झाली, पण जन्मापासूनच तिला रोगानें ग्रासली; 'ताई' त्यांच्या डोळ्यांतील बाहुली, त्यांचा जीव की प्राण होती. आयुष्याच्या उतरणीजवळ ते येत आहेत तोंच काळानें तिला उचलून नेली आणि यानंतर बरोबर एक वर्षानें त्यांचे परम स्नेही गोपाळराव गोखले गेले. अशी त्यांच्या कौटुंबिक दशेंत आभाळावर आभाळें येत गेलीं. पण त्याच्या प्रेमळ स्वभावांत, सौजन्यांत, आदरातिथ्यवृत्तीत अगर स्नेहशीलपणांत कधीही बदल झाला नाही. गर्वानें त्यांना स्पर्श केला नाही. विनयाची वृत्ति त्यांना सोडून गेली नाही, अहंभाव त्यांच्या अंतःकरणांत प्रवेश करूं शकला नाही; पितृभक्तीची भावना त्यांच्या हृदयांत अखंड वागत होती.

त्यांनीं वाङ्मयाव्यतिरिक्त अन्य क्षेत्रांतही पुष्कळ कार्य केलें, व त्या क्षेत्रांत बहुमान मिळविला. पुण्यांतील प्रमुख पुढाऱ्यांत त्यांची गणना होती. पुणें म्युनिसिपालिटीचे ते एक वेळ प्रेसिडेंट होते. ज्या युनिव्हर्सिटीची परीक्षा ते पास होऊं शकले नाहींत त्याच युनिव्हर्सिटीनें त्यांना आपल्या अत्युच्च परीक्षेंत पुढें मराठीचे परीक्षक नेमलें. मुंबई युनिव्हर्सिटीमध्यें वुईलसन फायलालॉजिकल लेक्चरर म्हणून त्यांची नेमणूक होऊन त्यांनी सन १९१५ सालीं Marathi, its Sources and Development या विषयावर सहा व्याख्यानें दिली आहेत. १९१५ सालीं पुण्यास भरलेल्या पधराव्या प्रांतिक परिषदेच्या स्वागत मंडळाचे ते अध्यक्ष होते. त्यांनीं मित्रपरिवार फार मोठा गोळा केला, व त्यांत अनेक थोर थोर विद्वान् होते.

अखेर दीपनिर्वाणाचा दिवस आला. १९१८ च्या आक्टोबरांत त्यांच्या एका डोळ्यास पक्षघाताचा विकार झाला. त्यांतून बरे झाल्यावर बंगाल्यांतील रेल्वेचे शेअर खपविण्यास ते कलकत्त्यास गेले. तेथून परत येतांना वाटेंत त्यांना जलोदराचा विकार झाल्याचें डॉक्टरांनी सांगितलें. औषधोपचारासाठीं ते मुंबईस आले, पण दुखणें वाढत गेलें. यावेळीं १९१९ सालच्या मार्च महिन्याची सुरुवात होती. त्या महिन्याच्या तिसऱ्या तारखेस ते मुंबईहून पुण्यास गेले. दुपारीं १ वाजतां ते आनंदाश्रमांत जाऊन पोहोंचले आणि त्याच दिवशी सायंकाळी त्यांच्या जीर्ण शरीराचा त्याग करून त्यांतील चैतन्य शाश्वतांत विलीन झालें.

---

# गणपतराव.

## प्रकरण १ लें.

### दोघे मित्र.

संध्याकाळचे सुमारें सहा वाजून गेले होते. त्या दिवशीं दुपारीं ऊन फारच कडक होतें. तो दुपारचा त्रास अगदींच स्मरणांतून गेल्यासारखा झाला होता. सूर्य बराच चांगला क्षितिजाजवळ गेला होता व त्या वेळीं नेहमीं येणारा तांबडेपणाही त्याच्या अंगावर क्षणोक्षणीं अधिकाधिक येत चालला होता. पश्चिम दिशा बरीच तांबडी दिसूं लागली होती. रस्त्याच्या दोहोंबाजूंस लाविलेल्या झाडांपैकीं जीं झाडें बरींच उंच होतीं तेवढ्यांच्या शेंड्यांवर व कॉलेजाच्या पश्चिमबाजूच्या माडींतील खिडक्यांच्या कांचांवर मात्र सूर्याचे ते तेजमंद किरण आपला प्रभाव दाखवीत होते. पहिल्या ठिकाणीं म्हणजे झाडांच्या शेंड्यांवर त्यांचा प्रभाव कांहीं चांगलासा दिसत नव्हता; परंतु दुसऱ्या ठिकाणीं मात्र त्यांनीं अगदीं प्रळय करून सोडला होता, असें म्हणावयास हरकत नाहीं. दुरून पहाणारांला तर आग लागल्याचाही भास होई. कॉलेजच्या रस्त्यावर हवा खाण्यास येणाऱ्या साहेबलोकांच्या गाड्या–घोड्यांची बरीच रहदारी सुरू झाली होती. कारण ऐन उन्हाळ्याचे दिवस–आणि त्यांतूनही आजचा दिवस तर फारच कडक गेला होता. हा रस्ता बंडगार्डनवरून येऊन खडकीकडे जाणारा असल्याकारणानें याच्यावर साहेबलोकांच्या गाड्या–घोड्यांची फार गर्दी असते. पायानें चालणारे लोक म्हणजे जवळच सैपर्स मायनर्सची जी छावणी आहे तेथले लोक, डेक्कन कॉलेजांतील हिंडावयास गेलेले विद्यार्थी किंवा साऱ्या दिवसभर शहरांत काम करून किंवा विकावयास नेलेला जिन्नस विकून मिळविलेला पैसा घेऊन कोणी आनंदांत, कोणी दुःखांत, जाणारे गरीबगुरीब कामाडकष्ट करणारे कुळंबी यांखेरीज कोणी नसतात. असलेच तर

एखादे 'जॉन बुल्ल' ऊर्फ 'टोपीवाले' व त्यांच्या 'मेमसाहेब' हातांत हात घालून व्यायाम करण्याकरितां म्हणून हिंडत असतात. त्यांच्या पाठीमागून साऱ्या जनावरांतील इमानीपणा ज्याच्या अंगांत भरला आहे असा स्पानिएल, कोली, टेरिएर किंवा बुलडॉग कुत्राही चाललेला असतो. अशा जोडप्यांस पाहिलें म्हणजे, 'धन्य हे प्राणी!' असें तरुण विद्यार्थ्यांच्या मनाला वाटल्यावांचून खरोखर रहात नाहीं. आपल्यामध्यें अशी सुखदायक रीत पडेल काय, असेंही त्यांच्या मनांत येतें. परंतु, लागलीच सद्यःस्थिति मनांत येऊन तो उद्भवलेला आशेचा अंकुर उत्पन्न झाला नाहीं तोंच लयही पावतो. वर सांगितलेल्या रस्त्याच्या दोन्ही बाजूंला कांहीं ठिकाणीं शेतें व कांहीं ठिकाणीं नुसतीच पडीत जमीन आहे व पुढें पुढें शादिलबोआच्या देवळापासून एका बाजूस टेंकडी व दुसऱ्या बाजूस नदी आहे. ही टेंकडी पुण्याचा चांगला बचाव करणारी असून येथून पुण्यावर माराही फार चांगला होई असें ऐकिवांत आहे; परंतु सध्या हिच्या देहाचे तुकडे तुकडे होण्यास सुरुवात होऊन लवकरच हिचा पूर्णनाश होईल असें वाटतें. या आत्मनाशानें ही टेंकडी हल्लींही शहराचा एका तऱ्हेनें बचाव करीत आहे. तो कोणत्या तऱ्हेचा म्हणाल तर आपल्या अंगाचे लाखों बारीक बारीक तुकडे करून घेऊन ती आपल्या शहरवासी लोकांना रस्त्यावर उपयोगी पडते. असा नाहीं तसा कोणीकडून तरी लोकांचा बचाव होत आहे खरा!

वर सांगितल्या दिवशीं व वेळीं या रस्त्यावर दोन तरुण गृहस्थ हातांत एकेक पुस्तक घेऊन तें वाचीत वाचीत, बंडगार्डनच्या बाजूला चालले होते. यांपैकीं एक दुसऱ्याहून किंचित् उंच होता. याचा वर्ण गोरा होता. हा अंगानें लठ्ठ व सशक्त दिसत होता, डोळे मोठाले पाणीदार असून चंचल होते. मिसरूड नुकती कोठें फुटत चालली होती. हातपाय बळकट व जोरदार दिसत होते. वयानेंही हा फार झालें तर बावीस किंवा तेवीस वर्षांचा असावा असें सहजच वाचकांच्या लक्षांत येईल. हा मनुष्य मोठा महत्वाकांक्षी, धीर व निश्चयाचा असावा असें याच्या चर्येकडे पहातां वाटे. त्याची ती चालण्याची उद्धत पद्धति, हा कोणाची कसलीही पर्वा न बाळगणारा असावा, असें दाखवी; तसेंच तो मोठा सचोटीचा मनुष्य असावा, असेंही त्यास पहातांक्षणीं वाटे. त्याचा पोषाख म्हटला म्हणजे कांहीं विशेष नव्हता. अंगांत एक साध्या तऱ्हेचा सदरा होता. नेसतें धोतर साधें कुइरीकांठीं होतें; व त्याचा त्यानें कांचा मारला होता. डोक्याला एक कराचीची टोपी होती. त्याची शेंडी मोठी

असल्याकारणानें ती त्यानें टोपींत घातली नव्हती. कपाळीं गंध वगैरे कांहीं-एक नव्हतें. याच्या हातांतलें पुस्तक तांबड्या पुठ्ठ्याचें व लहानसेंच होतें; व तो अगदीं ह्या पुस्तकाच्या शेवटा–शेवटाला गेला असावा असें दिसत होतें. कारण डाव्या बाजूलाच पानें फार उलटलेलीं होतीं. वाचतां वाचतां तो मध्येंच हंसे, आपल्याबरोबर चाललेल्या मित्राकडे बघे व तो मित्रही वाचनांत गुंतला आहे असें पाहून पुनः आपल्या पुस्तकाकडे आपले डोळे फिरवी.

दुसरा गृहस्थ शरीरानें बराच कृश होता; याचा वर्ण धड गोऱ्यांतही नाहीं व धड काळ्यांतही नाहीं, असा होता. याचे नाकडोळेही सर्व ठीक होते. याचा चेहरा जरी पाणीदार दिसे, तरी त्याच्या त्या दुसऱ्या मित्राच्या चेहेऱ्यांत जो एक प्रकारचा निश्चिंतपणा दिसत असे तो त्यांत नव्हता. याचा चेहरा थोडासा लाजाळू व फार गरीब असावा, असें दाखवीत असे. बाकी मनाचा उघडेपणा, जसा त्या दुसऱ्या गृहस्थाचा तसाच याच्याही चेहेऱ्यावर चांगल्या तऱ्हेनं दिसून येई. याचा पोषाखही त्या दुसऱ्या गृहस्थाप्रमाणेंच साधा होता. तसाच अंगांत एक सदरा, तसेंच साधें धोतर व तशीच टोपी होती. याचें वय २०।२२ वर्षांचें होतें. याच्या हातांतलें पुस्तक काळें व बरेंच जाड होतें. तो तें मध्यंतरीं असें वाचीत होता.

असे ते दोघे कॉलेजांतील तरुण विद्यार्थी कॉलेजच्या पुढील रस्त्यानें बंडगार्डनकडे चालले होते. रस्त्यांतून गाड्या–घोड्यांची गर्दी फार म्हणून ते चालणाऱ्या लोकांकरितां जो एक रस्त्याच्या बाजूला पायरस्ता आहे त्यावरून चालले. जातां जातां ते धरणाच्या पुलाजवळ आले. त्यावरून बाजूबाजूनें चालतांना तांबडें बुक जो वाचीत होता, तो एकदम थबकला व आपलें पुस्तक मिटून आपल्या मित्राला म्हणतो,:–" छे बोआ! नाना! हें पुस्तक तूं वाचच. माझीं थोडीं पानं राहिलीं आहेत. आज रात्रीं संपतील. कायरे! हा मिल्ल केवढा जाडी विद्वान् असेल! तुम्ही आम्हीं काय आपले नुसते तोंडानं म्हणायचे मात्र ' स्त्रियांना स्वातंत्र्य पाहिजे ' म्हणून! बाकी कोणी जर, ' कां दिलं पाहिजे ' म्हणून विचारलं, तर कारण सांगण्याच्या नांवानं पांचजन्य!!!"

**नाना**:—वारे वाः गणपतराव! तूं तरी एक मला शहाणाच दिसतोस मिल्लचीन् आपली तुलना करायला! किती केलं, तरी जॉन स्टुअर्ट मिल्ल तो! त्यानें असं पुस्तक लिहिलं यांत नवल तें काय?

**गणपतराव**:— छेरे बोआ ! फारच विलक्षण बूक आहे ! तूं एकदां वाचच. मी तर म्हणतों कीं, गीतेप्रमाणें रोज दहावीस तरी त्यांतलीं पानं प्रत्येकानं वाचावीं. कॉलेजांतल्या विद्यार्थ्यांनीं तर हें पुस्तक वाचलंच पाहिजे. तूं तरी उद्यांपासून वाचच !

**नाना**:— छे रे ! माझं हें बेकन एकदां संपल्याखेरीज दुसरं मी कांहीं एक वाचणार नाहीं.

**गणपतराव**:— काय सारा दिवसभर तें बेकन घेऊन करतो आहेस कुणाला ठाऊक ? अरे, याला कांहीं फार वेळ लागणार नाहीं. तीन चार दिवस लागतील चांगलं वाचायला. सुट्टींत काय दोन तास तुला देववत नाहींत याला ? मला नाहीं बेकन बिकन वाचायचं का ? हें पाहिलंस का, यांत विवाहाविषयीं काय म्हटलं आहे तें ? कायरे ! असा विवाह आमच्यामध्यें एक तरी आहे का ?

या शेवटल्या प्रश्नापूर्वीं आमच्या गणपतरावांनीं आपल्या मित्रास त्या पुस्तकांतील एक वाक्य वाचून दाखविलें. त्याचा सारांश येणेंप्रमाणें होता:— "गुणांनीं, विद्येनें व ग्राहकशक्तीनें दोघेंही सारखींच; त्याचप्रमाणें एका गोष्टींत एक कुशल, तर दुसऱ्या गोष्टींत दुसरा. एका गोष्टींत याचें मतच उपयोगी, तर दुसऱ्या गोष्टींत दुसऱ्याच्या मतावांचून व्हावयाचें नाहीं; अशा स्त्रीपुरुषांचा जर विवाह झाला, तर त्यांत किती सुख आहे, हें मी सांगत नाहीं. कारण ज्यांना त्या सुखाची कल्पना करतां येईल, त्यांना हें सांगण्याची अवश्यकता नाहीं व ज्यांना ती कल्पना करतां येणार नाहीं, त्यांना कितीही सांगितलें तरी तें मृगजलवत् भासणार आहे.

तें वाक्य ऐकून नानालाही फार मजा वाटल्यासारखें दिसलें. परंतु तो लागलींच आपल्या स्नेह्याला म्हणाला:

**नाना**:— अरे आमच्यामध्यें अशीं लग्नं नाहींत हें तर खरंच. पण तुला तरी असं वाटतं का, कीं त्यांच्यांत सारींच अशीं लग्नं असतील म्हणून ?

**गणपतराव**:— सारीं जरी नसलीं, तरी पुष्कळ असतील ! छे बोआ ! आपण हें ' सब्जेक्शन ऑफ वुइमेन ' अगदीं पाठ करणार ! मराठींत त्याचं भाषांतर करणार. तूं उद्यांपासून वाचूं तर नकोस, म्हणजे मग सांगेन कसं काय आहे तें ! अशी स्थिति झाली पाहिजे आमच्या इकडे !

**नाना**:— स्थिति झाली पाहिजे म्हणजे कायरे ? ती का एकदम होत असते ? दमादमानं होईल. पण ती देखील कांहीं नुसत्या अशा बडबडीनं

नाहीं हो व्हायची. त्याला स्वतां कांहीं तरी केलं पाहिजे. बरी आठवण झाली!
मी फार दिवस विचारणार होतों. कायरे गणपतराव, तूं आपल्या बायकोला कांहीं ल्याहायला वाचायला शिकवलं आहेस का ?

**गणपतराव:**– कांहीं नाहींरे ! तिला उगीच कुठें.' र ट फ ' करायला येतं आहे. मी कितीकदां तिला सांगितलं कीं, तूं वाचीत जा. पण ती ऐकत नाहीं. काय करावं ? छे बोआ ! आमची ही लाजन् हा विनय हीं केव्हां जातील कुणाला ठाऊक ?

**नाना:**– अरे हीच का तूं सुधारणा करणार ती मग? घरच्या बायकोला शिकवणं होईना, आणखी म्हणे साऱ्या स्त्रियंना स्वतंत्रता पाहिजे! आणखी शिक्षण पाहिजे ! पहा आतां तूं आपल्यावरूनच ! म्हणजे झालं.

**गणपतराव:**– नाना ! काय आतां तुला सांगूं ? तूं आपला हंसशील तर हंस. पण मी आतां या सालीं बी. ए. झालों म्हणजे घरीं राहून तिला शिकवणार आहें. माझा अगदीं बेत आहे कीं, होतां होईल तों सरकारी चाकरी करायची नाहीं. स्वतंत्र धंदा करायचा. बहुशः मी पुढल्या सालीं मुंबईस जाऊन एल्. एल्. बी चा अभ्यास करायला राहीन. यंदां परीक्षा मात्र उतरली पाहिजे. तूं येशील का तिथें ?

**नाना:**– गणपतराव, तुला माझी स्थिति कशी आहे, हें ठाऊक नसल्यासारखं कां बरं बोलतोस ? मी आज अडीच वर्षे कॉलेजांत आहें म्हणजे काय ? आहें म्हणून आहें, एवढंच ! गतवर्षींच मी पहिल्यानदां नापास झालों, तेव्हां काकांचं काय पत्र आलं ते तुला दाखवलं नाहीं का बरं ? मागून नशीबानं डाउटफुलमध्यें आलों, म्हणूनच इथें राहिलों. नाहीं तर मला तेव्हांच चाकरी धरावी लागली असती !

**गणपतराव:**– तसं नाहींरे नाना ! मीं तुला एवढ्याकरितांच विचारलं कीं, तूंन् मीं, एका ठिकाणीं असलों म्हणजे बरं होईल. खरं जर पुसशील किनई, तर माझ्या मनांतून एक बेत आहे. चल, तो मी तुला सांगतों. चल, बागेंत जाऊन एका बांकावर बसूं.

**नाना:**– वाः गणपतराव, साडेसहा वाजून गेले! चल, आतां आपण परतूंच. कारण, क्लबांत मंडळीं जेवायला देखील बसली असेल !

**गणपतराव:**– जाऊं देरे ! जेवणाचं काय आलं आहे मोठंसं ! आज आयता विषय निघालाय्, तर माझी इच्छा काय आहे हें तुला सांगतों चल.

त्यावर नाना 'बरं तर चल' असें म्हणाला व दोघेही बंडगार्डनमध्यें जाऊन एका बांकावर बसले. त्या बागेंत पुष्कळ साहेबलोक, त्यांच्या बायका व मुलें हिंडत होतीं. त्यांच्याकडे किंवा बागेंतील सुंदर वृक्षांकडे किंवा धरणावरून धबधब पडणाऱ्या त्या पाण्याकडे,—कश्शाकडे त्यांची नजर गेली नाहीं. त्यांचें सारें लक्ष आपल्या विषयाकडे लागलें होतें.

**गणपतरावः—** नाना, आज तुझा माझा स्नेह दहा बारा वर्षांचा आहे. इतके दिवस तूंन् मी बरोबर शिकत आलों. पण पुढल्या सालीं आपण दोघेही कोठें असूं याचा कांहीं नेम आहे का ? मी पलीकडल्या सालीं नुसता चार दिवस म्हणून वांईला गेलों तर मला कांहीं तिथें करमलं नाहीं; मी लागलींच परत आलों. आतां परीक्षा झाल्यावर तूं काय करशील, आणखी मी काय करीन. कदाचित् आपली वर्षानुवर्षं गांठ पडायची नाहीं !

**नानाः—** गणपतराव, तुला आजचशी या गोष्टींची आठवण झाली ? तुला आज मी सांगतों, गेल्यासालीं पास झाल्या दिवसापासून माझ्या मनांत हें येऊं लागलं. मी आपलं कधीं बोललों नाहीं इतकंच. बाकी माझ्या हें मनांत तें पुष्कळ वेळां आलंच. प्रसंग येईल तो खरा.

**गणपतरावः—** हें असं नको बोवा बोलूं. मला तर अशी इच्छा आहे कीं, तूं आणि मी जन्मपर्यंत एकमेकांपासून दूर राहूं नये. खरंच, एखाद्या दिवशीं माझ्या असं मनांत येतं कीं, तूं, तुझी आई, मी आणखी माझी बायको, असं चौघांनीं एका ठिकाणीं रहावं. खर्चवेंच सगळा एक. आणखी असं राहून कांहींना कांहीं तरी देशसेवेचं काम करावं, आणखी गड्या, याला कांहीं उपाय सुचला तर मी पहातों आहें.

हे आपल्या मित्राचे शब्द ऐकल्याबरोबर नानाचा कंठ अगदीं सद्गदित झाला, व बराच वेळ स्तब्ध बसल्यावर तो **गणपतरावास** म्हणतो:

**नानाः—** तूं म्हणतोस तसं रहावं अशी माझी देखील फार इच्छा आहे; पण ती सफळ कशी बरं होणार ? मला देखील सरकारची चाकरी करण्यापेक्षां स्वतंत्रता बरी, असं वाटतं, पण करूं कसं ? कॉलेजांतून बाहेर पडलों, कीं पहिल्या महिन्याला मला स्वतः मिळवून खाल्लं पाहिजे ! छे बोआ ! मला समजून चुकलं आहे कीं, आमच्या कपाळीं ते रेव्हेन्यूचे पस्तीसच आहेत ! त्याच्यापलीकडे कांहीं नाहीं ! !

**गणपतरावः—** नाना, मला देखील तुझ्याबद्दल फार वाईट वाटतं. पण तूं गड्या असा निराश होऊं नको. मला युक्ति सुचली आहे, ती मी तुला

सांगतों. हें बघ, मुंबईस आमच्या बाबांच्या ओळखीचे भाट्ये व्यापारी आहेत. त्यांच्याकडून, तसेंच आणखी एक दोन पारशी आहेत त्यांच्याकडून, एखादी चाळीसपन्नासपर्यंतची चाकरी, नाहीं तर दोन तीन शिकवण्या तुला लावून याव्या, आणखी तूंन् मी एल्. एल्. बी. चा अभ्यास करावा; म्हणजे पैसेच्या पैसे झाले, अन् अभ्यासचा अभ्यासयू झाला! मग एल्. एल् बी. झाल्यावर दोघेही कुठें तरी वकिली करूं म्हणजे झालं.

**नाना**:—या सगळ्या गोष्टी दिसायला लख्ख दिसतात. पण बाबा या दिवसांत कोण चाकऱ्या देतो? परवांच तूं नाहीं का ऐकलंस त्या अकाउंट ऑफिसांत एक विसांची जागा रिकामी झाली, तिच्याकरितां किती अर्ज आले ते? तो गोपाळराव सांगत होता कीं, एकंदर साठ अर्ज आले! त्यांतले ४० ग्रॅज्युएटांचे होते! आमचे ग्रह फिरले आहेत एवढी गोष्ट खरी. करावा आपला मुलकीकडे अर्ज. येईल तिशीपस्तीशीची वर्णी, तेव्हां जावं कुठें सांगतील तिथें झालं!

**गणपतराव**:— हेंच तें! असला तुझ्यासारखा रडचा मनुष्य असला, म्हणजे मात्र कांहीं होणार नाहीं. अरे ' लाथ मारूं तिथें पाणी काढूं ' असं नेहमीं म्हटलं पाहिजे. मुंबईसारख्या ठिकाणीं, जो जाईल तो आज आपलं पोट भरतो आहे! आणि आपल्याला तीस चाळीस रुपयांची चाकरी मिळणार नाहीं काय?

**नाना**:—अरे गणपतराव, मिळाली तर मी नको का म्हणतों आहें? पण तूं जरा जास्त उड्या मारतोस, म्हणून तुला सांगितलं कीं जगांतली वस्तुस्थिति कांहीं तशी नाहीं. दुरून डोंगर साजरे.

**गणपतराव**:—कांहीं नाहींरे बोआ! खटपट केली पाहिजे. उगीच बसूं म्हटलं, तर बरीक कांहीं व्हायचं नाहीं. मग काय, ठरलं ना? तूं माझ्याबरोबर येशील ना? चाकरीनं म्हण, शिकवण्यांनीं म्हण, तुला आपले चाळीस रुपये देण्याचं माझ्याकडे लागलं. अरे, आपण आतांच असे पाय गाळले तर मग पुढें आपल्या हातून मोठमोठालीं कामं कशीं होणार? आपल्या राजकीय, सामाजिक वगैरे स्थितींत सुधारणा घडवून आणायच्या त्या कशा होणार! आपली तर बोआ इच्छा अशी आहे कीं, मराठी-इंग्रजी असं एक रोजचं पत्र काढायचं. काय होईल तें होवो! पण तूं जर आतांपासूनच असे हातपाय गाळायला लागलास, तर मग रे या गोष्टी कशा होणार?

**नानाः**—( हलकेंच आणि थोडें हंसत हंसत ) मी तुला उडत्या मारणारा म्हणतों, तें कांहीं खोटं नाहीं. ‘ बाजारांत तुरी अन् भट भटिणीला मारी ! ’ कशास कांहीं ठावाठिकाण नाहीं, अन् म्हणे वर्तमानपत्र काढणारन् सुधारणा करणार !

**गणपतरावः**—हेंच तें ! असला निराशावाद मला आवडत नाहीं बोआ ! कायरे अशक्य आहे त्यांत ? आणखी दोन अडीच वर्षांनीं एल्. एल्. बी., कीं पुढें दोन वर्षांनीं वर्तमानपत्र ! अरे, आपल्यासारख्या शिकलेल्यांनीं हें करायचं नाहीं, तर मग करायचं तरी कोणी ? तुझ्यासारखे ‘कसं होणार?’ ‘काय होणार ?’ असा जप करीत बसणारे असले म्हणजे झालं मग ! तुला काय आपलं तुला मी सांगेन तसं कर म्हणजे झालं.

**नानाः**—बरं तर, मी अगदीं तूं सांगशील तसं करीन. पण त्याला एक अडचण आहे. ती अडचण काकांची. काकांनीं जर मला साफ सांगितलं कीं तें कांहीं नाहीं; तुला आपली सरकारी चाकरीच धरली पाहिजे. तर मग मी काय करूं ?

**गणपतरावः**— त्याची देखील तुला काळजी नको. मी बाबांना सांगून ती सारी तजवीज करीन, मग तर तुझं कांहीं नाहीं ?

**नानाः**— इतकं झाल्यावर मग आमचं कांहीं म्हणणं नाहीं बोआ. अरे, आपण हे किती वेळ उगीच बोलत बसलों पाहिलंस का ? चल उठ, जेवायला जाऊं.

असें म्हणून **नाना** त्या बांकावरून उठला व त्याच्या पाठीमागून **गणपतराव**ही उठला. ते दोघेही कांहीं वेळपर्यंत मुकाट्यानेंच कॉलेजकडे चालले व पुढें बोलावयाला लागले, ते देखील ज्या विषयावर ते आतांपर्यंत बोलत होते, त्याच विषयावर ! त्यांत नवीन कांहीं नव्हतें; फक्त आपल्या या मताला अनुसरूनच आपल्या मित्रांपैकीं आणखी कोण असतील, व कोणाचा स्वभाव कसा आहे, या गोष्टी त्यांत जास्त होत्या.

बोलत बोलत ते कॉलेजमध्यें गेल्यावर ते आपल्या खोल्यांकडे न जातां तडक जेवावयाच्या जागेकडेच गेले. तेथें जेवतांनाही त्यांच्या ह्याच गोष्टी चालल्या होत्या. **गणपतरावाचें** एकंदर भाषण नानाच्या मनांत घोळत होतें. नाना मनांत पक्कें समजत होता कीं, गणपतरावाच्या सर्व उडत्या सध्यांच्या काळाला अनुसरून केवळ अशक्य नसल्या तरी कष्टसाध्य आहेत. गणपतराव कसेंही करून नानाला मुंबईस येण्याला उत्तेजन देत होता. परंतु

मुंबईसारख्या शहरामध्यें एकटें राहून देखील चरितार्थ चालण्याची कोण दुर्दशा उडते, हें नानाला चांगलें ठाऊक होतें. येऊन जाऊन भर काय तो शिकवण्यांवर ! पण त्याही आतां फार दुर्मिळ होत चालल्या होत्या. पहिले दिवस गेले होते. चाकरीचें तर नांवही घ्यावयास नको. कारण, आपल्यासारखे तेथें काय थोडे लोक पडले आहेत ? नाहीं म्हणायला ' **गणपतरावाच्या** बापाचा वशिला आहे; पण त्याचा कितपत उपयोग होतो कोण जाणें ! असे विचार नानाचे मनांत एकामागून एक येऊन नाना गणपतरावास म्हणालाः ' **गणपतराव** ! तुझे सगळे विचार मला मान्य आहेत. मलाही स्वातंत्र्य प्रिय आहे. आपल्या हातून कांहीं देशसेवा व्हावी असं मला वाटतं. पण गड्या ! हें कसं जमेल ते जमो!'– त्यावर **गणपतरावानें** आपल्याकडून त्याचें समाधान करण्याचा प्रयत्न केला जेवण झाल्यानंतर दोघेही मुख्य इमारतींत आले व ज्या बाजूला वर्ग वगैरे बसण्याच्या जागा आहेत, तिकडल्या बाजूसच त्यांच्या खोल्या असत, तिकडे ते गेले. इतक्यांत त्यांचा दुसरा एक मित्र त्यांस भेटला व त्यानें **गणपतरावा**च्या हातांत एक त्याचें आलेलें पत्र दिलें. **गणपतरावाचें** व नानाचेंहि, बंडगार्डनमध्यें व जेवतांना ज्या विषयांवर त्यांचा वादविवाद झाला, त्याच गोष्टीकडे मन असल्याकारणानें, कोणाशीं कांहीं न बोलतां ते तसेच आपापल्या खोल्यांत गेले. मे महिन्याच्या सुट्टींत साऱ्या खोल्या रिकाम्या असतात. कॉलेज सुरु असतांना जसें मेंढराप्रमाणें एकएक खोलींत दोन दोन चार चारजणांनीं रहावें लागतें, तसें त्या दिवसांत लागत नाहीं. खरेंच, एकएका खोलींत दोघांदोघांनीं राहून अभ्यास करणें, हें मोठें दुरापास्त आहे.मोठ्यानें वाचण्याची तर सोयच नाहीं. खोली लहान कां होईना पण प्रत्येकाला एक असावी, हेंच योग्य आहे. गांवापासून पांच मैल लांब जाऊन रहावयाचें अभ्यासाकरितां कीं त्या ठिकाणीं एकांत असतो म्हणून. मग तेथेंच जर चार सहा फूट जागेंत दोघांदोघांस घातलें, तर एकांत कसला आणि काय कसलें ? डेक्कन कॉलेजांत अशी स्थिति आहे खरी. असो. **गणपतराव** व **नाना** दोघेही आपल्या खोल्यांकडे गेले, हें वर सांगितलें आहेच. बहुतेक खोल्या रिकाम्या असल्याकारणानें दोघेही शेजारच्या निरनिराळ्या खोल्यांत रहात असत. नाना आपल्या खोलींत गेला व दिवा लावून पुस्तक वाचीत बसला. गणपतरावही आपल्या खोलींत गेला. त्यानें दिवा लाविला. तो खुर्चीवर बसला व हातांतलें पत्र फोडून तें वाचूं लागला. तें पत्र बरेंच लांब व फार बारीक अक्षरांनीं लिहिलेलें होतें. वाचतां वाचतां त्याचा चेहरा कांहीं चमत्कारिक होऊं

लागला. क्षणोक्षणीं त्याच्यावर निस्तेजता दिसूं लागली व पुढें पुढें तर तो अगदीं फिकट दिसूं लागला. त्याचे डोळे पाण्यानें भरून आले. अर्धें पत्र त्यानें वाचलें, पुढें त्याच्यानें तें वाचवेना म्हणून त्यानें तें झटदिशीं टेबलावर टाकलें. तो खुर्चीवरून उठला; व खोलींतल्या खोलींत इकडे तिकडे फेऱ्या घालूं लागला. मोठमोठ्यानें सुस्कारे टाकूं लागला. त्यानें आपल्या धोतराच्या पदरानें डोळे पुसले. तो पुन्हां त्या खुर्चीवर बसला; तें पत्र त्यानें हातांत घेतलें, व तो वाचूं लागला. या वेळीं तें पुन्हां पहिल्यापासून त्यानें वाचावयास प्रारंभ केला व तसाच पुढें पुढें वाचीत वाचीत गेला. पहिल्याप्रमाणेंच याही वेळीं त्याच्या चेहेऱ्यावर फिक्कटपणा येऊं लागला, व तो आतां दुप्पट जोरानें येत चालला होता. त्याचे डोळेही अश्रूंनीं अगदीं क्षणोक्षणीं भरून येऊं लागले. पुन्हां ते तो पुशीत पत्र वाचूं लागे व पुन्हां ते भरून येत. या वेळीं त्यानें पत्र अर्धें अधिक वाचलें व पहिल्याप्रमाणेंच टाकून देऊन, पुन्हां त्या लहानशा खोलींत इकडून तिकडे, तिकडून इकडे, अशा येरझारा घालूं लागला. मग बराच वेळ झाल्यावर तो तिसऱ्यांदा त्या खुर्चीवर जाऊन बसला व पत्र वाचूं लागला. या वेळीं त्याच्या चेहऱ्यावर फिक्कटपणा जरी होता, तरी त्यांतल्या त्यांत निश्चय व धीर हीं दिसूं लागलीं व त्याच्या त्या शेवटपर्यंत पत्र वाचण्यानें त्यानें तें आतां वाचल्यावांचून ठेवावयाचें नाहीं असा निश्चय केला होता, असें पक्कें दिसूनही आलें. त्यानें त्या तिसऱ्या खेपेस तें पत्र शेवटपर्यंत वाचलें. त्यासरसा त्याचा चेहरा पहिल्यापेक्षां दसपट फिक्का झाला; तो अगदीं वेडावल्यासारखा झाला व तें पत्र हातांत घेऊन तो तसाच भांबावलेला असा खोलीच्या बाहेर पडला.

इकडे **नाना** खोलींत जाऊन पुस्तक वाचीत बसला खरा; परंतु त्याचें लक्ष पुस्तकाकडे लागेना. **गणपतरावाचें** व त्याचें जें कांहीं संध्याकाळीं बोलणें झालें, त्याविषयींच त्याचा विचार चालला होता. थोडासा विचार झाला म्हणजे मध्येंच त्यानें जागें झालेंसें करावें, व " छे, छे ! आपल्या मनांत काय हे विचार येताहेत ! असं उपयोगाचं नाहीं. " असें म्हणून त्यानें आपल्या पुस्तकाकडे दृष्टि वळवावी, व " आतां अगदीं असले विचार मनांत येऊं द्यायचे नाहींत " असा त्यानें निश्चय करावा; परंतु निश्चय करून एक निमिष लोटलें नाहीं, तोंच पुन्हां " **गणपतरावानं** सांगितल्याप्रमाणें घडून आल्यास किती बहार होईल ? आपला व त्याचा अगदीं लहानपणापासूनचा स्नेह तसाच पुढें अव्याहत राहील व आपण अगदीं

एकमतानें कोणतेंही काम हातीं घेतलें तर खात्रीनेंच तडीला नेऊं. आपल्याला शाळांतून व कॉलेजांतून मिळालेल्या शिक्षणाचा लोकांना जितका फायदा करून देववेल तितका देऊं; बालविवाहाचा निषेध करण्यांत, पुनर्विवाहास उत्तेजन देण्यांत, स्त्रीशिक्षणाचा प्रसार करण्यांत वगैरे अनेक गोष्टींत पुढारीपणा घेऊं " अशा तऱ्हेचे विचार त्याचे मनांत येऊन तो अगदीं स्तब्ध बसे व त्याच भान अगदीं नाहींसें होऊन जाई.

अशा स्थितींत **नाना** असतां एकाएकीं **गणपतराव** त्याच्या पुढें येऊन उभा राहिला. **नाना**चें लक्ष्य एक क्षणभर त्याचेकडे गेलेंच नाहीं. परंतु, **गणपतराव** अगदीं जवळ येऊन उभा राहिला व त्यानें त्याला गळा दाटून येऊन " **नाना–नाना** ! भयंकर प्रसंग आला " असें म्हटलें. त्यासरसा नाना खुर्चीवरून तटकन् उठून उभा राहिला व त्यानें **गणपतरावा**कडे पाहिलें. **गणपतरावा**कडे पहाण्याबरोबर त्याची ती चमत्कारिक स्थिति पाहून त्याच्या मनाची स्थिति काय झाली असेल, हें वाचकांनींच आपल्या कल्पनेनें जाणावें. ज्या मनुष्याजवळ आपण एका अर्ध्या घटकेपूर्वीं भावि सुखाच्या मोठमोठाल्या गोष्टी बोलत होतों व ज्याच्या व आपल्या बेताविषयीं आपण एका निमिषापूर्वीं मोठ्या आनंदानें विचार करीत होतों, तोच मनुष्य डोळे पाण्यानें भरलेले, चेहरा काळा ठिक्कर पडलेला अशा दुःस्थितीत एकाएकीं आपणांपुढें येऊन उभा राहिला, तर वाचकाहो ! तुह्मीच कल्पना करा, कीं आपली स्थिति कशी होईल ? आणि त्यांतही तो मनुष्य जर आपला अगदीं जिवलग स्नेही असला तर काय विचारावयाचें आहे ! **नाना** तर **गणपतरावा**ची ती चमत्कारिक व भयंकर स्थिति पाहून अगदींच घाबरून गेला. त्याला त्या स्थितीच्या कारणाबद्दल कांहींच अटकळ बांधतां येईना; व आतां काय बोलावें हेंही सुचेना. यामुळें तो कांहीं वेळ तसाच **गणपतरावा**कडे टक लावून तटस्थ उभा राहिला. इतक्यांत त्याची दृष्टि **गणपतरावा**च्या हातांतल्या कागदाकडे गेली. तेव्हां तर त्याला अगदींच विलक्षण होऊन गेलें. इतकें त्या कागदांत वाईट काय असावें ? इकडे **गणपतराव**ही खोलींत येऊन " **नाना नाना** ! भयंकर प्रसंग आला ! " असें जें म्हणाला त्यावर त्याच्यानें एक शब्दही बोलवेना. तो नानाकडे पहात तटस्थपणें उभा राहिला. ते दोघेही एकमेकांकडे बघत उभे राहिले.

परंतु वर सांगितलेली स्थिति एक दोन मिनिटेंही राहिली नाहीं. **नाना** लाग-

ळींच **गणपतरावास** हलक्या आवाजानें म्हणाला:– "**गणपतराव** पाहूं तें पत्र. अशी कशानं तुझी स्थिति झाली ? असं आहे तरी काय त्यांत ?"

**गणपतराव:– नाना**, ( हे शब्द उच्चारतांना **गणपतरावा**चा गळा अतिशय दाटून आला. त्याचे डोळे पुनः पाण्यानें भरून आले व त्याच्यानें पुढें बोलवेना. तरी थोडासा यत्न करून तो पुढें बोलला. ) आतां काय करूंरे. माझ्या साऱ्या आशा आतां व्यर्थ गेल्या ! हें पहा ! ! म्हणजे तुझं तुलाच दिसेल !

इतकें बोलून त्यानें तें पत्र **नाना**च्या हातीं दिलें व आपण एकदम नानाच्या अंथरुणावर पडला. **नाना**नें तें पत्र घेतलें व तो तें वाचूं लागला. त्याचीही अगदीं **गणपतरावा**सारखी जरी नाहीं, तरी बरीच चमत्कारिक स्थिति झाली. **गणपतरावा**प्रमाणें त्याच्यानेंही तें पत्र एकदम समग्र वाचवलें नाहीं. त्यालाही त्याच्या शेवटास जाण्यास बराच वेळ लागला. शेवटपर्यंत वाचल्यावर त्याची स्थिति फारच चमत्कारिक झाली. तें पत्र तसेंच उघडें ठेवून आपल्या दोन्ही हाताचीं बोटें एकमेकांत घालून व ते दोनही हात उभे करून तो एकसारखा तटस्थपणें त्या पत्राकडे पाहूं लागला. त्याचे डोळे जरी पत्राकडे होते तरी त्याची दृष्टि त्या पत्राकडे नव्हती. अशा तऱ्हेनें बराच वेळ तो स्तब्ध राहिला. त्याला कांहीं सुचेनासें झालें. मन अगदीं गोंधळून गेलें. आपण मघाशीं किती आनंदानें व सुखानें बोलत होतों आणि आतां हें काय झालें आहे ? आतां पुढें करावें कसें ? असे नाना तऱ्हेचे विचार त्याच्या मनांत येऊं लागले. जो चेहरा **गणपतराव** येण्याच्यापूर्वीं आनंददायक अशा विचारांच्या योगानें अगदीं सतेज व सानंद दिसत होता, तो आतांच्या दुःखद विचारांमुळें अतिशय कोमेजून जाऊन निस्तेज झाला. **नाना** स्वभावतःच फार कोमल असल्याकारणानें त्यास कोणाचेंही व केवढेंही वाईट झालेलें ऐकलें म्हणजे अतोनात दुःख होई. मग या वेळीं तर त्याच्या अतिशय जिवलग मित्राचीच वाईट स्थिति आणि ती प्रत्यक्ष दृष्टीस पडली– तेव्हां त्याला अतोनात दुःख झालें असेल यांत नवल काय ? बराच वेळ त्याच्यानें बोलवेना. कांहीं वेळानें, त्याचा कंठ अगदीं दाटून गेला होता, तरी मोठ्या यत्नानें तो **गणपतरावांक**डे वळून म्हणाला:–"कायरे **गणपतराव**, मग तूं आतां उद्यां जाच, म्हणजे ठीक पडेल."

**गणपतराव नाना**च्या अंथरुणावर पडला तो अत्यंत विवंचनेंत होता. **नानानें** ते हलकेच म्हटलेले शब्द तो **नाना**च्या पासून अगदीं थोड्याच

अंतरावर पडला होता तरी देखील त्यास ऐकूं आले नाहींत. त्याचें **मन** मुळींच ठिकाणीं नव्हतें. **नानानें** जेव्हां **गणपतराव** आपल्या प्रश्नास उत्तर देत नाहीं असें पाहिलें तेव्हां तो **गणपतरावा**च्या जवळ गेला, व त्याला हालवून पुन्हां त्यानें तोच प्रश्न केला. त्यावर **गणपतराव** अगदीं घोगऱ्या व उद्विग्न स्वरानें म्हणतो:—" छेरे! मला आजच गेलें पाहिजे. आतां नऊ सव्वानऊ वाजून गेले असतील. अजून गाडीला तास दीडतास तरी अवकाश आहे. गाडी आणून कांहीं आतां जाणं होणार नाही. तर तू गड्याला घेऊन ये; म्हणजे त्याच्या डोक्यावर ब्याग देऊन मी जातों. जितकं लवकर गेलं तितकं बर. "

इतकें म्हणून तो तडाक्यासरसा उठला. **नाना**च्या मनांतून वास्तविक त्यानें आतांच जाऊं नये असें होतें. कारण आज त्याचें मन फारच क्षुब्ध झालें असल्याकरणानें शांत विचारास त्यांत मुळी जागाच मिळाली नसती. असें जरी **नाना**च्या मनांत होतें तरी त्यानें तें **गणपतरावास** सांगितलें नाहीं. कारण त्याला **गणपतरावा**चा निश्चयी स्वभाव पक्का ठाऊक होता. त्याला पक्कें ठाऊक होतें कीं, **गणपतरावा**नें जें एकदां करतों म्हटलें तें केल्यावांचून तो कधींही रहावयाचा नाहीं. त्यांतूनही पत्रांत जें काय लिहिलें होतें त्यावरून **गणपतरावा**नें घरीं जाणें अवश्य होतें, असेंही त्यास वाटत होतें. त्याचा विचार एवढाच होता कीं, आजच **गणपतराव** गेल्यास त्याचें मन शांत नसल्यामुळें आगगाडींतली सारी रात्र त्याची तळमळ्यांत जाईल. तशी स्थिति उद्यां फारशी व्हावयाची नाहीं. थोडा वेळ विचार करून तो **गणपतरावा**स म्हणाला— " मीही येतों तुझ्याबरोबर चल. एकास दोघे असलों म्हणजे कांहीं तरी बरं पडेल. "

**गणपतराव**:—**नाना**, तूं कशाला येतोस? मी जातों आणखी तसं कांहीं असलं तर तुला पत्र पाठवीन. तेरवां तुला पत्र येईल.—हो,—तेरवां खास येईल. त्यांत तुला मी अगदी सविस्तरपणें काय तें लिहीन; त्याप्रमाणें येणं न येणं तें ठरवूं. आतां मला जाऊं दे. जा, तूं गड्याला बोलाव जा. '

इतकें बोलून **गणपतराव** आपल्या खोलीकडे निघाला. या वेळीं त्याच्या चेहेऱ्यावर दृढ निश्चयाखेरीज कांहीं दिसलें नाहीं. आपल्या खोलींत जाऊन त्यानें ब्याग काढली व भरामर तींत आपले कपडे भरले. जवळच तांब्या होता तो आंत घातला, पेटी उघडून रुपये घेतले, अंगरखा घातला,

रुमाल बांधला व तो **नाना**च्या खोलीकडे आला. **नाना** आधींच क्लबाकडे गड्यास बोलवावयास गेला होता. **नाना** खोलींत नाहीं असें पाहून तो पुनः आपल्या खोलींत आला व कांहीं राहिलें सवरलें पाहूं लागला, तों **नाना**ही गड्यास घेऊन आला. गडी येण्याबरोबर **गणपतरावानें** त्याजवळ आपली ब्याग दिली. नाना आपल्या खोलींत गेला व त्यानेंही अंगरखा टोपी घातली. मग **गणपतराव** त्यास म्हणतोः—"**नाना**, मी आतां जातों, परत येईन कीं नाही कुणाला ठाऊक ? तूं......"

इतकें बोलून तो अगदींच स्तब्ध झाला, त्याच्यानें पुढें एकही शब्द बोलवेना, गळाही अगदीं दाटून आला; **नाना**ची तशीच स्थिति झाली. पण तो मोठ्या प्रयत्नानें " **गणपतराव**, असं कां बरं बोलतोस ? " इतकेंच बोलला.

**गणपतराव** तितक्यांत पुनः सांवरला व " जातों तर मग आतां, नाहीं तर उशीर होईल." असें म्हणाला. तेव्हां नाना त्यास "मीही तुला स्टेशनावर पोंचवावयास येतों" असें म्हणून निघाला. **गणपतरावा**नें त्याला " कशाला येतोस उगीच ! रात्रीचा नको येऊं " वगैरे पुष्कळ सांगितलें, परंतु त्यानें ऐकलें नाही. सरते शेवटीं ते दोघे खोलीच्या बाहेर पडले. **गणपतरावानें** खोलीला कुलूप घातलें. किल्ली नानाच्या स्वाधीन केली. **नाना**नेंही आपल्या खोलीला कुलूप घातलें. ते दोघे पुढें व गडी मागें असे स्टेशनाकडे चालूं लागले. **नाना** व **गणपतराव** याची खोलीतून बाहेर आल्यावर जाण्याची गडबड ऐकून आसपासच्या खोल्यांतील मित्रमंडळी बाहेर आली होती. त्यांना हे कां चालले आहेत, याचें कारण न कळल्यामुळें ते तसेच आपापल्या मनांत विचार करीत उभे राहिले होते. त्यांपैकी कांहींनीं त्या दोघांस कारण विचारिलें, परंतु दोघांनींही " कांही घरच्या कामामुळें" एवढेंच उत्तर दिलें. परंतु **नाना** व **गणपतराव** यांच्या चेहेऱ्यांवरून कांही तरी वाईट प्रकार आहे असें प्रत्येकास कळून चुकलें होतें, व त्यामुळें त्यांचे स्वतःचे चेहेरेही थोडेसे दुःखी दिसूं लागले. कॉलेजांत सर्व मंडळी एकमेकांशीं फारच ममतेनें वागत असल्याकारणानें एखाद्याचें कांहीं वाईट झाल्यास सर्वांस वाईट वाटल्यावांचून रहात नाहीं. बहुतेक लोक एकमेकांशीं बंधुत्वाच्या नात्यानें वागतात. परक्या स्थळीं पडलेल्या अनेकविध व्यक्तींनीं एकमेकांशीं असें न वागल्यास कसें होईल ?

**नाना, गणपतराव** व गडी निघाले ते बराच वेळ अगदीं मुकाट्यानें चालले. कोणासही काय बोलावें तें सुचेना. ते अगदींच स्तब्धपणें चालत

होते. मध्येंच **नाना** एखादा शब्द बोले, परंतु **गणपतरावाकडून** त्यास उत्तर मिळत नसे व तें नानाचें अपेक्षितही नसे. ते स्टेशनावर जाऊन पोंचले. नानानें **गणपतरावा**पासून पैसे घेतले व जाऊन तिकीट काढलें. गाडी निघावयास सारा १०।१२ मिनिटांचा अवकाश होता. गड्यापासून ब्याग घेऊन नाना व **गणपतराव** आंत गेले. गाडींत **गणपतराव** जाऊन बसला व डब्याच्या खिडकींतून नानाकडे बघूं लागला. **नाना** प्लॅटफॉर्मावर उभा राहून **गणपतरावा**कडे पाहूं लागला. इतक्यांत गाडीची घंटा झाली. जों जों वियोगाची वेळ अगदीं जवळ येऊन ठेपत चालली, तों तों दोघांची स्थिति चमत्कारिक होऊं लागली. इतक्यांत स्टेशनाच्या अधिकाऱ्यांनीं दारें बंद केलीं व गाडीला गति मिळाली, त्यासरसा **गणपतराव** ' **नाना**, जातों रे—' येवढेंच बोलून मटकन् खालीं बसला, परंतु हे दोनच शब्द अशा कांहीं चमत्कारिक रीतीनें त्यानें उच्चारले, कीं **नाना** दुःखानें अगदीं स्तब्ध होऊन जागच्या जागींच एक दोन मिनिटें, गाडी निघून गेली असतांही, उभा राहिला; मग बाहेर येऊन त्यानें एक टांगा केला आणि त्यांतच त्या गड्यास घेऊन तो कॉलेजांत परत गेला.

---

# प्रकरण २ रें.

## पूर्वकथा.

येथवर आमच्या या नायकद्वयाचें कथेला प्रारंभ होणाऱ्या दिवशीं घडलेलें वृत्त सांगितलें. आतां थोडेंसें त्यांचें मागलें वृत्त सांगून नंतर आपण आपल्या पुढील कथेकडे वळूं.

**गणपतराव** हा **गोविंदराव** दप्तरदार यांचा मुलगा. याची आई लहानपणींच वारली असल्याकारणानें त्याच्या वडिलांनीं दुसरें लग्न केलें होतें; परंतु त्या दुसऱ्या बायकोपासून त्यांस अजून कांहीं संतति झाली नव्हती. **गणपतरावाचें** लहानपणापासून पालनपोषण त्यांच्या आजीनें केलें. लहानपणींच आई वारली असली म्हणजे आजीवांचून दुसरें कोणी पोरांना सांभाळणारें नसतें. ती जर असली तर आईपेक्षांही जास्त तऱ्हेनें सांभाळ होतो. आईपो-

रकीं पोरें झालीं व तीं आजीनें सांभाळलेलीं असलीं म्हणजे तीं अतिशयित लाडकीं होऊन थोडींबहुत छांदिष्टही होतात. त्याप्रमाणेंच **गणपतरावा**चीही स्थिति होती. आई वारली तेव्हां **गणपतराव** दोन किंवा तीन वर्षांचा होता. व तेव्हांपासून तो पुढें चांगला मोठा होईपर्यंत त्याला त्याच्या आजीनेंच वाढविलें. घरांत कोणी बोलतां कामा नये, ह्याला कोणी कांहीं रागें भरतां कामा नये. कारण सार्‍यांना आजीचा धाक. कोठेंहीं जावयाचें झालें कीं आजी बरोबर. कांहीं करावयाचें झालें कीं आजीला विचारून. कित्येक वर्षेपर्यंत **गणपतरावास** दुसरें कोणी माहीत नव्हतें. त्याची आजी सुमारें साठीच्या पलीकडे गेली होती. तिला तर **गणपती**वांचून क्षणभरही होत नसे. त्याला कोणी रागें भरतां कामा नये, तो करील तसें करूं द्यावें, हा न्याय चालू होता. **गोविंदरावां**नीं देखील त्यास बोलतां कामा नये. जर एखादे वेळीं अभ्यासावगैरेच्या संबंधानें ते कांहीं बोलले तर तें देखील त्या वृद्ध बाईस खपत नसे; ती म्हणे " आईपोरकं पोर तें, मी आपल्या जिवापलीकडे वाढवलं, त्याला कोणी कांहीं बोलतां मारतां कामा नये ! "

अशा तर्‍हेनें त्याचें बाळपणचें संगोपन झालें असल्याकारणानें **गणपतराव** थोडासा छांदिष्ट झाला होता, हें वर सांगितलेंच आहे. जें एकवेळ मनांत येईल तें केल्यावांचून रहावयाचेंच नाहीं, मग तें चांगलें असो अगर वाईट असो. एवढेंच कीं, **गोविंदरावा**चें व त्यांच्या **मातुश्री**चेंही शिक्षण त्यास चांगलें असल्याकारणानें **गणपतरावां**च्या अंगांत या अवगुणावांचून दुसरा कोणताही अवगुण नव्हता. **गोविंदरावां**ची त्याच्यावर पुष्कळच ममता असे व तो तिला पात्रही होता. **गोविंदरावां**ची दुसरी पत्नी **राधाबाई** ही तर एक अलौकिक स्त्री होती. अलौकिक म्हणण्याचें कारण एवढेंच की, लोकांमध्यें आपण जी गोष्ट पहातों व ऐकतों तिचे वारेंही तिच्या अंगी नव्हतें. ती जात्याच मोठी साधी व मनमिळाऊ असल्याकारणानें तिला बोलणें, भांडणें व रुसणें फुगणें हें कांहींएक ठाऊक नव्हतें. **गणपतराव** म्हणजे आपला मुलगा नव्हे आपल्या सवतीचा—त्याच्याशीं आपण नीट वागूं नये, असें तिच्या स्वप्नींही कधीं येत नव्हतें. ह्या तिच्या चांगुलपणामुळें घरांत कधींही त्या सास्वासुनांचें भांडण झालें नाहीं. त्या मोठ्या गोडीगुलाबीनें असत. **गणपतरावा**च्या लहानपणापासून तो श्रीमंतींत वाढलेला होता, तरी त्याला गर्व वगैरे कांहींएक नव्हता. इतर श्रीमंत मुलांप्रमाणें तो चंगीफंगी न निघतां अभ्यासीही निघाला. लहानपणापासून त्यानें आपले अभ्यास नीटनेटके वेळ-

च्यावेळीं करावे, शाळा कधीं चुकवूं नये. अशा रीतीनें त्याचा कॉलेजांत जाईपर्यंत अभ्यास झाला. कॉलेजांत गेल्यावरही त्यानें चांगल्या तऱ्हेनें अभ्यास केला.

**नाना**ची स्थिति **गणपतरावा**पेक्षां फारच निराळी होती. त्याचें पांच वर्षांपासून पुढील सारें वय लोकांवर अवलंबून राहण्यांत गेलें. त्या बिचाऱ्याचा बाप तो चार वर्षांचा असतांनांच वारला. बापाला सारा २५ रुपये पगार होता. तो वारल्यावर मग काय विचारावयाचें आहे ? त्या आईला दे माय धरणी ठाय होऊन गेलें. दोन पोरें ( एक **नाना** व दुसरी मुलगी तिचें नांव पुढें येईलच. ) होती, तीं व दुसरें काय होतें नव्हतें तें घेऊन ती माहेरीं गेली. परंतु माहेरची स्थिति सासरच्या स्थितीपेक्षां कांहींच बरी नसल्याकारणानें **गोपिकाबाई**स ( हें **नाना**च्या आईचें नांव ) आपल्या पोरांचें व आपलें पुढें कसें होणार याविषयीं मोठी काळजी पडली. माहेरीं काय तो एक भाऊ. त्याला सारे २५।३० रुपये मिळणार; तेवढ्यांत त्यानें काय करावें ? अजून पोराचें शिकणें व्हावयाचें, पोरीचें लग्न व्हावयाचें, तेव्हां आतां पुढें होणार कसें ? या विचारांत ती होती; तों **गोविंदराव** दप्तरदारांच्या कचेरींतच तिचा एक चुलत दीर असे त्यानें तिला पत्र पाठविलें कीं, तूं आपल्या पोरांस घेऊन माझ्या येथें रहा. म्हणजे **नाना**च्या शिकण्याचें चांगलें जमेल. **गोपिकाबाई** जरी लहान वयाची व पोरसवदाच होती तरी मोठी विचारी होती. तिनें असा विचार केला कीं आपण जर या वेळीं नाहीं होय म्हटलें तर पुन्हां असा प्रसंग कधीं येणार नाहीं. पोराचें शिकणें थोडें बहुत झालें म्हणजे त्याला चाकरी करावयाला सांगावी, म्हणजे झालें. येथें तरी भावाजवळ राहून काय उपयोग ? उगीच त्याला मात्र नसता त्रास— असा विचार करून ती आपल्या दोन्हीं पोरांस बरोबर घेऊन दिराकडे गेली.

**काशीनाथपंत** हा गृहस्थ अगदीं चमत्कारिक होता. त्याला पैशाचा बराच लोभ असे. **नाना**च्या आईला येण्याविषयीं जें पत्र लिहिलें तें निव्वळ लोकभयास्तव. त्याच्या चार स्नेह्यांसोबत्यांना जेव्हां कळलें तेव्हां त्यांनीं याला “ कायहो, तुह्मांला पगार कांहीं थोडा नाहीं; तुह्मीं त्यांना आणून मुलाचा विद्याभ्यास करावा,— तुह्माला काय झालं आहे ? ” असा त्रास दिला. तेव्हां लोकलज्जेस्तव त्यानें पत्र लिहिलें. **गोपिकाबाई**स ही आंतली माहिती कांहींच नव्हती. ती तेथें आल्यानंतर तिला सर्व कळून आलें. परंतु ज्याला

दुसरीकडे कोठें आश्रय नाहीं त्यानें काय करावयाचें आहे ? तिला आल्याचा पुष्कळ पश्चात्ताप झाला, पण करते काय ? बरें, **काशीनाथपंतां**च्या अंगांत लोभीपणाच नुसता होता असें नाहीं. त्याच्याबरोबर अनेक दुर्गुण होते. लोकांना टाकून बोलणें म्हणजे त्यांस कांहींच वाटत नसे. **गोपिकाबाई**ला एवढें दुःख झालेलें पण तो तिला देखील अतिशय टाकून बोले. एकदोनदां ती साध्वीबाई ढळढळां रडली. **काशीनाथपंतां**ला पैशाचा मोठा मद आलेला होता. त्यामुळें तो सर्व जग अगदीं तुच्छ मानीत असे. **काशीनाथपंतां**ची पत्नी **सीताबाई** ही अगदीं नवऱ्याची प्रतिमा होती. **गोपिकाबाई** घरांत आल्यापासून तिला अगदीं चैन पडेनासें झालें. **गोपिकाबाई** जर इतकी सहनशील नसती तर त्या दोघींचें एक घटकाभरही पटलें नसतें. **सीताबाई** आपल्याकडून **गोपिकाबाई**नें बोलावें म्हणून पाहिजे तितकी खटपट करी, परंतु ती साधेना. **सीताबाई**ला मुलगा नव्हता. एक मुलगी मात्र होती, ती सुमारें चार पांच वर्षांचीच म्हणजे **नाना**च्याच वयाची होती. **गोपिकाबाई** घरांत आल्यापासून **सीताबाई**नें घरांतील सर्व तिच्यावर टाकलें व थोडेच दिवसांत स्वयंपाकाची बाई काढून टाकली. एखादे दिवशीं जर कांहीं काम चुकलें, तर ती त्या बिचाऱ्या निराधार गाईस फडाफड बोले व केव्हां केव्हां "फुकट गिळायचं तर गिळायचं, आणखी कामें करायला नकोत." असें म्हणून दुःखावर डागण्या देत असे.

असो. अशा हालअपेष्टांत **नाना** येऊन पडला. पुढें एक दोन वर्षांनीं त्याला चुलत्यानें शाळेंत घातलें. घरांत त्याच्या ममतेचें आईवांचून दुसरें कोणीही नव्हतें. शाळेंत एखादे दिवशीं अभ्यास झाला नाहीं, किंवा एखादें उदाहरण चुकलें, तर त्याचा नंबर पहिल्याच्या थोडासा खालीं जात असे; आणि तेच दिवशीं **काशीनाथपंतां**नीं त्यास " आज नंबर कितवा होता ? " म्हणून विचारावें. तो पहिला नसला कीं त्याला अगदीं मरे मरे तों मारावें. मुलानें बिचाऱ्यानें अगदीं दीन होऊन आईकडे जावें, परंतु त्या साध्वीनें, एकीकडे ते क्षणोक्षणी खालीं येणारे अश्रू पोराच्या नजरेस न येत असे पुसून " बाबा, तुझ्यासाठींचना ते मारतात ? " एवढेंच म्हणावें. तथापि ती आपल्या मनांत " बाबा, तूं आपल्या घरीं नीट असतास तर कशाला असं झालं असतं ? " असें आणखी म्हटल्यावांचून राहत असेल काय ?

अशा तऱ्हेनें **नाना** कॉलेजापर्यंत आला. त्याचा बाळपणाचा मित्र काय तो **गणपतराव**, त्याची व याची मोठी मैत्री जमली. **गोविंदराव**

दप्तरदारांनीं जर रद्बदली केली नसती तर **नाना** खास कॉलेजांतसुद्धां गेला नसता. परंतु **गणपतरावा**बरोबर **नाना** नेहमीं त्यांच्या घरीं जात असल्याकारणानें, त्याची सर्वांस माहिती झाली होती. मुलगा हुशार असल्यामुळें त्याच्यावर सर्वांची प्रीति बसली. खरेखुरे चांगले शब्द त्याला **गणपतरावा**च्या घरीं काय ते मिळत. **काशीनाथपंतां**ना पुढें मुलगा झाल्याकारणानें, त्यांस पैशाची फारच हाव सुटली ! **सीताबाई**ला तर दीडबोट स्वर्ग उरला ! घरांतलें सर्व **गोपिकाबाई**स करावें लागे. **काशीनाथपंतां**स मुलगा झाला तेव्हां **नाना** मराठी पांचवी इयत्ता शिकूं लागला होता. तेव्हांपासूनच **काशीनाथपंतां**च्या मनांत येऊं लागलें कीं, याची मराठी सहावी इयत्ता करून याला पुण्यास ट्रेनिंग कॉलेजांत पाठवावें; अगर पैमाषखात्यांत कोठें तरी दहा पंधरांवर अडकवून द्यावें. पुढें याची पांचवी इयत्ता झाली व आपला मुलगाही १०।१२ महिन्यांचा झाला असें पाहून, **काशीनाथपंतां**नीं आपला पहिला बेत अमलांत आणण्याचा निश्चय केला. इकडे **गणपतराव** जेव्हां इंग्रजी शाळेंत जाऊं लागला तेव्हां **नाना**नेंही भीत भीत **काशीनाथपंतां**जवळ गोष्ट काढली; परंतु त्यानें त्यास दरडावून " आधीं पुरतं मराठी रडूंद्या, अन् मग इंग्रजी ! शाळेंतला खर्च चालवायला आहे कोणाजवळ काय ? अन्नछत्रांत जेवून मिरपूड मागतो गाढव ! " असें म्हटलें. या बोलण्यानें त्या बिचाऱ्या आईलाही फार वाईट वाटलें. परंतु करते काय बिचारी ! **गणपतरावा**ची गांठ पडल्यावर **नाना**नें चुलत्याच बोलणें सांगितलें. **गणपतरावा**नें तें आपल्या बापास सांगितलें. तेव्हां **गोविंदरावां**नीं अतिशय रद्बदली करून **नानास** इंग्रजी शाळेंत घालविलें. वरिष्ठ अंमलदारांनींच सांगितल्यानंतर **काशीनाथपंतां**चें काय चालतें ? त्याला नाहीं होय म्हणतां येईना. त्यानें मुकाट्यानें **नानास** इंग्रजी शाळेंत घातलें. इंग्रजी शिकावयाला लागल्यामुळें वास्तविक जरी **नानास** मोठा फायदा झाला, तरी त्यावेळीं त्याला अतिशयित त्रास सोसावा लागला. घरांत काका व काकू हीं अतोनात त्रास देऊं लागलीं. घरांतील आण ने करणें, हिशेबठिशेब ठेवणें, काकांच्या मुलास घटकाघटका खेळवीत बसणें, इतकें करून, राहिल्या वेळांत पहिला नंबर राहीसा अभ्यास करणें, त्याच्या नशिबीं आलें. अशा तऱ्हेनें **गणपतरावा**बरोबर जेमतेम त्याच्या पांच इयत्ता झाल्या. त्याबरोबर पुन्हां पब्लिक् सर्व्हिसची परीक्षा देऊन चाकरी धरण्याचा हुतूतू आला ! या वेळीं **नाना**स चांगलें कळूं लागलें असल्याकारणानें आईच्या हालअपेष्टा व घरांतील त्रास पाहून आपण

चाकरी धरावी, असें त्यास वाटूं लागलें. कारण त्याच्या आधीं दोन वर्षें **काशीनाथपंतांनीं गोदावरी**चें ( हें **नाना**च्या बहिणीचें नांव ) लग्न केलें; त्या वेळेपासून या दोघांस कडेलोट त्रास होऊं लागला. लग्न केलें, तें निवळ लज्जेस्तव कसें तरी केलें. पोरीला सासर चांगलें पाहिलें नाहीं; परंतु ती सर्व कथा येथंच सांगतां येत नाहीं; कारण **गोदावरी** ही आमच्या या कथा-सृष्टींत बऱ्याच अंशांनीं महत्त्वाचें असें पात्र आहे. तेव्हां तिची हकीकत तिच्यासंबंधानें विशेष लिहितांना येईल. **नाना**च्या आईला, म्हणजे त्या दीन **गोपिकाबाई**लाही, आतां मुलानें चाकरी धरावी, असें वाटूं लागलें; व तिनें त्याप्रमाणें मुलास सांगितलेंही. परंतु याही वेळीं **गणपतरावाचा** स्नेह **नानास** फार उपयोगी पडला. मागच्याप्रमाणें याही वेळीं **गोविंदराव** दप्तरदारांनीं आपलें वजन खर्च करून, **नानानें** पहिल्या परीक्षेपर्यंत शिकावें असें ठरविलें. **नाना** अभ्यासी व हुशार असल्याकारणानें, त्यास कॉलेजांत स्कॉलर्शिप मिळूं लागली होतीच. परंतु तिचा उपयोग ज्या रीतीनें **नाना**च्या मनांत करावयाचा होता त्या रीतीनें त्याला करतां येत नसे. कारण, **काशीनाथपंत** त्याच्यापासून स्कॉलर्शिपचे रुपये घेत असत. **गणपतरावा**मुळें त्याला पुस्तकांची वगैरे कांहीं एक उणीव पडत नसे. परंतु त्याच्या मनांतून आपण आपल्या आईला दानधर्माकरितां म्हणून कांहीं द्यावें असें वाटे. त्या माउलीला त्या निष्ठुर व मदांध **सीताबाई**पासून आषाढी व कार्तिकीला देखील एखादा पैसा मिळत नसे. असा विचार मनांत येऊन **नानानें** कोणास न कळत एक शिकवणी धरली, व तिचे तीन रुपये येत, ते तो आपले आईजवळ देई. अहाहा ! पहिले दिवशीं त्यानें ते स्वकष्टार्जित तीन रुपये आईला आणून दिल्यावर तिला केवढी धन्यता व केवढा आनंद झाला असेल ?

असो. अशा तऱ्हेनें **गणपतराव व नाना** हे दोघेही पहिल्या परीक्षेंत पास होऊन त्यांचा नंबरही बराच वर आला. **नाना**चा तर सहावा आला. तेव्हां **गोविंदरावांनीं** आणखी एक वेळ **काशीनाथपंतास** " तुम्ही **नानाला** कॉलेजांत धाडाच. त्याचा नंबर सहावा आला आहे; तेव्हां त्याला खात्रीनं स्कॉलरशिप मिळेल; व तुम्हाला खर्चाचा कांहीं त्रास पडणार नाहीं" असें सांगितलें. या वेळींही त्यानें बरेच आढेवेढे घेतले. परंतु शेवटीं धाडतों असें कबूल केलें. पुण्यास येतांना आपल्या दीन जननीला तसेंच हालअपेष्टांत सोडून जाण्याचें **नानास** अतिशय वाईट वाटलें; परंतु पुढें दूरवर दृष्टि देऊन त्या साध्वीनेंच त्याला धीर दिला; तेव्हां तो **गणपतरावाबरोबर**

पुण्यास डेक्कन कॉलेजांत आला. तेथें नानाला स्कॉलर्शिप मिळाली. पुढें दोघांचीही पी. ई. परीक्षा पास झाली. पहिल्या बी. ए. च्या परीक्षेंत गणितांत नानाला धोका बसत होता, परंतु दुसरीकडे पुष्कळ गुण मिळाल्याकारणानें परीक्षकांनीं मेहेरनजर करून त्याला गणितांत एक गुण कमी होता तो दिला व तो पास झाला. पहिल्यांदां पासाची यादी प्रसिद्ध झाली त्यांत त्याचें नांव नाहीं हें पाहून काशीनाथपंतांनीं चाकरी धरण्याविषयीं खलिता पाठविला. परंतु पुढें पास झाल्यावर त्यास मुकाट्यानें बसावें लागलें. दुसऱ्या बी. ए. च्या वर्गांत गेल्यानंतर नानास स्कॉरलर्शिप मिळाली व गणपतरावासही मिळाली. त्यामुळें पुढें कॉलेजांतील सारे विद्यार्थी 'हे दोघे फेलो खात्रीनें होणार,' असें म्हणूं लागले— 'सरशेवटचें वर्ष.—पास झालों नाहीं तर पुन्हां पंचाईत!—आपला अभ्यास झाला पाहिजे व घरीं तरी जाऊन आईच्या हालअपेष्टाच पहायच्या कीं नाहीं!'— असा विचार करून तो यंदां मेच्या सुट्टींतही कॉलेजांतच राहिला. त्याच्यामुळें गणपतरावही राहिला. त्या दोघांची मैत्री मोठी मजेदार होती. एकमेकांवांचून त्यांस एक घटकाभरसुद्धां चैन पडत नसे. इत्यादि गोष्टी म्हणजे आतां वाचकांस सांगावयास पाहिजेत असें नाहीं. आणि पुढील कथा तर वाचकांना कळलीच आहे.

---

# प्रकरण ३ रें.

## गोदावरी.

मागील प्रकरणांत सांगितलेली गोष्ट घडून सुमारें आठ एक दिवस होऊन गेले. एके दिवशीं पहांटेचे तीन वाजून गेले होते. सदाशिव पेठेंत जिकडे तिकडे शांत होतें. सदाशिव पेठच्या हौदावरच जो काथं धुण्याचा वगैरे आवाज होत असे, त्याच्याशिवाय किंवा साऱ्या रात्र जागरण झाल्यामुळें चालवत नसल्यानें कसें तरी रखडत चालणाऱ्या एखाद्या मनुष्याच्या जोड्यांचा खरखर किंवा सरसर अशा आवाजाशिवाय दुसरा कोणताही आवाज ऐकूं येत नव्हता. मध्येंच कोठें विहिरींच्या रहाटांचा किंवा जात्यांच्या घरघरीचाही आवाज ऐकूं येई व एखादे वेळेस सहज मनुष्याची

चाहूल ऐकली कीं भोंकून भोंकून प्राण देणाऱ्या कुत्र्यांचें भोंकणेंही दूरपर्यंत ऐकूं जात असे.

सदाशिव पेठ म्हणजे पुण्यांतील मोठ्या पेठेपैकींच एक आहे हें कोणासही सांगावयास नको. ही पेठ म्हणजे पुण्यांतील ब्राह्मणवस्तीचें आदिस्थान; आणि या पेठेंत हवापाण्याचीही व्यवस्था चांगली असल्याकारणानें नवीन घर घेणाराला ' चार पैसे जास्त पडले तरी हरकत नाहीं, पण सदाशिव पेठेंत घर मिळाल्यास बरें ' असें वाटल्यावांचून रहात नाहीं. या पेठेंत घरें मोठालीं आणि बाकीच्या पेठांपेक्षां कमी दाट अशीं आहेत. दिसण्यांत हीच पेठ विशेष चांगली दिसते, व बुधवार किंवा आदितवार पेठेंत जितकी गजबज असते त्याच्या निम्यानें देखील इकडे कोणत्याही वेळीं असत नाहीं. मग पहांटे ३।३॥ वाजतां तर काय सांगावयाचें आहे ? वर जरी, या पेठेंत घरें मोठालीं असतात असें सांगण्यांत आलें आहे, तरी सारींच म्हणजे मोठालीं आहेत, असें कोणी समजूं नये. त्यांत पुष्कळ लहान व दिसण्यांत अगदीं गलिच्छ, पडित व वाईट अशींही आहेत. या वेळीं आमच्या वाचकांस या दुसऱ्या तऱ्हेच्याच एका घरांत नेऊन सोडावयाचें आहे.

या घराचा बाहेरचा देखावा जरी फारसा वाईट नव्हता, तरी हें कोणा थोरामोठ्याचें परंतु बरेंच जीर्ण झालेलें आऊत असावें असें स्पष्ट दिसत होतें. तो पन्नास भेगा पडलेला परंतु भला जंगी दरवाजाच, आपल्या एकंदर स्थितीचें, कोणत्याही तऱ्हेचा मनांत संशय राहणार नाहीं,' असें दिग्दर्शन करीत होता. त्या खपल्या पडून बऱ्याच विद्रूप झालेल्या भिंतीही आपलें दारिद्र्य कमी दाखवीत होत्या असें नाहीं. दरवाजा, भिंती आणि इतर सामानसुमान पाहून पहाणाराला सहजच असें वाटे कीं, आपली खरी खरी दरिद्रावस्था जास्त ठळकपणें कोण दाखवितो, याविषयीं त्या सर्वांत स्पर्धाच लागली आहे. या घरांत दरवाज्यांतून आंत गेल्याबरोबरच उजव्या बाजूला एक सोपा बांधलेला होता, व त्यांत पडक्या अशा दोन खोल्या होत्या. या खोल्यांची रचना गोमुखीच्या आकृतीची होती. थोरला दरवाजा उलटून आंत गेलें कीं, तेथेंच तोंडाशीं उजव्या बाजूला सोप्यांतील पहिल्या खोलींत जाण्याचें दार होतें; व ती खोली ओलांडली म्हणजे डाव्या बाजूला दार लागतें तें दुसऱ्या खोलीचें होतें. या दुसऱ्या खोलीला दुसऱ्या बाजूनेंही दार होतें. पण तें परसांत जाणाऱ्या रस्त्याच्या बाजूला होतें. आपणांस या वेळीं या दुसऱ्या खोलीशीं कांहींच करावयाचें नाहीं, तेव्हां तिचें वर्णन

पाहिजे कशाला ? वर सांगितलेंच आहे कीं थोरल्या दरवाज्यांतून आंत गेल्याबरोबर उजव्या बाजूस सोप्यांतील पहिल्या खोलीचें दार लागे. हें दार या वेळीं अर्धवट किलकिलें होतें व त्यांतूनच थोडासा उजेड पडल्याचा भास होई. भास होई म्हणण्याचें कारण एवढेंच कीं, जो दिवा,– किंवा जी पंती म्हणा,– आपला एवढा प्रकाश पाडीत होती, तिच्यांत तेल होतें म्हटलें तरी तिची वात सारावयाची कोणीं मेहनत घेतली नव्हती असें दिसतें. मग त्या दिव्याच्या उजेडाचा भासच होईल नाहीं तर काय ? असो. दरवाज्याच्या आंत डोकावलें तर दमट असा वास नाकाच्या द्वारें मनाला व त्याच्या द्वारें शरीरालाही, 'हो मागें' म्हणून मागें ढकलण्याचा यत्न करीत असे. इतकेंही करून आंत गेलेंच तर आंत त्या खोलींत दिव्यापासून दोन हातांच्या पलीकडे कांहींसें आहे कीं काय असा भास होई. तीन हाताच्या पलीकडे कदाचित् कांहीं असेल असें वाटे, व चवथ्या हाताच्या पलीकडे अंधाराखेरीज कांहीं दिसत नसे. तो दिवा जो होता तो एका कोनाड्यामध्यें होता त्यामुळें त्याच्या खालीं अंधार हा पुष्कळ असावयाचाच; मात्र पलीकडे कांहीं उजेड पडावयाचा; पण त्या दिव्याच्या अंगांत तितकी शक्ति नव्हती. अशी स्थिति असल्यावर वाचक हो, आपण या खोलींत पहाणार तरी काय ? पण इतकें निराशही होतां कामा नये. जर आपणांस पहावयाचीच उत्कट इच्छा आहे, तर जेवढ्या जागेवर उजेड पडला आहे, तेवढींतच काय आहे तें पाहून घ्यावें; आणि तेवढ्या जागेंतच आपल्यास काय पाहिजे तें आहे. ती पहा एक स्त्री एक पाय पसरून व दुसऱ्याची मांडी घालून जात्याशीं बसली आहे. तिनें आपल्या उजव्या हातांत जात्याचा खुंटा धरला आहे व दुसरा हात त्याच्या टोंकावर ठेवून त्याच्यावर तिनें आपलें डोकें टेंकलें आहे. ही स्त्री गौरवर्ण असावी असें तर खास दिसतें; कारण ही या वेळीं जें अपुरतें जुनेर नेसली होती, त्याच्याशीं तिच्या वर्णाचा अतिशयच विरोध दिसत आहे. तें पहा, तें जुनेर पदराच्या मध्यभागीं फाटल्याकारणानें त्यांतून आपल्या धनिणीच्या केतकीगौरवर्णाचें प्रदर्शन करीत आहे. त्याचप्रमाणें तिचे केशही आपल्या अत्यंत काळेपणानें आपण जिचें भूषण आहों ती वर्णानें गोरीच आहे असें दाखवीत आहेत. तिचा तो पाय जरी अर्धवट अंधारांत आहे तरी किती सुबक दिसत आहे पहा ! कवींनीं जी केळीच्या कोंबाची उपमा दिली आहे; ती तिच्या ठिकाणीं वास्तविक आहे असें कोणीही म्हणेल. या स्त्रीनें आपलें डोकें त्या जात्याच्या खुंट्यावर टेंकलें आहे त्याचेयोगानें तिचा चेहरा दृष्टीस पडत नाहीं; परंतु तिच्या वर्णावरून

व आपल्या नजरेस पडलेले तिचे हात व पाय यांवरून साहजिकच असें वाटणार आहे कीं, हिचा चेहराही त्यांच्या तोडीचा व त्यांना अनुरूप असाच असला पाहिजे. याचा खरेपणा अगर खोटेपणा आपणास केव्हां तरीं कळेलच !

परंतु हिनें आपलें डोकें असें कां बरें टेंकलें असावें ? तिची झोप पुरी झाली नसून तिला उठावें लागलें असावें काय ? छे, परंतु अमळ कान दिला असतां क्षणोक्षणीं ऐकूं येणारे तिचे ते कष्टी होऊन टाकलेले सुस्कारे व डोळ्यांतून निघून जमिनीवर टपृटप् गळणारे असे ते अश्रू तिची स्थिति कांहीं निराळीच आहे असें दाखवीत आहेत. मग काय असेल तें असो ! अहाहा ! तें पहा तिनें आपलें डोकें उचलून ज्या बाजूला दिवा आहे त्या बाजूला तोंड करून आपला उजवा गाल त्या खुंटयावर ठेविलेल्या हातावर ठेविला. या वेळीं तिच्या त्या दुःखानें म्लान झालेल्या परंतु अत्यंत सुंदरशा गौरवर्ण गालांचें, ज्यांच्या पापण्यांवर क्षणमात्र मोत्याप्रमाणें चकाकून घळ-कन् खालीं येताहेत अशा अश्रूंनीं पूर्ण अशा विशाळ डोळ्यांचें, व त्या रेखलेल्या कमानदार भिंवयांचें वर्णन कोण करूं शकणार आहे ! आपल्या कल्पनेनेंच अशी मूर्ति उत्पन्न करून पहा, म्हणजे झालें. ते पहा तिला राहून राहून हुंदके येताहेतसें दिसतें. ती आपले डोळे किंचित् उघडते न उघडते तोंच अश्रूंचा पूर आल्याकारणानें तिला ते पुनः झांकावे लागत आहेत ! ते अश्रू पुसण्यास ती आपला हात क्वचित्च काढीत आहे. तिला स्वतःचें कांहीं भानच नाहीं असें दिसतें. नाहीं तर असें झालें नसतें. मग या तिच्या अप-रिमित दुःखाचें कारण काय असावें बरें ? छे, कांहींच अटकळ बांधतां येत नाहीं. ती जर आपल्याशीं कांहीं बोलेल तरच कांहीं समजण्याचा मार्ग आहे, नाहीं तर कांहीं दिसत नाहीं. किंचित् वाट पहावी म्हणजे बरें पडेल—हं—ती पहा कायसें पुटपुटली. ती काय म्हणते तें ऐकूं या—"देवा नारायणा ! कशाला मला जन्माला घातलंस ? जर मला मुळींच सुख द्यायचं नव्हतं तर—" काय झालें ! अरे ! पुढें कांहीं नाहीं !— एवढ्यावरून काय समजावें ? ज्या अर्थीं ही इतकी अगदीं स्फुंदून स्फुंदून एकसारखी रडते आहे, त्या अर्थीं तिला कांहीं तरी जबरच दुःख असलें पाहिजे, यांत कांहीं संशय नाहीं. तिच्या एकंदर स्थितीवरूनही खरोखर तिच्या म्हणण्याप्रमाणेंच ईश्वरानें तिला आजपर्यंत दुःखांत ठेविलें असावें असें वाटतें. तिच्या त्या स्वरूपाला बिलकुल न शोभाणारें किंवा

इयमधिकमनोज्ञा वल्कलेनापि तन्वी
किमिवहि मधुराणां मण्डनं नाकृतीनाम् ।

या दुष्यंताच्या म्हणण्याप्रमाणें अधिक शोभा आणणारें तें पदराशीं फाटलेलें जुनेर, ती दंडावर चिरकलेली चोळी व स्वत: सुवर्ण असून ज्यांना सुवर्णाचा फारच थोडा स्पर्श आहे, असे गळा, हात इत्यादि अवयव, हीं सारीं तिची दरिद्रावस्था स्पष्टपणें दाखवीत आहेत. हें तर तिच्या दुःखाचें कारण नसेल ना ? परंतु बाह्यत: इतक्या या सुंदर आकारावरून तिच्या उदात्त मनाला दारिद्र्याविषयीं इतकें वाईट वाटत असेल, असें वाटत नाहीं. तें कांहीं कारण असेल; मुळींच नाहीं असें कांहीं म्हणतां येणार नाही; कारण ज्याला आपल्या दरिद्रतेविषयीं मुळींच वाईट वाटलें नाहीं, असा एकही मनुष्य जगावर सांपडणार नाहीं. आपल्याजवळ आहे त्याच्यापेक्षां जास्त पाहिजे, अशी इच्छा प्रत्येक मनुष्याला आहे; व अशी इच्छा जर आहे, तर आपली आहे ही स्थिति कांहीं चांगली नाहीं असें साहजिकच ज्याला त्याला वाटणार आहे.

ती स्त्री याप्रमाणें दुःखामध्यें चूर होऊन बसली असतां तिला आसपास कांहीं चालल्याचा देखील भास झाला नाहीं. तिचें एकसारखें लय लागलें होतें. इतक्यामध्यें एक दुसरी स्त्री दुसऱ्या खोलींतून बाहेर पडली. ही स्त्री पोक्त वयाची होती असें तिच्या चेहऱ्यावरून दिसत होतें व तिचें तें फेंदारलेलें नाक व चढविलेले डोळे, यांनीं ती रागावली आहे असेंही दिसलें. ती जी तडक आली ती त्या तरुण व सुंदर स्त्रीजवळ येऊन, तिनें त्या नाजूक स्त्रीच्या कमरेंत एक लाथ मारली व मोठ्यानें " तुला उठवलें तें असें बसायला का उठवलं ?— असं बसणं तुझ्या नशिबीं असतं, तर मग काय पाहिजे होतं ! ! पांढऱ्यापायाची अवदसा कुठली ! ! इतका वेळ आपली रडत बसलीस अं ! ! ! मीं म्हटलं पोरीची जात आहे, आतां दळायला लागेल,मग लागेल एक प्रहर झाला, उठवून बसवली ! आतां हें इतकं पायलीभर दळण कोण तुझा बाप येऊन दळील का ? तो तरी कुठें अवदसेनं ठेवला आहे ? हं चल लाग दळायला ! "— ती कमरेंत बसलेली लाथ लागल्यावर व ते कठोर शब्द ऐकल्यावर त्या स्त्रीची स्थिति काय झाली असेल याची कल्पना करणें मोठें दुरापास्त आहे. बिचारीची अगदीं त्रेधा उडून गेली. एवढ्या जोरानें लाथ बसली परंतु तिनें हूं कीं चूं देखील केलें नाहीं. झट्कन् त्या तोकड्या व त्यांतल्या त्यांत फाटक्या पदरानें डोळे पुसले. क्षणोक्षणीं येणारे हुंदके जसेच्या तसे आंव-

रून धरलें; हो— न जाणो आणखी एकादी लाथ बसली तर—आणि दळूं लागली. इतक्या अवकाशांत त्या पोक्त बाईची बडबड चाललीच होती. ती एकसारखी शिव्यांचा भडिमार करीत होती, तेवढ्यांतल्या तेवढ्यांत तिनें त्या सुंदर स्त्रीच्या आईबापांचीं, चुलत्या मामांचीं हजार वेळां नांवें काढलीं. तिला फुटक्या कपाळाची, भिकारडी, अवदसा, कैकाडीण असें तर कितीदां म्हटलें याचा नेमच नाहीं. इतकें सर्व चाललें होतें ; परंतु त्या तरुण स्त्रीच्या तोंडांतून एक अवारक्षही निघालें नाहीं. मग त्या दोघींचें असें काय नातें असेल तें असो !

याप्रमाणें स्थिति झाल्यावर ती तरुण स्त्री जात्यांत वैरण घालून लागलीच दळूं लागली. इकडे त्या रागावून गेलेल्या पोक्त बाईच्या तोंडाचा पट्टा चालूच होता; परंतु तो जात्याच्या घरघरीमुळें फारसा ऐकूं येत नव्हता. मधून मधून—"हं: आतांच्या कारट्यांना कामंच करायला नकोत— आम्ही अशा होतों तेव्हां आम्हांला आमच्या सासूबाईनीं कधी असं बसूं दिलं नाहीं, आम्ही आधी अशा बसलोंच नाहीं, म्हणा ! हे आपले हणगोबा ! गळगळाघाशीं गिळायला सांगा तेवढं !— छे ! छे ! छे ! बाई या कारटीनं तर माझें धिंडवडे मांडले आहेत. " अशा तऱ्हेचे शब्द ऐकूं येत होते. अशा तऱ्हेची बडबड चालतां चालतां मध्येंच त्या पोक्तबाईनें त्या तरुण स्त्रीच्या उजव्या हातावर एक चापट मारली, व तिचा गालगुच्चा घेऊन ती तिला म्हणाली, "कायग, काल शनवार तुझ्या ध्यानांत नाहीं का ? आं ! पोतेरं कुणीं तुला घालायला सांगितलं ? आपलं कसं तरी काम करायचं ! ( आणखी एक गालगुच्चा घेऊन ) गाढवी? तुझ्या मनांत तरी काय आहे ! पांढऱ्या पायांची अवदसा ! सटवी ! घरांत आल्यापासून एक दिवस दिखील कुणाला सुख नाहीं !—आणखी कायग, त्या वारीच्या जवळ काय तुझं एवढं हित-गुज चाललेलं असतं ? सारा दिवस उठल्या सुटल्या आपली त्यांच्या घरांत जाऊन बसतेस ती ? तिच्याशीं काय एवढं तुझं असतं ! हज्जारदां तुला सांगितलं, कीं तूं आपली जागा सोडून जात जाऊं नकोस म्हणून ! कां जातेस तूं ? कां जातेस सांग ! तुला एक लक्ष वेळां सांगितलं ना, कीं तूं कांहीं त्यांच्या घरांत जाऊं नको म्हणून—जाशील पुन्हां ?—दम धर. तुला असं थोडं थोडकं नाहीं मारून पुरायचं; चांगली आठवण राहीलसं केलं पाहिजे.—कितीदां माझ्या मनांत येतं, कीं चांगला एकदां उलथन्याचा चरका द्यावा. पण म्हणतें, कीं लोकाची पोर ! हो मी कधीं अंगाला हात

दिखील लावीत नाहीं कीं तोंडानं फारसं बोलत नाहीं, तर इतके लोकांत भंडवडे झाले आहेत ! त्यांत असं कांहीं केलं तर काय होईल आणखी काय नाहीं ! ”

हें त्या पोक्त स्त्रीचें बोलणें चाललें असतां मध्यंतरीं कितीक वेळां त्या सुंदर गालांचे त्या क्रूर स्त्रीच्या खरखरीत बोटांनीं गालगुच्चे घेतले असतील व त्या गोंडस हातावर, नाजूक गालावर किंवा नेसतें जुनेर अपुरतें असल्या-कारणानें किंचित् उघडच्या पडलेल्या, लांब केलेल्या पायाच्या मांडीवर किती वेळां चापटचा बसून त्या कठोर बोटांनीं आपली लांबी व जाडी दाखविली असेल, हें कांहीं या ठिकाणीं सांगावयास नको. त्याचप्रमाणें इतका मार मिळाला तरी, व त्या स्त्रीच्या तोंडून इतके शब्द ऐकले तरी आमची ही तरुण स्त्री एकही शब्द न बोलतां क्षणोक्षणीं बाहेर फुटावयास पाहणारे ते हुंदके जितके आंवरतील तितके आंवरीतच होती, हेंही म्हणजे येथें सांगणें अवश्य आहे असें नाहीं. हातावर, पायावर व गालावर चापटचा बसल्यानें एवढें मात्र झालें, कीं त्यायोगानें होणाऱ्या वेदना सहन न झाल्या-मुळें हृदयाचें होणारें पाणी डोळ्यांच्या वाटेनें बाहेर पडूं लागे व तें गालावर आलें न आलें तोंच त्या तोटक्या पदरानें झट्कन् पुसावें लागे. हो ! न जाणों तें दृष्टीस पडलें तर आणखी एखादा रट्टा बसावयाचा किंवा त्यामुळें रट्टा जरी बसला नाहीं तरी खालीं असलेल्या पिठांत जर एखादा अश्रुबिंदु पडला तर सारें पीठ वायां नाहीं का जाणार ! अहाहा ! अशा चमत्कारिक स्थितींतही जिच्या मनांत इतका चांगला विचार येत होता, ती स्त्री कोणत्या तऱ्हेची असावी व तिला ज्या तऱ्हेची वागणूक आज मिळाली तशीच जर रोज मिळत असेल तर तिला ती योग्य होती कीं नाहीं या गोष्टी आपोआप समजणार नाहींत काय ? ती निर्दय स्त्री इतक्या कठोरपणानें आपल्या तोंडानें व हातानें छळीत असतां जिनें एकही हुंदका बाहेर न पडूं देण्या-विषयीं यत्न चालविला होता; त्याचप्रमाणें जिनें आपल्या तोंडून एक अवा-क्षरही काढलें नाहीं; व जिनें तितक्यांतल्या तितक्यांत मनांत येणाऱ्या नाना विचारांस एकीकडे सारून, कितीही खटपट केली तरी बाहेर आल्यावांचून न राहणारे अश्रु, खालच्या पिठांत पडून त्याचा नाश होईल या भीतीनें, सर तुटल्याबरोबर ओघळून पडणाऱ्या मोत्यांप्रमाणें पापण्यावरून गालांवर ओघळले नाहींत तोंच पदरानें टिपून टाकण्यांत तत्परता दाखविली, ती स्त्री सद्गुणी व आपल्या कामांत नीटनेटकी व टापटिपीची असावी असें वाटल्या-

वांचून कसें राहील ? साहजिकरीत्या असें वाटेलच. आणि असें जर आमच्या वाचकांस वाटेल तर आम्ही त्यांस दोष न देतां उत्तेजनार्थ थोडी• बहुत त्यांच्या चाणाक्षपणाची तारीफच करूं. कारण, खरोखरीच ती तरुण व सुंदर स्त्री आपल्या रूपाशीं विरोध असणाऱ्या अशा स्वभावाची नव्हती; ज्याप्रमाणें ती शरीरानें गौरवर्ण होती, त्याचप्रमाणें तिचें मनही स्फटिकासारखें शुद्ध होतें. त्यांत वेडेंवांकडें कांहीं एक नव्हतें. तिच्या चेहऱ्याप्रमाणेंच तिचा स्वभावही मोठा गोड व मन आकर्षण करून घेणारा होता. आज पांच सहा वर्षें सतत वहात असूनही ज्याप्रमाणें तिच्या त्या विशाळ नेत्रांतील पाणी नाहींसें झालें नव्हतें, त्याप्रमाणेंच अनेक संकटें आलीं तरी तिच्या त्या पाणीदार मनाचेंही पाणी संपलें नव्हतें. ती मोठी धीराची होती ! काय करील बिचारी धीर सोडून ? ती मोठी निश्चयी होती. एकदां जी गोष्ट तिच्या मनांत आली ती केल्याखेरीज कधींही रहावयाची नाहीं. या तिच्या निश्चयीपणांत एक मात्र मोठी गोम होती. ती ही कीं, त्या निश्चयीपणाचा कल थोडासा हट्टाच्या बाजूला जात असे. परंतु तिला लहानपणापासून कोणाचा ना कोणाचा तरी फार धाक असल्याकारणानें व तिचे लाड केव्हांही न पुरल्याकारणानें तिचा हा हट्ट अगदीं नाहींसा झाल्यासारखाच होऊन मनाचा निश्चयीपणा मात्र कायम राहिला होता. ती विचारी होती. हें सर्व होतें खरें; परंतु ज्या तऱ्हेनें वर वागविलें आहे त्याच तऱ्हेनें नेहमीं वागविल्याकारणानें तिच्या त्या सुंदर स्वरूपाचें व त्याबरोबर त्या अमोल गुणांचें, दोहींचेंही मातेरें झाल्यासारखें झालें होतें. तिला गेल्या पांच सहा वर्षांत त्या क्रूर सासूपासून एकही चांगला शब्द मिळाला नव्हता. बरें चांगलें बोलणें नाहीं तर नाहीं; मार तरी नसावा कीं नाहीं ? परंतु तेंही नाहीं. रोज थोडा ना थोडा तरी मार हा आपला तिला मिळतच असे. बरें एकटी सासूच अशा तऱ्हेनें वागवीत असे असें नाहीं ! बाईलबुद्धे सासरे व रिकामटेकटे नवरोजीपंत हेही त्याच प्रकारचे ! आणि घरांतील माणसें अशा तऱ्हेचीं असल्यावर शेजारीपाजारी तरी काय म्हणून तिला बरें म्हणतील !

अरे, पण लिहितां लिहितां आम्ही कोणीकडे वाहवलों ! तिकडे ती निर्दय सासू (ही पोक्त स्त्री त्या तरुण स्त्रीची सासू होय हें वरील वर्णनावरून वाचकांच्या लक्षांत आलें असेलच) त्या गरीब सुनेचा बुचडा धरून तिच्या मानेस जोरानें हिसडा देऊन काय बोलते आहे पहा.—हं, पुरे झालं. दिवे लावलेत !

उठा आतां पांच वाजायला आले; आणखी वेणी–फणीनं तरी मग नको वेळ जायला ! चल बसलीस काय ? ऊठ, जेवल्यावर सारं काम आटपलं कीं मग बसा पुन्हां फतकल् घालून. रांडेच्यांनो ! दीड प्रहर झाला तुला उठून बसवलं आणखी एक घासभर देखील दळण झालं नाहीं, तेव्हां आश्चर्य नाहीं तर काय म्हणावं ? ऊठ ” असें आणखी म्हणून त्या तरुण स्त्रीला उठून उभें रहाण्याचा अवकाशही न देतां तिनें हाताचा व्यापार चालविलाच होता. तेव्हां मात्र तिला रडें अगदीं आंवरेनासें होऊन हुंदका एकदम बाहेर पडला. आणि हा हुंदका बाहेर पडला मात्र, तों आमच्या सासूबाईंचा क्रोधाग्नि अगदीं भडकून जाऊन त्याची ज्वाला पुन्हां तोंडानें व हातानें बाहेर पडली. “ कां रडायला काय झालं ? कांहीं कुणीं मारलं का आहे ? अंमळ हात नाहीं लागला तों लागली रडायला ! अहाहाग नाजूक भवानी–गोरी गोमटीन् नरदेव करंटी कुठली ! रड तर खरी, म्हणजे सांगेन कसं काय आहे तें ! आणखी बाहेर लोकांनीं ऐकून “ **रखमाबाई** ना ? मोठी कठीण बायको हो ! ” असं नको का म्हणायला ?–ऊठ म्हटलं आपली ! उठली ! तें पीठ कोण गोळा करील ? आई येईल का करायला ! ती तरी कुठें आहे धड ! ती लोकांच्याच इथें तुकडे गिळते आहे. अहाहाग अवदसे! कोणत्या नक्षत्रावर उपजलीस कुणाला ठाऊक ? एक तरी कांहीं असायचं होतं धड !–हं करा ! करा तें पीठ गोळा, का आणखी एक पाहिजे लाथ ?”

हें या बाईचें बोलणें चाललें आहे तों दुसरी एकबाई दारांतून डोकावून म्हणते, “ कां **रखमाबाई**, आज पहांटेच अगदी प्रारंभ झाला वाटतं ?–छे, बाई बाई बाई. तुम्ही तरी किनई **रखमाबाई** भारीच बोलतां हो ! अहो, सक्काळ उजाडली नाहीं, तों आपलं तुमचं झालं सुरू !– इतकं कायहो ती करते बरं ? ”

**रखमाबाईः**– पुरे तुमचं ! या तुमच्या सारख्यांच्या बोलण्यानं तर ती शिरजोर होऊन बसली आहे. तुमच्या हाताखालीं हवी होती नांदायला. म्हणजे मग पाहिलं असतं तुम्ही काय म्हणतांन् कसं करतां तें– अहो, या कारटीनं पुरा छळवाद मांडला आहेन् बरं आमचा ! तुम्हाला काय सांगूं ! तुम्ही रोज पाहतां आणखी असं म्हणतां तेव्हां काय म्हणावं ?

**रखमाबाई**च्या मनांतून याच्याहीपेक्षां आणखीही त्या बाईस झाडून टाकावयाचें होतें असें दिसलें; परंतु तिचा तो वृद्धपणा पाहून तिला तसें करतां आलें नाहीं. वरील बोलणें ऐकून ती वृद्ध विधवाबाई पुन्हां म्हणालीः

‘ तसं नव्हे हो **रखमाबाई** ! मी कांहीं तिचा कैवार नाहीं घेत. आपलं म्हटलं पहांटेच्या प्रहरींच काय चाललंय् म्हणून डोकावलं. अहो, यांना आतां वळण नाहीं लावायचं तर लावायचं तरी केव्हां ? मडक्याचा कांठ ओलेपणीं लवला नाहीं तर पुढें कधींच लवायचा नाहीं—मी का पहात नाहीं का काय ? तुम्ही का तिला वावगं का सांगतां ? आमची ही **यमुना** अशी होती लहान-पणीं—असंचग बाई तिनं मला छळलं आहेन् ! अजून तरी काय, तिचा कांहीं स्वभाव गेला नाहीं—पण आपलं नवऱ्याला बाईल आवडते—मग आपलं काय जातं ? आपण आतां बोलायचंच सोडून दिलं.—”

**रखमाबाई**ः— नवऱ्याला आवडते ! तुम्ही आपल्या गरीब म्हणून ! मी नाहींग बाई असं चालूं द्यायची. काय तरी बाई ! माझा **विन्या** नाहींच मुळीं असा. तो हिला खेटरावारी मोजतो. हें असलं रत्न कुणाला आवडेल हो ?— उगीच नाहीं त्या काकांनीं कसं तरी लवकर लग्न करून टाकलं ! त्यांना असाच उच्छाद् आणला असेल कारटीनं. अन् घर तरी कुठें मिळत होतं सटवीला ! आमच्या इथला आपला सारा भोळा कारभार. आपलं त्यांनीं सांगितलं “आमची मुलगी करा.” इथें आपलं म्हणायचं ‘हो’ म्हणून ! एक दिखील हो माझी कीं पोराची हौस पुरली नाहीं.— बसा तरी, उभ्या कां ? ”

हें सरशेवटचें बोलणें ऐकून ती विधवाबाई “ नको बाई, उशीर झाला; अजून परसाकडला जायचं आहे ” असें म्हणून हातांतली दिवली व तपेली खालीं ठेवून बसली.

**रखमाबाई**ः— जाल आतां; तुम्हांला काय, कांहीं काम नाहीं, कांहीं नाहीं.— ( त्या तरुण स्त्रीकडे पाहून ) आपल्याला असं उभं नाहीं राहायला सांगितलं. आपली मी बसलें गोष्टी सांगत आपणय् राहिली उभी ऐकत— नीघ इथून ! ”

असें म्हटल्याबरोबर दळावयास घेतलेलें धान्याचें सूप उचलून घेऊन, व तें गोळा केलेलें चिमूटभर पीठही घेऊन, ती तरुण स्त्री तेथून निघून आंतल्या खोलींत गेली. इकडे **रखमाबाई** त्या विधवाबाईकडे वळून पुनः म्हणतातः—

“ तुम्हाला काय सांगूं **आजीबाई**, ही कारटी घरांत आल्यापासून कुणाला सुख नाहीं. अहो लग्न झालं एवढं, तर माझ्या **विन्याला** एक पागोट्याचं चिंधुक नाहीं, कीं पोरगं झणत होतं तर एक सहामाशाची अंगठी देववली नाहीं. भिकारडीं मेलीं ! आधीं सारं त्या **काशिनाथ**तंतताच्या जिवावर गळागळाघाशीं खाताहेतन् देतील कुठून ! काय आमच्या इथें पहाणं झालं,

अन् ही पांढऱ्या पायांची अवदसा घरांत आणली कुणाला ठाऊक ! कांहीं माझा मुलगा अमर्दी तसाच का राहिला असता ? गर्भाधानाचं तर तुम्ही पाहिलंतना काय झालं तें—कांही तरी मेल्यांनीं करायचं होतं ! छे बाई, असं कांहीं मीं कुठें पाहिलं नाहीं. **काशिनाथ**पंतानं एक नाहीं कांहीं दिलं, पण त्या आईनं तर गाढवीनं कांहीं द्यायचं ! तिच्याजवळ कांहींच का नव्हतं ?

**आजीबाई**:— असंच कायसं बाई करतात बायका. आमच्या **यमना**-च्या माहेरच्यांनी दिखील अस्सं केलं. अहो गांवांतल्या गांवांत चार दिवस वाढणं दिखील नाहीं आणलं !

**रखमाबाई**:—अहो, इथें काय उजेड पडला ? तेव्हांचं एक असो. आतां, आज दोन वर्सं झालीं, तिचा भाऊ इथें तें **काळोज** का **काळीज** कायसं आहे; तिथें येतो; आला तर बहिणीशीं बोलतो दोन शब्द्न् आपला चालता होतो. दुसऱ्या कुणाशीं बोलेल तर शपथ. अरे आम्हीं काय केलं असं तुझं ? कधीं बहिणीला रुपयाभर खाऊ कीं कांहीं, कीं कांहीं ! रामाचं नांव ! आमचा **विनू** सांगत होता कीं त्याला कायशी तिथें कालक्षोप आहे म्हणून !

**आजीबाई**:— काय आहे ?

**रखमाबाई**:— काय बाई म्हणतात कुणाला ठाऊक ! मला नाहीं त्याचं तें नांव येत. कायसं म्हणत होता **विनू** कीं त्याला कांहीं पगार आहे म्हणून— माणसाला द्यावंसं वाटत नाहीं एवढी गोष्ट खरी ! नुसता तोंडाचा गौरव ! गोदूताई, गोदूताई करूनच हैराण ! आणखीन् कांही नाही.

**आजीबाई**:— करील हो आतां त्याला चाकरी लागली म्हणजे ?

**रखमाबाई**:— तेवढेच आतां दिवे लागायचे राहिले आहेत !

अशा तऱ्हेनें त्या दोघींचें बोलणें झाल्यानंतर ती आडवा पदर घेतलेली म्हातारी उठली व ‘ चला उजाडलेंच आतां ’ असें म्हणत त्या खोलींतून चालती झाली. इकडे पलीकडल्या खोलींतून एक वार्धक्याच्या जवळ आलेला मनुष्य आला व हळूच “ कायग पहाटे तीन वाजल्यापासून उठून वटवट चालविली आहे ! ” असें म्हणाला.

त्यावर **रखमाबाई** मानेला एक हिसडा देऊन म्हणतात “ हो, असंच म्हणत जायचं आणखी तिच्या देखत, बरं का ! असं म्हणून म्हणून तर तिला एवढी डोक्यावर बसवून ठेविली. मारून कारटीला जेरबंदा-खालीं सडकून टाकावी तें राहिलं एकीचकडे आणखी उलट मलाच ‘ काय चालवली वटवट ’ म्हणून म्हणायचं ! तें सांगतेंना. **सासूबाई** म्हणत असत

तें कांहीं खोटं नाहीं. त्या नेहमीं म्हणत " आमच्या घरच्या पुरुषांत किनई, पाणीच नाहीं " मलातर त्याचा अगदीं पक्का अनुभव आला. आणखी तो पोरटा **विन्या** दिखील एक प्रतिमा.

**गृहस्थः**—पुरे; पुरे; आतां फार चालला शहाणपणा वाहावत. आज त्या **महाशब्द्यां**च्या इथें गर्भादान आहे तिथें जायचंय् मला. लवकर पाणीबिणी दे. **विन्या** नाहीं का आला अजून ? काय करतो गाढव; अभ्यासाला म्हणून बाहेर जाऊन कुणाला ठाऊक ! गाढवाचा लेक पंचवीस वर्षांचा झाला, अजून सहाव्या इयत्तेची परीक्षा होईना ! मला कांहीं त्याचं ठीक नाहीं चिन्ह दिसत !

**रखमाबाईः**—( हंसून ) इश् हें काय असं गाढवाचा लेक म्हणावं ! तो आपला बिचारा अभ्यासांत मगन असतो; आपला अभ्यास बरा कीं आपून बरा ! त्याला कांहीं तरी दुसरं ठाऊक आहे का ! पहा आतां, इथें अभ्यासाला जागा नाहीं तर आपला सोबत्याच्या इथें जातो ! सोन्यासारखं पोर माझं, त्याला आपलं उगीच काय असं म्हणावं !

**गृहस्थः**—आपल्या बोडक्याचा अभ्यास करतो ! चल मला पाणीबिणी दे परसाकडला जायला ? रिकामटेकडीं कारटीं शिंचीं चकाट्या पिटीत असतील ? कसला अभ्यासनी कसलं काय ? हं चल जाऊं दे मला.

**रखमाबाईः**— चल चल काय ? माझ्याच्यानं नाहीं उठवत आतां. त्या कारटीला काय झालं पाणीबिणी द्यायला. कारटीला स्वतांची अक्कल म्हणून, अंहः रामाचं नांव ! कायग ए अवदसे, कांहीं तपेलीबिपेली भरून द्यायचं आहे का ठाऊक ? का येऊं एक कमरेंत लाथ द्यायला ?

**गृहस्थः**—काय हें असं बोलतेस हें ! तुझ्या किंनई जिभेला हाड नाहीं ! तें तोंड तरी काय मातीबितीचं असतंत् फुट्टनय् गेलं असतं. कातड्याचं आहे म्हणूनच टिकलंय्.

**रखमाबाईः**—बरं बरं. माझं कातड्याचं; आणखी इकडे कसलं—खापराचं का आहे ? आपलं पोर नाहीं सोर नाहीं. साऱ्यांच्या देखत हें काय नेहमी बोलणं—पुन्हां असं बोललं तर माझ्या कांहीं कामीं पडायचं नाहीं.

वरील संभाषणावरून तो गृहस्थ, **रखमाबाई, विन्या** व ती तरुण स्त्री यांचा परस्परांशीं संबंध काय, व ती तरुण स्त्री कोणाची कोण असावी याविषयीं वाचकांनीं खात्रीचे तर्क केले असतील; परंतु तर्क करण्यांत त्यांचीं डोकीं गुंतविण्यापेक्षां मी होऊनच त्यांची सारी हकीकत देतों.

---

# प्रकरण ४ थें.

## विठ्ठलभट, रखमाबाई व विनोबा.

ती तरुण स्त्री आमचा द्वितीय नायक म्हणा, अगर नायकाच्या बरोबरीच्या दर्जाचें पात्र म्हणा जो **नाना** त्याची सख्खी बहीण **गोदावरी** होय. **गोदावरी नाना**पेक्षां तीन वर्षांनीं लहान होती. तेव्हां बापाच्या मरणाच्या वेळेस तिचें वय सारें एकच वर्षाचें होतें, हें वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. हल्लीं **नाना**चें वय २० । २१ वर्षांचें होतें व त्यावरून पहातां **गोदावरी**चें वय १७।१८ वर्षांचें होतें. **गोदावरी**चें सारें लहानपण **काशीनाथपंतां**च्याच येथें गेलें व तिचें लग्नही त्यांनींच केलें हें मागेंच वाचकांस कळलें आहे. **गोदावरी** जेव्हां मोठी झाली, तेव्हां लोकलज्जेस्तव **काशीनाथपंता**नें कसें तरी तिचें लग्न करून टाकलें. लग्नांत ती चांगली अकरा वर्षांची झाली होती. स्वरूपानें चांगली असल्याकारणानें पुष्कळांना ती आपली सून, आपली भावजय किंवा आपली बायको व्हावी असें वाटे व तिला पुष्कळ लोकांनीं मागण्या घातल्यासारखेंही केलें होतें.

इकडे अशी मजा होती कीं, ती स्वरूपानें चांगली असल्याकारणानें **सीताबाई** तिचा फार हेवा करीत असे. तिची स्वतांची मुलगी होती ती अगदींच साधारण असल्याकारणानें ( या मुलीचा इतिहास यथावकाश येईलच. ) व वर्णानें तर धुतल्या कोळशाची स्पर्धा करणारी असल्यामुळें **गोदावरी**विषयीं तिच्या मनांत द्वेष उत्पन्न झाला होता. **सीताबाई**चा स्वभाव कसा होता हें वाचकांस थोडें बहुत कळलेंच आहे. तिला आपण श्रीमंत, **गोपिकाबाई**सारख्या भिकारडीला तिच्या पोरांसकट पोसतों, याचा मोठा गर्व असे व ती तसें नेहमीं बोलूनही दाखवीत असे. **गोदावरी** व **नाना** व त्याची आई हीं आपल्या घरीं आणलीं तीं निवळ लोकलज्जेकरितां, मग त्यांना हवें तसें कां वागवूं नये? त्यांतून असें होतें कीं **गोदावरी** ही लहानपणापासून टापटिपीनें वागण्यास शिकलेली, स्वच्छ व गोड बोलणारी असल्याकारणानें **काशीनाथपंतां**च्या घरीं जो कोणी येईल तो आधीं तिला घेत असे व '**काशीनाथपंत**, तुमची पुतणी फारच चांगली आहे बोआ'

असें म्हणत असे. **सीताबाई**च्या मुलीस कामकाजानिमित्त आलेल्या तोंड-पुजे लोकांशिवाय कोणीच हात लावीत नसे. उलट **काशीनाथपंता**चे जे अत्यंत सलगीचे स्नेही असत ते मुद्दाम **सीताबाई**ला चिडवीत असत. अशी स्थिति असल्याकारणानें **सीताबाई**, **गोदावरी**कडे पाहून नेहमीं कपाळाला आंठ्या घालीत असे. ती **गोपिकाबाई**च्या देखत नेहमीं " भिकाऱ्यांना बाई नेहमीं पोरं गोरीं गोमटीं, पण कपाळ करंटीं किती केलं तरी ! " असें म्हणे. हे शब्दच ऐकून त्या **गोपिकाबाई**च्या मनाची स्थिति काय होत असेल बरें ! जों जों **गोदावरी** मोठी होत चालली तों तों **सीताबाई**चा तिच्याबद्दलचा द्वेष अधिक अधिकच वाढत चालला. प्रथमतः जोंपर्यंत **गोदावरी** लहान होती तोंपर्यंत तिला समजत नसल्याकारणानें ती थोडासा अचपळपणा करी, व केव्हां केव्हां **सीताबाई**च्या पोरीची खोडीही करीत असे. **सीताबाई**ची मुलगी **वेणू** ही **गोदावरी**पेक्षां एक दीड वर्षानें मोठी होती. परंतु 'अशक्तं दुर्जनं' असल्याकारणानें तिला फारसा अचपळपणा ठाऊक नव्हता; **गोदावरी**नें थोडी जरी खोडी केली तरी ती " ऑई ग्य " करून रडत असे. आणि तो आपल्या बच्चड्याचा सुस्वर शब्द कानीं पडण्याबरोबर **सीताबाई** अगदीं शिंगें रोखूनच धांवत येत असे व मग खोडी केल्याबद्दल **गोदावरी**स असेल नसेल त्या शक्तीचा उपयोग करून मार देत असे. **गोपिकाबाई**चा स्वभाव जर होता त्यापेक्षां किंचित् निराळा असता तर खात्रीनेंच त्यांचें भांडण झाल्याविना राहिलें नसतें. पोटच्या, त्यांतून धाकट्या पोरीस आणि परक्या बाईनें मारलेलें पाहून साधारण आईचें तर हृदय कधींही उगीच राहिलें नसतें. परंतु गरीब व काळावर नजर देऊन राहिलेली ती **गोपिका-बाई** ! तिनें जणूं काय पतीच्या प्रेताबरोबर राग, लोभ, हीं सर्व जाळून टाकलीं होतीं ! वर सांगण्यांत आलेंच आहे कीं, **गोदावरी** जों जों मोठी होत चालली तों तों **सीताबाई**चा तिच्याविषयींचा द्वेष वाढतच चालला. **सीताबाई**ची मुलगी **वेणू** हिच्या लग्नाचें जेव्हां घाटूं लागलें, तेव्हां कित्येक स्नेही मंडळींनीं असें सुचविलें कीं, **गोदावरी**चें व **वेणू**चें दोघींचीं लग्नें एकदमच आटपून घ्यावीं; **सीताबाई**च्या मनास तें येईना. कारण तिला असें वाटलें कीं, दोघींचीं लग्नें एकदम केल्यास **गोदावरी**ला **वेणू**च्या सारखें बरेंच करावें लागेल, तेव्हां तें बरें नाहीं. हें बरें न वाटण्याचीं कारणें, एक तर पैशाचा लोभ, व दुसरें **गोदावरी**ची व आपल्या पोरीची बरोबरी होऊं नये ही इच्छा. कित्येक वेळां तर अशी मजा झाली कीं, **वेणू**ला पहावयास

आलेल्या लोकांनीं **गोदावरी**ला पाहून " आम्हांला ही मुलगी द्याल तर हुंडच्यापांडच्यावांचून दिखील करूं " असें म्हटलें हे शब्द ऐकल्याबरोबर त्या **सीताबाई**च्या अंगाचा जो काय तिळपापड उडत असे तो तर पुसूंच नये. या दोन तीन गोष्टींमुळें **सीताबाई**नें नवऱ्याच्या पाठीस लागून असें ठरविलें कीं **गोदावरी**चें लग्न एव्हां करावयाचें नाहीं. **वेणू**चें लग्न झाल्यावर ( तें कसें काय झालें वगैरे सर्व हकीकत पुढें कळेल ) दोन वर्षेपर्यंत **गोदावरी**च्या लग्नाविषयी त्या दोघां नवराबायकोनीं एक अवाक्षरही काढलें नाहीं. कित्येक लोकांनीं त्यांना त्याबद्दल विचारलें, परंतु **सीताबाई**च्या सांगण्यावरून तो बाइलबुद्ध्या **काशीनाथपंत** ज्याला त्याला " करूं पुढें; एव्हांच काय घाई आहे ? " असें उत्तर देत असे.

पुढें जेव्हां लोक फारच त्रास द्यावयास लागले, तेव्हां **सीताबाई**च्या उपदेशाप्रमाणें **काशीनाथपंतांनीं** एक स्थळ पाहिलें; तें भिक्षुकाचें होतें. **विठ्ठलभटजी** हे पुण्याचे भिक्षुक ब्राह्मण. त्यांच्या यजमानांच्या मुलीचें लग्न होतें; त्या यजमानाचे भावि सोयरे आमचे **गोविंदराव** दप्तरदार हे होते. **गोविंदराव दप्तरदारानीं** अर्थातच आपल्या व्याह्यांस आपण ज्या गांवीं होते त्या गांवीं लग्नासाठीं बोलावलें. **विठ्ठलभटजीं**च्या यजमानांचा मुलीकडचा पक्ष, तेव्हां त्यांनीं तें म्हणणें कबूल केलें, व ते **गोविंदराव दप्तरदारां**च्या गांवीं मुलीच्या लग्नाकरितां आले. ते आले तेव्हां अर्थातच त्यांच्याबरोबर त्यांचे उपाध्याय **विठ्ठलभटजी**, उपाध्यीणबाई **रखमाबाई**, व उपाध्येबोवांचे चिरंजीव **विनोबा** हीं तिथें आलीं. या लग्नांत आमच्या **सीताबाईनीं** हें भिक्षुकाचें स्थळ चांगलें असून **गोदावरी**ला सासूही बरी आहे असें टेहळलें व नवऱ्याच्या पाठीस लागून लागलींच लग्न उरकून टाकण्याचाही घाट घातला. **दप्तरदारांच्या** येथील लग्न आटोपलें नाहीं तोंच हें लग्न ठरलें. **गोविंदराव दप्तरदारां**स हें **काशीनाथपंता**चें करणें आवडलें नाहीं. कारण त्यांची **गोदावरी**वर, ती त्यांच्या घरीं जात येत असल्याकारणानें प्रीति जडली होती. व एक वेळां तर ही मुलगी आपल्यास सून असावी असें वाटून त्यांनीं **काशीनाथपंता**जवळ तशी गोष्ट काढलीही होती; परंतु **काशीनाथपंतांनीं** तें अगदींच थट्टेवर नेल्याकारणानें त्यांस जास्त बोलतां येईना. या प्रसंगीं त्यांनीं हलकेच ' तुम्ही असं लग्न करूं नका. **गोदावरी**ला जेव्हां पाहिजे तेव्हां हवं तसं स्थळ मिळेल, " असें **काशीनाथपंता**स सांगितलें. परंतु **सीताबाई**चा अत्यंत आग्रह पडल्याकारणानें **काशीनाथपंतानें** कोणाचें

कांहीं एक ऐकलें नाहीं व सरतेशेवटीं त्या निर्दय व मत्सरी **सीताबाई**च्या म्हणण्याप्रमाणें व इच्छेप्रमाणें तें अनिष्ट लग्न झालें !

लग्न झाल्यानंतरची **गोदावरी**ची स्थिति वर्णन करणें म्हणजे मोठें दुरापास्त आहे. तिला अमुक एक प्रकारचा सासुरवास झाला नाहीं असें नाहीं. तिच्या सासुरवासाचें वर्णन करूं गेलें तर एक ग्रंथच होईल. वर वर्णन केलेला त्रास म्हणजे तिच्या एकंदर त्रासाच्या मानानें कांहींच नव्हता. भर उन्हाळ्यांत भर दोन प्रहरीं हौदावर जाऊन धुणीं धुणें व तीं आटपलीं नाहींत तोंच मोठी थोरली घागर कंबरेवर घेऊन दहा वीस खेपा पाणी वहाणें; शिवाय रिकामटेकड्या नवरोजीपंताकरितां सदाशिवपेठचें पाणी आणणें,—तें अगदीं हे इकडे जेवावयाला बसल्याबरोबर, ताजें आणिलें पाहिजे; जर उशीर झाला तर लाथाबुक्या आहेतच—केव्हां केव्हां विहिरीचें पाणी ओढणें, दळणें कांडणें इत्यादि कामें तिला करावीं लागत याचें मुळींच आश्चर्य नाहीं. **गोदावरी**सारख्या शहाण्या पोरीला अशा कामांचें कधींही कांहीं वाटलें नसतें व वास्तविक पहातां कामाबद्दल म्हणून तिला कधींच कांहीं वाटलें नाहीं. हेंच काम **रखमाबाई**नें गोडीगुलाबीनें व थोडाबहुत हातभार लावून जर तिच्याकडून करवून घेतलें असतें तर **गोदावरी**च्या मनास काय किंवा दुसऱ्या कोणाच्या मनास काय कांहींच वाईट वाटलें नसतें. ज्याच्या घरीं दारिद्र्य आहे त्याच्या घरीं हीं सर्व कामें घरच्या माणसांनीं केल्याखेरीज कसें चालेल ? अशीं कामें जर मोलमजुरीनें तो द्यावयास लागला तर मग चरितार्थ तरी कसा चालावा ? आणि मजुरीनें देण्यास पैसा तरी कोठून आणणार ? दारिद्र्य हा कांहीं कोणाचा दोष नाहीं. परंतु दारिद्र्य असून कामाविषयीं कधींही कुरकुर नसून जर एखादी सासू आपल्या सुनेला छळील तर तो केवढा अधमपणा म्हणावयाचा ? **गोदावरी**सारखी सून मिळणें म्हणजे खरोखर महत्पुण्य होय. परंतु हें त्या दुष्ट **रखमाबाईस** न समजून त्या गरीब कामधेनूला ती वाघीण अतोनात त्रास देत असे. लग्न झाल्यापासून **गोदावरीस** सुखाचा शब्द कधींही मिळाला नाहीं. माहेर अगदींच बंद झालें. तिकडे **सीताबाई** तशी; इकडे **रखमाबाई** अशा. **गोदावरी**ला घरीं आणण्याची आधीं **सीताबाई**ला फारच हौस आणि त्यांत **रखमाबाई**सारखी दिव्य सासू, मग काय ? "आधींच उल्हास आणि त्यांत फाल्गुन मास ! ! "

**गोविंदराव** दप्तरदारांचे येथील लग्न झाल्याबरोबरच **गोदावरी**चें लग्न झालें हें वाचकांस वर कळलेंच आहे. लग्नाच्या वेळीं अशी मजा झाली, कीं **सीताबाई**-

ईनीं हें स्थळ **गोदावरी**सारख्या, भिकाऱ्याच्या पोरीला बरें आहे असें पाहिलें आणि त्यांनीं **रखमाबाई**च्याजवळ लागलीच गोष्ट काढली. ती गोष्ट काढली त्यावेळीं " मी शें दोनशें रुपये हुंडा देईन, जांवयाला असं करीन तसं करीन, माझ्याच हातांत सारं आहे. " अशा तशा चार गप्पा मारल्या. त्यामुळें **रखमाबाई** भुलून गेली व मुलगीही चांगली आहे असें पाहून तिनें तेव्हांच कबूल केलें. **सीताबाई काशीनाथपंता**च्या व **रखमाबाई विठ्ठलभटजीं**च्या पाठीमागें लागून त्या दोघींनीं आपल्या हातानें तें अनिष्ट लग्न घडवून आणिलें. **विठ्ठलपंता**चे यजमानही ह्या गोष्टीला कबूल झाले. यजमानांच्या लग्नांतील सामान राहिलेंच होतें तें **विठ्ठलपंतास** आयतेंच मिळालें. दागदागिन्यांची कांहीं मोठीशी अडचण नव्हती. कारण ते करायचेच नव्हते.

लग्न जेव्हां झालें, तेव्हां 'आपण फसलों' असें **रखमाबाई**ला पक्कें दिसून आलें. हुंडापांडा आणि करणीबिरणी सारी कानांत गोष्ट झाली ! तेव्हां **सीताबाई**च्या त्या सर्व बाता तिच्या मनांत डांचूं लागल्या व यांचा सूड अर्थातच सुनेवर काढण्याचा तिचा बेत झाला. लग्नांतच तिनें **सीताबाई**ची खूप खरड काढली; आणि हें पाहून त्या दुष्ट **सीताबाई**ला मोठा आनंद झाला. तिला तिची **रखमाबाई**नें फाजिती उडविली, त्याजबद्दल वाईट वाटलें नाहीं असें नाहीं. अतोनात वाईट वाटलें. ही जहांबाज बायको असल्याकारणानें तिनेंही **रखमाबाई**ची मोठीशी प्रतिष्ठा ठेविली नाहीं. वास्तविक पहातां मुलीच्या पक्षास नेहमीं पड घ्यावी लागते. " हो ! आपली पोरगी त्यांच्या घरीं नांदायची आहे; त्यांचा मुलगा कांहीं आपल्या इथें नांदायचा नाहीं. आपण जर त्यांच्याशीं उद्धटपणानें वागलों तर त्याचा सर्व राग पोरीवर निघेल! काय जो सूड उगवायचा तो पोरीवर उगवला जाईल. तेव्हां तें उपयोग नाहीं. " असे विचार व उद्गार वधू-पक्षाकडचे असतात. वरपक्षाकडचे लोक कितीही टाकून बोलले व त्यांनीं कितीही गाढवपणा केला तरी तो वधूपक्षाकडील लोकांस निमूटपणें सोसावा लागतो. पुष्कळ ठिकाणीं—नुसतें पुष्कळ ठिकाणीं कां ? बहुतेक ठिकाणीं— तर असें दिसतें कीं, वरपक्षाकडील मंडळीस वधूपक्षाकडील मंडळीला टाकून बोलण्यांत व हवा तसा फाजीलपणा करण्यांत मोठें भूषण वाटतें. असो. जेव्हां या गोष्टी जातील तेव्हां खऱ्या !

**रखमाबाई**नें हवा तसा फाजीलपणा केल्यावर **सिताबाई**नेंही हवें तसें बडबडण्यास व **रखमाबाई**ला हव्या तशा शिव्या देण्यास मागें पुढें पाहिलें

नाही. हें वरील लिहिण्यास थोडेंसें विरुद्ध आहे, परंतु तसें लिहिण्याचें कारण काय असावें याचा जर थोडासा विचार केला तर आमच्या वाचकांस तें तेव्हांच सांपडेल. एक श्रीमंतीच्या डौलानें अगदीं मत्त झालेल्या **सीताबाई**स **रखमाबाई**सारख्या भिकारड्या भिक्षुकिणीनें हवें तसें टाकून बोलणें म्हणजे गैराशिस्त असें **सीताबाई**स तर वाटलेंच, परंतु दुसरें आणखी मोठें कारण असें होतें कीं, **गोदावरी**ला त्रास झाला तर त्याचें **सीताबाई**ला थोडेंच कांहीं वाटणार होतें ! ती काय तिची मुलगी होती ? किंवा तिच्या माहेरच्या गोतवळ्यापैकी तरी होती ? तिच्या आईजवळ पैसा तरी होता ? **गोदावरी**च्या जवळ **सीताबाईचें** मन तिच्याकडे लागावें व तिनें तिच्याविषयीं काळजी बाळगावी असें होतें तरी काय ! अशी एकंदर स्थिति असल्यावर आम्ही जो साधारण नियम काढला आहे त्याच्याविरुद्ध **सीताबाई**चें आचरण होतें यांचें कोणास आश्चर्य वाटणार आहे ! त्या एकंदर लग्नांत ती साध्वी **गोपिकाबाई** एक चकार शब्द देखील बोलली नाहीं. परंतु **रखमाबाई**नें व **सीताबाई**नें तिला कचाकचा बोलबोलून घेऊन दिवसांतून शंभर वेळां डोळ्यांतून पाणी गाळावयास लाविलें. लग्नाचा दिवस म्हणजे वास्तविक किती आनंदाचा ! परंतु त्या दोघी कैकाडणीनीं तिच्याशीं भांडभांडून " तिला ही पोरगी आपल्याला झाली नसती तर बरं झालं असतं " असें वाटावयास लाविलें बिचाऱ्या **नाना**स देखील असें झालें कीं, हें बहिणीचें लग्न नव्हे शुद्ध त्रास आहे, लग्न सारें दोनच दिवस झालें पण तेवढ्यांत ही दशा ! जर का आठ पंधरा दिवस लागले असते तर मग काय झालें असतें कोणाला ठाऊक !

लग्न आटोपतांच **विठ्ठलभटजीं**चे यजमान पुण्यास येण्यास निघाले. अर्थातच त्यांचेबरोबर **विठ्ठलभटजी**ही निघाले, **सीताबाई**नें त्यांचेबरोबर त्यांच्या सुनेस पाठविण्याची तयारी केली व त्याप्रमाणें **गोदावरी** आपल्या सासूसासऱ्याबरोबर पुण्यास आली. पुण्यास आल्यानंतर तिच्या सासुरवासास व जाचास पक्की सुरुवात झाली. **गोदावरी**चें लग्न झालें त्यापूर्वीं **सीताबाईनें** सांगितलें होतें तसें कांहीं मिळालें नाहीं व ती अगदीं गरीब आहे तेव्हां पुढें देखील कांहीं मिळण्याची आशा नाहीं असें पाहून त्या रागाचा सर्व अंमल **गोदावरी**वर चालू झाला. इतक्यांत आणखी अशी गोष्ट झाली कीं, लग्न होऊन दोन महिने झाले नाहींत तों **रखमाबाई**ची एक बहीण कोठें कोंकणांत होती ती वारली. मग काय विचारतां ! ती हिच्याच पायगुणानें वारली, हीच पांढऱ्या पायांची, असें होऊन गेलें व आगींत तेल पडलें. वरील गोष्ट

झाल्यापासून **गोदावरी**ची आणि सुखाच्या शब्दांची अगदींच ताटातूट झाली. तिला चार तासांच्या वर कधीं झोंप घेऊं दिली नाहीं. शिळ्या अन्नावांचून अन्न नाहीं. मिळालाच तर कधींमधीं भात तेवढा मिळावयाचा. दोन वाजावयाच्या आधीं कधीं जेवण नाहीं. भिक्षुकाचें घर—सवाष्णी म्हणून दुसऱ्याच्या घरीं जाण्याचा पुष्कळ संभव—पण चांगलें मोठ्याचें घर असलें तर **गोदावरी**ला कधींही जावयास मिळावयाचें नाहीं. गरीबा-गुरिबाचें घर—जेथें फारसें कांहीं असण्याचा संभव नाहीं तेथें जावयाची पाळी आली कीं **गोदावरी**ला पुढें ढकललीच. दुसऱ्याचे घरीं जावयाचें असो किंवा घरीं जेवावयाचें असो; घरांतलें काम आधीं म्हणा, मग म्हणा, परंतु सारें झालें पाहिजे. सून आल्यापासून **रखमाबाई** स्वतः कधींही कामाला हात लावीनाशी झाली. सुनेच्या हातून कांहीं काम झालें नाहीं तर किंवा कांहीं चुकलें तर लाथा, बुक्या मारावयाला कधीं तिनें मागें म्हणून घेतलें नाहीं. सासूचें लुगडें, मामंजीचें धोतर व **विनोबा**चें धोतर व उपरणें हीं चांगलीं धुतलीं पाहिजेत. नवऱ्याचीं धोतरें म्हणजे गुलाबाच्या फुलाप्रमाणें ठेविलीं पाहिजेत. त्यांनीं गाढवाप्रमाणें लोळून हवीं तशीं मळविलीं तरी हरकत नाहीं इतकीं कामें करावयाला लावणें एवढेंच नाहीं, तर पहांटे तीन वाजावयाच्या आंत उठून दळणकांडण करणें व सासू उठली नाहीं तोंच वेणी घालून घेण्यास तयार असणें, इत्यादि गोष्टीही तिच्या पाठीमागें लागल्या होत्या. सासूच्या पुढें वेणी घालावयास बसल्यावर तिची हवी तशी बडबड मुकाट्यानें ऐकणें, मध्येंच केंसांस हिसडा बसल्यास हूं चूं देखील न करणें व क्वचित् केंस फार तडतडल्याकारणानें हूं चूं केलेंच तर गालगुच्चे सोसणें, थोबाडांत खाणें, पाठीवर रट्टे खाणें व केव्हां केव्हां भिंत जवळ असल्यास तिच्यावर डोकें आपटून पडलेली खोंक निमूटपणें सोसणें, इत्यादि गोष्टी त्या गरीब व अनाथ **गोदावरी**च्या नशिबीं आल्या होत्या. **रखमाबाई**ची जी बहीण वारली तिची एक सात वर्षांची मुलगी होती. तिला तिची आई वारल्यावर **रखमाबाई**नें आपल्या येथें आणून ठेविलें होतें. ती पोरगीही मोठी द्वाड होती. तिची सर्व प्रकारची सेवाचाकरी **गोदावरी**सच करावी लागत असे. एवढी सात वर्षांची ती कार्टी, परंतु तिचे सर्व विधि अंथरुणांतच होत असत. आणि ते सर्व प्रकारें निस्तरून ते तसले घाणेरडे कपडे धुणें, हेंही तिला करावें लागत असे. दोन तीन वर्षांनीं जेव्हां ती पोरटी थोडीशी मोठी झाली तेव्हां गोदावरीच्या पाठीमागला हा त्रास चुकला पण त्याच्या-पेक्षां फार वाईट गोष्टी तिच्या पाठीमागें लागल्या. ती कार्टी काय करूं

लागली, कीं मावशीचें पाहून आपणही **गोदावरी**स हवा तसा त्रास देऊं लागली. तिला हव्या तशा शिव्या देऊं लागली व **गोदावरी** कोठें कांहीं कोणाजवळ बोलतांना दिसली, कीं नाना तऱ्हेच्या खोट्या नाट्या चुगल्या आपल्या मावशीपाशीं जाऊन सांगूं लागली. मावशीच्या देखत ती गोदावरीला शिव्या देत असे. पण तें पाहून मावशी काय, तिचें कौतुकच करी ! मग काय विचारतां ! जों जों त्या पोरीला जास्त अक्कल यावयास लागली, तों तों **गोदावरी**ला ती त्रासही जास्त देऊं लागली. कोठें ती काम करीत असतां उडी मारून तिच्या पाठीवर बसावें आणि तिला चिमटे घेऊन आपणच मावशीकडे रडत जावें. ती पाणी तापवावयास चुलीजवळ बसली असतां हळूच कोलीत काढून तिच्या पायावर ठेवावें आणि तिनें "हें काय पिलू वन्सं" असें म्हटलें म्हणजे आपणच मावशीजवळ "ही पहा वहिनी मला शिव्या देते" असें सांगत जावें. कधीं तिच्या हातालाच कडकडून चावावें, आणि आधींच **रखमाबाई**जवळ कांहीं तरी गाऱ्हाणें न्यावें. तेथें काय ! चोख न्याय मिळावयाचा. **गोदावरी**स मारण्याकरितां हात, पाय अगदीं पाजळलेले आणि आपल्या हातून न झाल्यास त्या पोरीच्या हातूनच तिला मारवावें.

**गोदावरी**ला ऋतुप्राप्त झाल्यानंतर तर **रखमाबाई**ची तब्यत अगदींच गरम झाली. कारण गर्भाधानानिमित्त कांहीं एक मिळालें नाहीं. **पिली**ला देखील कांहीं एक मिळालें नाहीं. एक बोटभर खण तर खरा ! असें झाल्यावर मग काय पाहिजे ! सासूबाई, वन्सं आणि पतिराज तिघांचाही राग सुरू झाला. हिला त्रास कसा द्यावा याविषयीं या तिघांचीं मोठीं कारस्थानें चालू झालीं. एके दिवशीं अशी गोष्ट झाली कीं, **गोदावरी** अस्पर्श असून जेवावयास बसली होती. तेव्हां **पिलु**वन्सेंच्या जवळ कोठें शेण मागितलें. पिलुवन्सें काय ? घोड्यावर ! त्यांनीं शेण दिलें तर खरें. परंतु तें अशा तऱ्हेनें फेंकलें कीं, त्यांतलें अर्धें गोदावरीच्या पत्रावळींत गेलें. मग तें अन्न तिनें कसें खावें बरें ! तिच्यान तें खाववेना म्हणून ती तशीच उठली व तें अन्न तिनें रस्त्यावर नेऊन टाकलें.— या गोष्टीचा त्या चोंबडाबाईनीं लागलीच रपोट केला व दुपारीं कोर्टापुढें इन्साफ होण्याचें ठरलें. **रखमाबाई**च्या तोंडाचा पट्टा सुरू झाला. व **पिली**बाई त्यावर उगाच पॉलिश फिरवूं लागल्या. नवरोजीपंत जज्ज झाले व सर्वांनीं मिळून असा ठराव केला कीं, आरोपितास आज जेवण न देतां चवथे दिवशीं यथास्थित समजी दिली

पाहिजे व या निकालाप्रमाण दोन्ही शिक्षा अंमलांत आणल्या, जसें कोर्ट ! तसा इन्साफ !

याप्रमाणें स्थिति चालली असतां एकाएकीं असें झालें कीं, पिलुवन्संना नवज्वर होऊन त्या आटोपल्या. मग काय ! **गोदावरी**च्या पांढऱ्या पायांबद्दल घरांत कोणासच शंका उरली नाहीं. " लग्न होऊन घरांत आली नाहीं तों मावाससूला गिळलीन् ! न्हाण आलं नाहीं तों नणंदेला मारलीन् ! आतां का मला खाते का काय कुणाला ठाऊक ? पांढऱ्या पायांची अवदसा कुठली ! टाक एकदां मला खाऊन म्हणजे सुटलीस ! कार्टी घरांत आल्यापासून प्राप्ति तर एका कवडीची देखील नाहीं. कसलं खडतर नशीब आहे कुणाला ठाऊक. माझ्या आईपोरक्या पोरीला मी कुठून इथें आणली कुणाला ठाऊक. चांडाळणीनं तिला देखील खाल्लीन् " असे शब्द कांहीं दिवसपर्यंत सतत **रखमाबाईच्या** तोंडून निघत असत. पुढें तर ती किती आणि कसा त्रास देत असे, हें वाचकांस अनुभवावरूनच ठाऊक आहे. **गोदावरी**ला ज्या तऱ्हेनें वागवीत असत त्या तऱ्हेचें वर्णन हें झालेंच आहे व त्याच्या बरोबर आमच्या गोष्टीला आरंभ होण्यापूर्वींची जी काय हकीकत होती तीही कळली आहेच.

**गोदावरी**ची सासू **रखमाबाई**, हिचा स्वभाव कसा होता, हें म्हणजे येथें आणखी निराळें सांगावयास पाहिजे असें नाहीं. तिचें बहुतेक इत्थंभूत म्हटलें तरी चालेल असें वर्णन वर आलेंच पाहिजे.

आतां **विठ्ठलभटजीं**चें थोडेंबहुत वर्णन करून ही **गोदावरी**रूपी नवरत्नाची माळ ज्यांच्या गळ्यांत पडली होती व ज्यांच्याशीं तिची जन्माची गांठ बांधली गेली होती, ज्यांच्या सुखावर तिचें सुख व दुःखावर तिचें दुःख, हीं अगदीं अवलंबून होतीं, असे जे तिचे पतिराज **विनोबा** त्यांचें थोडेंसें इतिवृत्त पाहूं. **विठ्ठलभटजीं**सारखा गरीब पुरुष एकही नसेल असें म्हटलें तरी चालेल. बायकोनें अमुक करावयाचें म्हटलें म्हणजे तें अगदीं ब्रह्मलिखितासारखेंच झालें म्हटलें तरी चालेल; तिनें म्हटलेली गोष्ट जर यानें नाकारली, तर ती झाल्यावांचून कधींही रहावयाची नाहीं. यानें आपल्याकडून पाहिजे तेवढी तडफड करावी, पाहिजे तें करावें, परंतु तिचें म्हणणें ती खरें केल्याखेरीज कधींही रहात नसे. या गोष्टीस दोन कारणें असत. एक **रखमाबाईचा** खाष्टपणा तर खराच; पण याचा फाजील गरीबपणा हेंही एक दुसरें कारण होतें. याचे यजमान मोठाले व पुष्कळ होते.

त्यामुळें सालाची मिळकतही बरीच होती. हा मोठा आर्जवी व हरकाम्या असल्याकारणानें कोणत्याही यजमानाच्या येथें त्याला उणें पडत नव्हतें आणि बायकोच्या त्रासामुळें तो आपला निघेल तेवडा काळ कोणातरी यजमानाच्या घरींच काढी. विद्वत्तेनें पाहिलें तर हा आपला थातुरमातुरच होता.

**विनोबांचें** वय सुमारें पंचवीस वर्षांचें होतें; यांचा वर्ण काळा; शरीर भलें लठ्ठ; शेंडी मोठी थोरली; हाडपेर चांगलें कसदार व बळकट. हे आज दोन चार वर्षें इंग्रजी पांचव्या यत्तेच्या परीक्षेस बसत होते. यांची पुढील हकीकत येथेंच सांगण्यांत कांहीं अर्थ नाहीं. ती मागेंपुढें त्यांच्या कृत्यांत, बोलण्याचालण्यांत वगैरे आमच्या वाचकांस कळून येईलच.

परंतु आतां या मंडळीचें चरित्र सोडून देऊन आपण आपल्या कथेकडे वळूं. मागील प्रकरणांत सांगितलेली स्थिति व **रखमाबाई**च्या तोंडाची टकळी सारखी चाललीच होती. **विठ्ठलभट** बिचारा स्नान झाल्याबरोबर बाहेर पडला. इतक्यांत चटक् चटक् जोडा वाजवीत एक तरुण मनुष्य आंत आला. यानें डोक्याला एक गुलाबी रंगाचा पटका बांधलेला होता. तो पटका अगदीं छाकट्यासारखा बांधलेला असून, एका बाजूला उंच उंच होत गेलेला व त्यांतून एक शेवट तुऱ्यासारखें ठेवून दिलें होतें. दुसरें शेवट पाठीवर लांब लोळत होतें. अंगांतील अंगरखा अगदीं तंग असून हरकाच्या कापडाचा होता. त्याची तऱ्हा कांहीं निराळीच होती. नेसतें धोतर साध्याकांठीच परंतु शुभ्र व गुलाबी झांक त्यांत मारते आहे असें होतें. सारांश, त्याचा पोषाख साधा असून फार ऐटीचा होता, त्या पोषाखावरून पहाणारास सहज असें वाटे कीं, हा मनुष्य गरीब असल्यामुळें यानें हा असा स्वस्ता परंतु त्यांत छाकट्यासारखा पोषाख केला आसावा; जर हा श्रीमंत असता तर यानें भडक भरजरी पोषाखावांचून जीवित कधींही घालविलें नसतें. अंगापिंडानें हा चांगला सशक्त दिसत होता. याचा वर्ण बराच काळा असून त्याचा व पोषाखाचा थोडा बहुत विरोध दिसे. याचे नाक, डोळे, साधारण बरे होते, परंतु त्याच्या एकंदर पोषाखाच्या झोंकावरून व इतर सर्व नोकावरून तो आपण मदनाचा पुतळाच आहों असें पक्कें समजत असावा. त्याचें तोंड या वेळीं बरेंच लाल झालें होतें आणि तसें होण्याचें कारण विडा व त्याची सोबतीण तंबाखू यांचा जोडा त्याच्या तोंडांत बसला होता असें खात्रीनें अनुमान करण्यास हरकत नव्हती. स्वभावतःच याचे ओंठ इतके लाल असतील असें अनुमान कोणाच्या स्वप्नींही येणें नको. तो आतां येतां

येतां कोपऱ्याकडे तोंड करून पच्‌कन् थुंकला व आंत आला आणि एकदम "आई, आज आणखी कांहीं झालं वाटतं ?" असें म्हणाला. यावरून व वरील वर्णनावरून हा मनुष्य कोण, हें आमच्या चतुर वाचकांस कळलेंच असेल. हे आमच्या **गोदावरी**चे पतिराज होत. हेच ते **विनोबा**. यांनीं हा प्रश्न करण्याबरोबर त्या **रखमाबाई**स तर अगदीं परमाल्हाद झाला; कारण इतका वेळ ती अगदीं एकटी बडबड करीत होती. तिला होस हो करणारें कोणीच नव्हतें. **विठ्ठलभटजी** जरी अगदीं नादान होते; तरी ते केव्हांही तिच्या म्हणण्यास होहो म्हणत नसत. ती करावयाचें तें मात्र केल्याखेरीज रहात नसे. ती मोठी जहांबाज, त्यास हवें तसें वागवी. शेजारणीपाजारणी असत त्या काय बिचाऱ्या ? नुसत्या होस हो करणाऱ्या. त्यांस दुसरें तिसरें कशाला ठाऊक असणार ? आपल्या आपल्या घरांत कांहीं जरी कोणास कोणाविषयी वाटलें तरी तें स्पष्ट बोलून दाखविण्याला कोणाचें खोळंबलें आहे. चालेना, सास्वासुनांचें चाललें आहे. ती सासू ती सून आपल्याला काय त्याचें हो, न जाणो आपण कांहीं बोलायला गेलों आणि **रखमाबाई** आपल्यावरच उलटली व तिनें आपल्यावरच तोंड सोडलें तर मग कोण पंचाईत करीत बसतो ! चिखलांत धोंडा टाकून शिंतोडाच उडवून घ्यायचा कीं नाही ?" असा विचार करून स्वस्थ बसणारे फार. अस्तु, **विनायकराव** आंत येण्याबरोबर त्यांनी जो प्रश्न केला त्याबरोबर तीं स्त्रीरूपानें **गोदावरीच्या** पाठीस लागलेली अवदसा **रखमाबाई** एकदम ओरडून म्हणाली,

'अहाहारे गाढवा ! "आणखी कांहीं झालं कीं क्याय" म्हणून विचारतो आहे. कांही झाल्याखेरीज का मी कांहीं बोलतें आहें ? मला काय वेड लागलं आहे ? अरे, गाढविला पहांटे उठवली, माझ्याच्यानं आज उठवेना म्हणून दळायला, तर जात्यापाशीं जाऊन अवदसा आपली अमंगळवाणी रडत बसली ! काय हिचा का बाप मेला, का आई मेली, का काय झालं तरी काय ? तसंच आतां. मघापासून मी चमत्कार पहातें आहें; तें त्या तिथें पिठाचं टोपलं पडलं आहे तर त्याच्यावरून एक हजारदां गेली असेल पण कांहीं उचललंन् का ! आधीं या रडण्यापुढें कांहीं सुचेल तर कीं नाहीं ! रड, तुझ्या कपाळीं जन्माची रडच लागली आहे !"

हे आईसाहेबांचे शब्द ऐकून. चिरंजीव मोठ्या आढ्यतेनें म्हणतात, आई तूं हें सहन करून घेतेस म्हणून. मारून अगदीं लंबे करून टाकावं तें? तुझं काम ऐकत नाहीं म्हणजे काय ! मी असतों तर–"

**रखमाबाई**:— असतों तर म्हणजे, कुठें गेला का आहेस !

परंतु इतके शब्द आईच्या तोंडांतून पुरते निघताहेत न निघताहेत तोंच आमचे पठे वाघ त्या दीन **गोदावरी**रूप निराधार गाईजवळ गेले आणि त्यांनीं तिच्या एक काड्कन् तोंडांत लगाविली. ती इतक्या जोरानें लगावली, कीं तिच्या योगानें **गोदावरी**चीं कानशिलें झणाणून जाऊन तिच्या डोळ्यांपुढें काजवे दिसले असतील. तो आवाज ऐकून शेजारलीं माणसें देखील किंचित् चपापल्यासारखीं झालीं. किंचित् म्हणण्याचें कारण इतकेंच कीं, त्यांस या गोष्टी पाहून पाहून त्या अगदीं त्यांच्या आंगवळणीं पडल्या होत्या. बाहेर कोणी तर इतकेंही म्हणालें कीं "हं, झाली सुरवात वाटतं; काय बाबा हे त्या पोरीला छळीत असतात !" ईश्वरकृपेनें एवढें बरें झालें कीं हे शब्द त्या **रखमाबाई**स ऐकूं गेले नाहींत. नाहीं तर तिच्या क्रोधाची ज्वाला आधिक धगधगीत होऊन हस्तपादद्वारा त्यांचा ताप त्या **गोदावरी**ला सोसावा लागला असता. याप्रमाणें **विनोबा**नें तिच्या थोबाडींत मारल्याबरोबर त्या **रखमाबाई**चा आनंद तर पोटांत माईनासाच झाला. **गोदावरी**ला अत्यंत दुःख झालें हें म्हणजे सांगावयास पाहिजे असें नाहीं. ती अगदीं रडूं लागली, परंतु तिला सुचिंतपणें रडूं तरी कोण देतो ? सासूबाईनीं लागलीच " त्याला आंघोळीला पाणी दे. मी दिखील आतां आंग धुतें, आणखी हौदावर जाऊन तेवढीं धुणीं धुऊन आंग धुऊन ये. जर लवकर आलीस तर बरं आहे, नाहीं तर– कोडगीला लाज कुठें आहे आधीं म्हणा, पण आपलं उगीच " असें म्हटलें व थोड्याच वेळांत तिची हौदावर रवानगी केली.

---

# प्रकरण ५ वें.

## कृष्णराव व रमाबाई.

**त्याच** दिवशीं रात्रीं शनिवार पेठेंतल्या एका घरांत आणखी एक गोष्ट झाली ती सविस्तरपणें येथें सांगणें अवश्य वाटल्यावरून सांगतों. हें घर बरेंच मोठें व तिमजली होतें. याचा बाहेरचा देखावा चांगला असून त्याचा कोरेपणा आपल्या यजमानाची सुखावस्था दाखवीत होता. या

घराचा पुढला दरवाजा या वेळीं लाविलेला होता. कारण दहा वाजावयाचा सुमार झाला होता, तरी दिंडी मोकळीच होती. आंत जाण्याबरोबर एक चौक लागे. चौक ओलांडून व ओटीच्या पाहिऱ्या चढून पुढें गेलें कीं, डाव्या बाजूस एक जिना लागे. ओटीवर एक दोन शिपाई होते ते आपल्या घोंगड्या टाकून त्यांजवर पडलेले होते. जिना चढून वर जातांच उजव्या बाजूच्या दारांतून आंत डोकावून पाहतां एक गृहस्थ खुर्चीवर बसून व पुढें एक "मिस्टरीज्"चा व्हाल्यूम उघडून हातांतल्या ताडाच्या पंख्यानें वारा घेत, तो वाचीत होता. हा गृहस्थ शरीरानें थोडासा स्थूल, हाडापेरानें मोठा व उंच असा होता. याचा चेहरा भव्य व एकंदर शरीर सुखावलेलें असें दिसे. याच्या मिशा फार मोठ्याही नव्हत्या व लहानही नव्हत्या; याचा वर्ण बराच गोरा होता. पलीकडच्या बाजूस एक मच्छरदाणी घातलेला पलंग होता, व ज्या टेबलावर पुस्तक ठेऊन मोठ्या साग्र चित्तानें तो तें वाचीत बसलेला होता, त्याच टेबलावर पानसुपारीचें तबकही ठेविलेलें होतें. या गृहस्थाचें वय चाळिसांच्या सुमारें होतें. हा गृहस्थ असा वाचीत बसला असतां, थोड्याच वेळांत एक किंचित् प्रौढ अशी स्त्री तेथें आली. या स्त्रीचें वय सुमारें ३२।३३ वर्षांचें असावें असें दिसलें. हिचाही वर्ण गोरा व नाकडोळे तरतरीत होते. डोळे किंचित् मोठे परंतु हिरवट होते. हिची काठीही चांगली उंच असून बळकट दिसत होती. हिच्या अंगावर दागदागिने बरेच होते. हातांतील गोठ चांगले लठ्ठ दिसत होते, नथ मोठी थोरली होती, नेसतें लुगडें चांगलें उंची होतें.

दार लाविल्याबरोबर ही स्त्री त्या पुरुषाच्या समोरच्या भिंतीजवळ जाऊन उभी राहिली, आणखी एकदम त्यास म्हणाली:—

"मग जायचं होतं का आज कॉलेजांत ?"

त्या गृहस्थानें तो प्रश्न ऐकून कांहींच उत्तर दिलें नाहीं; मग वाचण्याच्या भरांत तल्लीन झाल्याकारणानें त्याचें लक्ष गेलें नाहीं म्हणून त्यानें उत्तर दिलें नाहीं कीं मुद्दाम दिलें नाहीं हें कांहीं सांगवत नाहीं.

आपल्या प्रश्नाचें उत्तर मिळालें नाहीं, हें पाहून हंसत हंसत ती स्त्री त्या टेबलाजवळ गेली आणि पुस्तकावर हात ठेऊन म्हणाली, "गळ्याशीं आलं तरी दिखील कसं मेलं वाचायला सुचतं कुणाला ठाऊक ? मला मेली रात्रंदिवस झोंप दिखील लागत नाहीं. हें काय असं हें ? पोरीला आतां कितवं वरीस लागलं कांहीं आहे का ध्यानांत ?" हे शब्द ऐकून तो गृह-

स्थही हंसत हंसत म्हणतो, " बरं मग तुझं म्हणणं काय ? तिचं वर्ष ध्यानांत आहे, आणखी सारं कांहीं आहे ! करूं आतां पुढच्या वर्षी लग्न. आतांच काय घाई आहे ? "

**स्त्रीः**— अगबाई ! पुढच्या वर्षी ! मग आपलं चांगलंच म्हणायचं. कांहीं दिपमाळ करायची आहे वाटतं ? आज एकसारखी तीन वर्सं पाठीस लागल आहें. तरी आपलं पुढचं वरीस हें कधीं सरतच नाहीं. तिला या यत्या आखाडांत तेरा वर्ष पुरीं होतील बरं का ? मेलीं लोकं आतांच म्हणायला लागलीं आहेत कीं—"

ह ऐकून तो गृहस्थ मध्येंच म्हणाला, " म्हणूं देत लोक, लोकांना काय? पोरगी चवदा पंधरा वर्षांची झाल्याखेरीज अगदीं लग्न करूं नये. तुला इतकं सांगतों शिकवतों, इतकीं पुस्तकं वाचतेस, वर्तमानपत्रें वाचतेस; तरी हें कसं नाहीं तुझ्या मनांत एवढं भरत ? "

**स्त्रीः**— माझ्या सारं कांहीं भरतं. पण बाई कांहीं लोकांना भ्यायला नको वाटतं ? कांहीं मला लवकर एकदां जांवई हवा म्हणून का मी म्हणतें आहें ? हो दुसऱ्या पोरींचीं लग्नं पटापटा झालेलीं पाहून पोरीला नसेल का वाईट वाटत ? ते दिवशीं मी त्या **यमूमावशी**च्या इथें गेलें होतें. तिथें तिनं मला तिच्या देखत विचारलं कीं, " दुर्गे, तूं , आपल्या पोरीचं लगीन तरी कधीं करणार ? " तेव्हां पोरीनं कसं एवढंसं तोंड केलंन् ! "

**गृहस्थः**— हेंच तें. या अशाच गोष्टीनं तें सारं बिघडतं. तिला काय झालं आहे वाईट वाटायला ? कांहीं मोठी होऊन नहाण का आलं आहे तिला ? आणखी आलं म्हणून तरी काय झालं?

**स्त्रीः**— हें काय असं भलतंच बोलावं ?—पण आज जायचं होतं का कॉलेजांत त्या मुलाला पहायला ?

**गृहस्थः**— आलीस पुनः कथेकरी बोआसारखी मूळ पदावर ! आम्ही नाहीं गेलों कुठें कॉलेजांत न् फिलेजांत. अन् सध्यां जाणारय् नाहीं कुठें.

हे शेवटचे शब्द त्या गृहस्थानें किंचित् थट्टेनें व गालांतल्या गालांत हंसत उच्चारले. त्यावरून त्या स्त्रीनं खरें काय होतें तें तेव्हांच ताडलें व ती म्हणाली, " हें काय हें आपलं धड बोलणंच नाहीं. कॉलेजांत नाहीं तर मग कुठें जायचं झालं संध्याकाळीं ? मला कांहीं ठाऊक नाहीं वाटतं नाहीं गेलों म्हणून खोटं सांगायचं तें ?

**गृहस्थः**—आतां काय, हा लाडीगोडीचा उपाय काढला वाटतं ? बरं तर ये अशी या खुर्चीवर बैस, तुला सारं सांगतों. मुलगा पण मुलगा आहे ! ये बैस, य.

**स्त्रीः**—बरी आहें इथें. मला आधीं सांगायचं. केवढासा आहे मुलगा ?

**गृहस्थः**—इथें बसल्यावांचून कांहींएक सांगायचा नाहीं. त्या बाजूला घेतों पाहिजे तर खुर्ची.

" नको मीच तिकडे येतें. " असें जों ती स्त्री म्हणते आहे तों त्या गृहस्थानें डाव्या बाजूची दुसरी खुर्ची उचलून उजव्या बाजूस आपल्यासमोर अशी ठेविलीही. मग " नको म्हटलं तर घेतली दिखील" असें म्हणून मोठ्या मर्यादेनें त्या खुर्चीवर बसून मोठ्या प्रेमळ व हास्य स्वरानें ती त्यास म्हणाली, " मग कसें ? हुषार आहेत ना जांवईबोआ ? "

**गृहस्थः**— कां ? झाले कां इतक्यांत ते जांवईबोआ ? तुम्ही बायका म्हणजे असल्या उतावळ्या ?

**स्त्रीः**— आम्हीं काय केला उतावळेपणा—चांगलं विचारलं ! चांगले आहेत ना म्हणून, तर त्यांत काय झालं ? बरं आम्ही आपल्या बोलतच नाहीं मग तर सांगणं होईल— कुणाचा कोण त्याचा कांहीं केला का शोध ?

**गृहस्थः**— बोलत नाहीं, बोलत नाहीं, म्हणतां तरी पण विचारते आहेसच ?

**स्त्रीः**— त्यांत काय झालं विचारलं म्हणून ? आईचं हृदय तें आईला ठाऊक. पुरे मेलं सांगायचं नाहीं का आतां, का याच्याच खालीं टाळा-टाळी करायची ?

**गृहस्थः**— पण हो; पण हो; हें पहा मुलगा चांगला आहे, बी. ए.च्या वर्गांत आहे, हुशार आहे, प्रथमवर आहे व लहान आहे २०।२१ वर्षांचा. आणखी काय पाहिजे ? आज दुपारीं मीन् **वासुदेवराव** दोघे जाऊन प्रत्यक्ष पाहून आलों. काल त्या **शिवरामपंतांनीं** जसं सांगितलं तसं सारं आहे.

**स्त्रीः**— **वासुदेवरावांच्या** मनाला आला का पण ?

**गृहस्थः**— वा ! त्यांनीं तर सांगितलं कीं तुम्ही आपले डोळे मिटून होईल तर यंदां लग्न उरकून घ्या.

**स्त्री**:— सगळं चांगलं आहे, पण बाई सासरा नाहींन् अतिशय गरिबी त्यामुळंच कसंसं वाटतं. माझ्या पोरीला नाहीं कधीं गरिबीची संवय—

**गृहस्थ**:— हाच मूर्खपणा म्हणतों तो मीं. एक सासू नवरान् बायको यच्च्या पलीकडे काय आहे ? येऊन जाऊन गरीब असल्यानं काम करावं लागेल एवढंच कीं नाहीं ? तर माझं म्हणणं असं आहे, कीं सालंकृत कन्यादान करावें. मुलगा बी. ए. झाला यंदां कीं त्याला मुंबईस राहून एल् एल्. बी. च्या परीक्षेला जायला लागेल तो खर्च द्यावा, म्हणजे झालं. त्याचा तो विद्वान् होईल, हायकोर्टांत वकिली करायला लागेल. पैसे मिळतील. गरिबी काय दोन दिवसांची. तेवढी त्याला आपण वाटूं दिली नाहीं म्हणजे झालं. तो कांहीं अपव्यय करायचा नाहीं एवढं खचित ! हो, निदान आज दिसतंय् असं. पुढं कांहीं भलतंच झालं तर त्याला आपण तरी काय करणार ?

**स्त्री**—करायचंय् काय म्हणा— हो, बरी आठवण झाली. आज या **रखमाबाई** दुपारीं आल्या होत्या, त्यांना मीं आपलं सहज हें असं स्थळ आलं आहे म्हणून सांगितलं तेव्हां त्या—

**गृहस्थ**:—हं सगळ्या गांवभर केलं का इतक्यांत ? बरं मग ?

**स्त्री**:—गांवभर काय झालं त्यांत ? आपली सहज गोष्टीवरनं गोष्ट निघाली तर बोलल्यें.

**गृहस्थ**:—बरं बोललीस तर बोललीस पुढं काय ?

**स्त्री**:—कांहीं नाहीं. त्यांनीं सांगितलं कीं, त्या मुलाचा चुलता न् चुलती कांहीं चांगलीं नाहींत. तिनं आधीं कांहींच चांगलं सांगितलंन् नाहीं.आपल्या सुनेचं तर काय काय जें तिनं सांगितलंन् तें तर कांहीं पुसूं नये. तिची सून कायाशिशी हा आज मुलगा पाहिला कीं नाहीं त्याची बहीण.—म्हणून म्हणतें कीं असं कांहीं असलं तर उगीच—हो पोरगी नांदायची आहे आपली, तेव्हां पाहतांना नीट पहावं. मग तिचं नशीब.

**गृहस्थ**:—तुमच्या बायकांचं कीं नाहीं हेंच फार वाईट असतं. ती सासू तशी आहे. तो सासरा तसा आहे. त्यांतून इथें काय चुलत सासरान् चुलत सासू. **काशीनाथ**पंत कांहीं वाईट मनुष्य नाहीं, असं **शिवराम**पंत नाहीं का म्हणाले ?

**स्त्री**:—म्हणाले; पण...बरं मग स्थळ कांहीं वाईट नाहीं ना !

**गृहस्थः**—कांहीं वाईट नाहीं. त्यांतून लग्न झाल्यावर एक दोन खेपा पहावं. चुलत सासू चांगलं वागवीत नाहींसं दिसलं तर नवरा एल्एल्. बी. होईपर्यंत पाठवूंच नये झालं सासरीं. त्याचा तो स्वतंत्र झाला की त्याच्या स्वाधीन करावी, नाहीं तर मुंबईस छान बिऱ्हाड करून द्यावं. त्याच्यापेक्षां चांगलीं स्थळें सांपडताहेत कुठं.

**स्त्रीः**—बरं तर मग यंदांच करून घ्यावं कसं. म्हणजे मग त्रास राहिला नाहीं.

**गृहस्थः**—आतां आम्हीं उद्यां त्या **काशीनाथपंतांना** पत्र लिहितों. **बाबासाहेबां**कडूनय् **गोविंदरावांना** पत्र लिहवतों. जमलं लवकर तर बरंच झालं. पण लवकर जमेलसं दिसत नाहीं. आतां दिवस सारे पंधरा देखील राहिले नाहींत. ज्येष्ठांत कांही ते करणार नाहींत. तें माघांत जाणार एवढं खरं.

**स्त्रीः**—अग बाई ! इतकं लांब ! तें कांहीं नाहीं; लवकर उरकून टाकावं तें बरं.

**गृहस्थः**—सगळं खरं, पण ते जमून आलं पाहिजेना ? कांहीं आपल्या एकट्याच्या हातचं आहे तर तें झटकन् करून टाकायचं ! त्यांतून आणखी **बाबासाहेबां**च्याजवळ जेव्हां मीं काल गोष्ट काढली रात्रीं **गोविंदराव** दप्तरदारांना पत्र ल्याहायची, तेव्हां ते म्हणाले की " मी पत्र लिहितों पण त्यांचा जीव कांहीं सुचिंत नाहीं. "

**स्त्रीः**—म्हणजे ? त्यांना काय झालं सुचिंत नसायला ! **गोविंदराव दप्तरदार** म्हणजे आमच्या **बाबासाहेबां**चे व्याहीच ना ?

**गृहस्थः**— हो तेच. ते असं म्हणाले, तेव्हां मग मीं जास्ती विचारलंच नाहीं.

**स्त्रीः**— बरं आपल्याकडून यत्न तर करून पहावा. मग होईल तें होईल. पण असं जर चांगलं स्थळ असेल तर हातचं जाऊं देऊं नये.

**गृहस्थः**— हं, असं वाटायला लागलं का इतक्यांत ?

**स्त्रीः**— हो ! इकडे वाटायला लागल्यावर मग मला न वाटायला काय झालं ?

असो. या दोघां प्रेमळ स्त्रीपुरुषांचें याच विषयावर व त्यासंबंधानें आणखी इतर विषयांवर बराच वेळ भाषण झालें. तें आपल्या या कथेच्या

विशेषसें उपयोगी नाहीं तेव्हां ते उतरून घेण्यांतही कांही अर्थ नाहीं. वरीलप्रमाणें बोलतां बोलतां त्या दोघांस झोंप येऊं लागली तेव्हां तीं जाऊन निजलीं.

वरील एकंदर संभाषणावरून वाचकांच्या ध्यानांत त्या दोघां स्त्रीपुरुषांचें नातें काय असावें तें आलें असेलच. आतां त्यांची थोडी माहिती देऊन आमच्या वाचकांस त्यांना कसली काळजी पडली होती वगैरेचाही इतिहास देतों.

वरील गृहस्थाचें नांव **कृष्णराव** होय. हे ज्या वेळी इंग्रजी सुरू होऊन फार वर्षें झालीं नव्हती व जेव्हां थोडक्या ज्ञानानें इंग्रजी चाकऱ्या मिळत होत्या तेव्हांचे शिकलेले. अर्थातच ते युनिव्हर्सिटीचें शिक्षण मिळविण्याच्या भानगडीत पडले नव्हते, तरी त्यांस इंग्रजी भाषेचें ज्ञान चांगलें होतें.त्यांच्या वेळी युनिव्हर्सिटीचें शिक्षण मुळींच नव्हतें असें नाही. परंतु चाकरी मिळण्यास त्याची मोठीशी अवश्यकता नव्हती.त्या वेळी यांस चाकरी मिळून पुढें ते मुन्सफीची परीक्षा देऊन मुन्सफीच्या जाग्यावर गेले. हल्लीं ते—गांवीं मुन्सफ होते. यांचें मूळचें घर पुण्यासच; परंतु चाकरीच्या निमित्तानें हे पुण्यास थोडेच रहात. हल्लीं मे महिन्याची सुटी असल्यामुळें इतर लोक जसे येथील हवेसाठीं, वक्तृत्वोत्तेजक सभेसाठीं, व्याख्यानमालेसाठी व अशाच तऱ्हेच्या इतर ज्ञानिजनोचित अशा करमणुकीसाठीं येतात तसे तेही आले होते. यांचे तीर्थरूप फारा दिवसांपूर्वीं वारले होते व मातुश्रीही वारून पांच सहा वर्षें झालीं होती. यांचें वाचन रेनाल्डच्या कादंबऱ्यांपलीकडे जात नसे, तरी यांचें इंग्रजी भाषेचें ज्ञान ऑफिसाच्या कामांतील अभ्यासामुळें बरेंच चांगलें होतें. यांचीं मतेंही बरींच सुधारलेलीं होतीं. पूर्वींच्या लोकांप्रमाणें मुलगी आठ वर्षांची झाली कीं तिचें लग्न केलें पाहिजे, पुनर्विवाह उपयोगी नाहीं, स्त्रियांना शिक्षण उपयोगी नाहीं, त्या आहेत अशाच राहिल्या पाहिजेत, असें त्यांस कधींच वाटलें नाहीं. उलट त्यांनीं आपली मुलगी तेरा वर्षांची होऊं दिली होती आणि आणखीही एखादें वर्ष लोटतां आलें, तर लोटावें असा त्यांचा अंतस्थ विचार होता. तिला ते शाळेंत पाठवीत असत. **रमाबाई** ( हें त्यांच्या बायकोचें म्हणजे वरील स्त्रीचें नांव ) ही स्वभावानें, शिक्षणानें व स्वरूपानेंही चांगली होती; हिचें वय सुमारें २२।२३ वर्षांच्या बेतानेंच होतें. या नवराबायकोची प्रीति मोठी विलक्षण होती. लग्न झाल्या दिवसापासून एकमेकांपासून निराळें राहणें हें त्यांस मुळींच ठाऊक नव्हतें.

कृष्णरावांचे वडील हे इंग्रज सरकारचे फार दिवसाचे नोकर आणि इंग्रजी राज्य प्रथमतःच चांगलें चांगलें दिसल्याबरोबर तर्र होऊन गेलेल्या इतर लोकांप्रमाणें ते फार बहकले नव्हते, तरी त्यांच्या मनावरइंग्रजी सुधारणेच्या पहिल्या झटक्यानें थोडा बहुत अंमल गाजविला होता. त्यांची बरींच मतें आपल्या प्राचीन शास्त्रांप्रमाणें व हल्लींच्या रूढीविरुद्ध अशीं होतीं. इंग्रजी सुधारणारूप वारुणीच्या पहिल्या झुरक्याबरोबर तर्र झालेल्या इतर लोकांबरोबर तेही सामाजिक सुधारणेसाठीं हात पाय झाडीत असत; व इतर सुधारकांप्रमाणें तेही नुसत्या गोष्टी मात्र सांगून आपल्यावर वेळ आल्यास मागें सरणारे असेच होते. पुनर्विवाहाविषयीं त्यांचें मत पूर्ण अनुकूल होतें व ही रूढि पडावी म्हणून त्यांनीं आपल्याकडून पुष्कळ खटपट केली; परंतु पुढें जेव्हां त्यांच्या स्वतांच्या लेंकीवर वैधव्यानें आपली आग पाखडली तेव्हां यांची खटपट लटपटून गेली; लोक जेव्हां यांस विचारूं लागले कीं, ‘ कांहो आतां काय झालं पुनर्विवाहाचं ? ’ तेव्हां हे “ जिचा विवाह करायचा तिच्याच मनांत नाहीं, मग आम्ही काय करावं ? ” असें म्हणूं लागले. सारांश, **नाना**साहेबांच्या वडिलांची इतरांप्रमाणेंच स्थिति असे. इंग्रजीच्या पहिल्या अमदानींत चाकऱ्या लवकर व सहज मिळत असत. इंग्रजी एकदोन बुकें येत असलीं कीं, पन्नास पन्नास रुपयांच्या चाकऱ्या. **कृष्ण**रावांच्या वडिलांसही अशाच तऱ्हेनें चाकरी मिळून ते सुमारें ५०० पर्यंत चढत गेले होते. पुढें मुलगाही मुन्सफीच्या परीक्षेंत पसार झाल्यावर त्यास कांहीं यांच्या वजनानें व कांहीं त्या वेळी मुन्सफ थोडे होते यामुळें लवकरच मुन्सफी मिळाली. मुलाला चाकरी मिळाल्यावर थोडेच दिवसांत वडिलांनीं स्वतः पेन्शन घेतलें; परंतु त्यांनी पेन्शन फार दिवस भोगलें नाहीं. यांची पत्नी मरून दोनएक वर्षें झालीं नाहीत तों तेही वारले. वर सांगितलेल्या त्यांच्या मतांचा व एकंदर शिक्षणक्रमाचा एवढाच उपयोग झाला कीं, **रमाबाई**ला थोडें बहुत शिक्षण मिळालें व **कृष्णरावां**चीं मतेंही नेमस्त व सुधारणेला अनुकूल अशीं झालीं. बायकांनीं शिकतां कामा नये, त्यांनीं चुलीचीच पूजा करावी, स्वयंपाकघर म्हणजे त्यांचें सारें जग असें त्यांस स्वप्नींही वाटलें नाहीं. **रमाबाईचें** लग्न झाल्यावर कांहीं दिवसपर्यंत सासऱ्यानें त्यांस शाळेंत घातलें होतें; परंतु तें सासूस न आवडून तिनें बंद केलें. ही एक विशेष ध्यानांत ठेवण्याजोगी गोष्ट आहे कीं, इंग्रजी अंमलाच्या प्रारंभीं पाश्चिमात्य सुधारणेच्या धुंदीनें अंध झालेल्या लोकांस त्यांच्या बायकांनीं फार प्रतिबंध केला; जर हा प्रतिबंध न होता तर तें सुधारणेचें तारूं

कितीं भडकून गेलें असतें व कोण्यावेळीं कोणत्या खडकावर—होय ! खड-कावरच म्हटलें पाहिजे, कारण बंदराला जाऊन लागतें कीं नाहीं याचा मोठा संशयच आहे—जाऊन आदळलें असतें याचा नेम नव्हता. तारूं फार भडकूं नये म्हणून जें वजन तारवांत भरतात, किंवा विमानही भलत्या तऱ्हे-नेंच एकदम वर जाऊं नये म्हणून जी त्यांत वाळू भरतात त्या वाळूचें किंवा त्या वजनाचें काम आमच्या या बायकांनी केलें. मात्र कित्येक गोष्टींत त्यांनीं तें काम फाजील रीतीनें केलें.

सारांश, सांगावयाचें एवढेंच कीं, **रमाबाई**स लहानपणापासून थोडेंबहुत शिक्षण मिळाल्याकारणानें ती फार सुशील व विचारी अशी झाली होती व शिक्षणाचा खरा उपयोग काय व त्याचें महत्त्व केवढें आहे हें तिला पक्केपणीं जरी नाहीं तरी बरेंच कळूं लागलें होतें. ती संसारांत मोठी दक्ष व शहाणी होती. संसारांतील अमुक एक गोष्ट आपल्याला येत नाहीं, असें कोणी म्हणूं नये म्हणून ती सदा कांहीं तरी शिकत असे. यामुळें तिला गृहकृत्यांतलें अमुक एक येत नाहीं असें तर मुळींच नव्हतें. सर्व पक्वान्नें, भाज्या, कोशिंबिरी, हीं करण्यांत ती अगदीं हुषार होती. वरी पैसाही रगड होता. तेव्हां तिला कोणत्याही गोष्टीचें कमी नव्हतें. बरें, पैसा इतका होता, दागदागिन्यांला कांहीं कमी नव्हतें, नवरा अगदीं मुठींत, सासू नाहीं, सासरा नाहीं, कोणाचा दाब नाहीं, असें असून तिला गर्व किंवा उद्धटपणा म्हणजे काय हे ठाऊक देखील नव्हतें. शेजारणीपाजारणींशीं ती कधींही वाकड्या रीतीनें वागली नाहीं हाच शिक्षणाचा परिणाम म्हणावयाचा.

ज्याप्रमाणें **रमाबाई** त्याचप्रमाणें तिची मुलगीही होती; अगदीं एक प्रतिमा; मात्र **रमाबाई**चा वर्ण अगदीं गोरा होता, तसा **द्वारकी**चा नव्हता. **द्वारकी** नाकाडोळ्यानें अगदी **रमाबाई**सारखी होती; तिची अंगलटही अगदीं आईसारखीच होती; वर्ण मात्र थोडा सांवळा होता; दुसरा कांहीं एक तिच्यात व तिच्या आईत फरक नव्हता. आईनें आपले सर्व गुण तिच्या अंगीं ठसविले होते. ती अद्यापि शाळेंत जात असे. हल्लीं तिची चवथी इयत्ता सरून ती पांचवीच्या अभ्यासास लागली होती. तिचं एकंदर वर्तन आईबापांस तर काय, परंतु कोणासही आनंद देणारें असें होतें. आईची शिक्षाच तशी होती. तिच्या वयाच्या इतर पोरींपेक्षां तिला पुष्कळच सांसा-रिक ज्ञान होतें. तिला अनेक पदार्थ करावयास येत असत. कशिदा काढणें, गळपट्टे विणणें वगैरे बहुतेक कामें ती शिकली होती. तिनें आपल्या बापास

एक गळपट्टा विणून दिला होता; एक टोपी विणून दिली होती; केव्हां केव्हां बाप तिला थोडें इंग्रजी शिकवीत असे; जोंपर्यंत आजोबा व आजीबाई होतीं तोंपर्यंत ती नेहमीं पुण्यांत रहात असे. परंतु तीं दोघें वारल्याबर ती बाप व आई हीं ज्या गांवीं असतील त्या गांवीं राहण्यास आली. यामुळें तिच्या शिकण्याची थोडी पंचाईत झाली होती. तरी बाप जाईल त्या गांवीं तेथील शाळामास्तराकडून तिला शिकवून तिचें शिकणें कायम राहील असें करी. साधारणतः मराठी पुस्तक बेरेंसें असलें म्हणजे तें आणवून बाप तिच्याकडून वाचवीच, आईही आपल्याकडून तिला शिक्षण देण्यांत कधीं कसर करीत नसे. तिनें तिचे फाजील लाड कधींही केले नाहींत; आधी एकुलतें एक मूल, त्यांतून सुशील व समजुतदार मग काय पाहिजे ? जसें पुस्तकी तसेंच व्यावहारिक, सांसारिक ज्ञानही मुलीस जरूर पाहिजे म्हणून **रमाबाई** दोन प्रहरचें फराळाचें **द्वारकी**कडूनच करवी; यामुळें लहानपणींच तिला श्रीखंडाच्या वड्या, साखरपाऱ्याच्या वड्या, आंब्याच्या वड्या, करंज्या वगैरे जिन्नस करावयाला येऊं लागले होते. ज्या मुलीच्या लग्नाविषयी **रमाबाई**चें व **कृष्णरावां**चें एवढें आज बोलणें चालणें होतें, ती मुलगी हीच.

अशा प्रकारची **कृष्णरावां**ची एकंदरीनें स्थिति होती. रात्रौ ज्या मुलाविषयीं बोलणें चाललें होतें, तो मुलगा कोण हें वाचकांनीं ताडलेंच असेल तेव्हां तो आमचा द्वितीय नायक ' नाना ' हें सांगितलेंच पाहिजे असें नाहीं. **कृष्णराव** मे महिन्याची सुटी म्हणून पुण्यास आले होते. त्या काळच्या लोकरूढीप्रमाणें मुलगीही मोठी झाली होती. तेव्हां दुसऱ्याच्या बोलण्याला भिऊन म्हणा, अगर लोकांविरुद्ध आचरण करण्याइतकी धिटाई **रमाबाई**च्या अंगांत न आल्याकारणामुळें म्हणा, तिचा नवऱ्यास आग्रहही फार पडला. म्हणून **कृष्णराव** मुलीचे लग्नाचें थोडेंबहुत मनावर घेऊन इकडे तिकडे स्थळें पाहूं लागले होते. त्यांत त्यांच्या स्नेह्यांनीं **नाना**चें नांव त्यांस सांगितलें. त्यांनीं व त्यांच्या स्नेह्यांनीं जाऊन मुलगा पाहिला; त्यांच्या तो फार मनास आला, हें वरील संभाषणावरून स्पष्ट झालेंच आहे. नंतर त्यांनीं हें स्थळ जुळविण्याचा निश्चय केला. मुलास मुलगी पसंत पडते कीं नाहीं हें पहाण्याची रीत पंचवीस वर्षांपूर्वीं नव्हती. तरी **कृष्णरावांनीं** आपल्या एका स्नेह्याचा मुलगा कॉलेजांत होता त्याचेकडून सहजगत्या **नानास** आपले घरीं आणून त्याच्या नजरेस मुलगी पाडली आणि **काशीनाथपंतांस** पत्र पाठविण्याचा विचार केला. येथपर आमच्या या कथेचा

फक्त उपोद्घात झाला. पुढील प्रकरणापासून मुख्यकथेस आरंभ होईल; तर वाचकांनीं आतांपर्यंत जीं जीं पात्रें आम्हीं वाचकांस दाखवून दिलीं आहेत, त्यांच्या त्यांच्याकडे पूर्ण लक्ष ठेवून असावें. याच पात्रांपैकीं कित्येक पात्रांचें चरित्र व प्रसंगोपात्त इतर कांहीं नवीन पात्रांचेंही चरित्र आम्ही देणार आहों, इतकें येथें सांगून कांहीं वेळ पडदा पाडतों.

---

# प्रकरण ६ वें.

## द्वारकी.

**ठरल्याप्रमाणें** दुसरे दिवशी **कृष्णरावां**नीं पत्रें वगैरे पाठविण्याची तजवीज तर केलीच. त्यांनीं स्वत: **काशीनाथपंतां**स एक पत्र लिहिलें; व **गोविंदराव** दप्तरदारांच्या व्याह्यांकडूनही एक पत्र **गोविंदरावां**स **काशीनाथपंतां**जवळ गोष्ट काढण्याबद्दल लिहविलें. चार पांच दिवस झाल्यानंतर दोनही पत्रांचीं उत्तरें आलीं. **काशीनाथपंतां**चें जें पत्र आलें त्यांत त्यांनीं आधीं सर्व प्रकारें नन्नाचाच पाढा वाचला होता. परंतु त्यांतल्या-त्यांत शेवटीं असें सुचविण्याचा यत्नही केला होता कीं, आठशें रुपये हुंडा व दोहों आंगचा खर्चही जर आपण संभाळाल तर कदाचित् आमचा रुकार पडण्याचा संभव आहे. परंतु हें उघडपणें सांगितलें नसून फक्त ध्वनित केलें होतें. उघडपणें म्हटलें म्हणजे " आमचा मुलगा बी. ए. होऊन त्याला चाकरी लागेपर्यंत त्याचें लग्न करण्याचा आमचा व त्याच्या आईचाही मानस नाहीं. शिवाय जरी सर्व जुळत आलें तरी यंदां आमचेकडून तयारी नाहीं व आतां अवधिही उरली नाहीं. घाईत घाई करून लग्न उरकून घेण्याचें कांहीं कारण नाहीं. आमच्या घरांत कोणाचाच हेतु यंदां लग्न करावें असा नाहीं. शिवाय मुलगी कोणींही पाहिली नाहीं. आपण " **नानास** " दाखविली असें लिहितां, परंतु तो आजच मुखत्यार झाला असें नाहीं. मीं मुलगी पहावयास यावें, परंतु मजला रजा मिळावयाची नाहीं. इ. इ. इ. असें लिहिलें होतें; व शेवटीं शेवटीं मात्र

वर सांगितलेला हुंड्यापांड्याचा मजकूर निराळ्या तऱ्हेनें सुचविला होता तो असा:- "आमच्या या जिल्ह्यांतच 'सांजोरी' म्हणून गांव आहे तिथले सावकार चांगले पन्नास साठ हजारांचे मालक आहेत, ते परवां नुकतेच आले होते; त्यांनी आठशें रुपये हुंडा व दोही आंगचा खर्च करून आम्ही आपली मुलगी तुमच्या **नाना**ला देतों असें बोलणें लाविलें होतें, पण मीं कांही कबूल केलें नाही. आणखी एक दोन वर्षांनी त्याचा तो मुखत्यार झाल्यावर करील. आपण कशाला असल्या गोष्टीत पडा; मग उगीच बायको बरी वाईट म्हणायला नको! हो! इंग्रजी शिकलेली मुलें ही..." **कृष्ण-रावां**नीं प्रथमतः **नाना**स "मी **काशीनाथपंतां**ना पत्र लिहितों" असें सांगितलें; तेव्हांच त्यानें त्यांचें अनुमोदन पडणार नाहीं असें सुचविले होतें. **गोविंदरावां**चें पत्रही कांही आशा उत्पन्न करणारें नव्हतें. **नाना**नें "माझेही मनांत एव्हां लग्न करावयाचें नाहीं" असें बऱ्याच स्पष्टपणानें **कृष्णरावां**स सांगितलें होतें. परंतु **कृष्णरावां**नीं, त्याच्या स्नेह्यांनीं व वर्गबंधूंनी त्यास पुष्कळ आग्रह केल्यावरून व बायकोही चांगली आहे असें पाहून आपले-कडून कांहीं हरकत नाहीं असें सांगितलें.

**काशीनाथपंतां**चें तसें तें पत्र आल्यावरून या स्थळाविषयीं **कृष्ण-रावां**ची व **रमाबाई**ची अगदीं निराशा झाल्यासारखें झालें. **रमाबाई**स तर आमच्या स्त्रियांच्या स्वभावास अनुसरून फारच वाईट वाटलें. **कृष्ण-रावां**सही वाईट वाटल्यावांचून राहिले नाहीं. कारण, **नाना**विषयी जेथें जेथें त्यांनीं चौकशी केली व जेथें जेथें त्यांस थोडीबहुत माहिती मिळाली; तेथें तेथें ती त्यांना हवी तशी म्हणजे **नाना**च्या स्तुतिपरच मिळाली. **काशीनाथपंतां**विषयीं व त्यांच्या कुटुंबाविषयीं त्यांस पुण्यास थोडीच माहिती मिळाली. पण ती जरी थोडी होती तरी चांगली नव्हती. तरी **कृष्णराव** म्हणत कीं, त्यांच्या हाताखालीं पोरीला ठेविलेंच नाहीं म्हणजे झालें. मग तीं वाईट असोत किंवा चांगलीं असोत. कांहीं हरकत नाहीं. आणखी एक वेळां **काशीनाथपंतां**स पत्र लिहून पहावें असें त्यांचे मनांत येऊन त्यांनीं पुन्हां एक आपण स्वतः व एक **बाबासाहेबांस** भीड घालवून पत्र लिहविलें.

काय चमत्कारिक स्थिति आली आहे पहा! लग्नाची पोरगी म्हटली म्हणजे तिच्या आईबापांना केवढी तरी काळजीची गोष्ट झाली आहे? अरें नुसती काळजीची गोष्टच कां? मानहानीची, संपत्तिनाशाचीही गोष्ट आहे.

मुलीचा बाप म्हटला अगर मुलीची आई म्हटली त्यांनीं आधीं थोडीबहुत पैशाची मोटळी बांधली पाहिजे व मुलांच्या बापांचे घरांचे उंबरठे झिजविण्याकरितां चांभारास सक्त ताकीद देऊन चांगले भक्कम जोडे शिवविले पाहिजेत. मुलाचा बाप म्हटला म्हणजे तो घोड्यावर असावयाचा. त्याला मुलीच्या बापाच्या विनविण्या ऐकण्यास अगर टिपणें पहाण्यास केव्हांही पुरता वेळ नसतो. कोणीही मुलगा पहाण्यास अगर टिपण देण्यास आला कीं " आमचा यंदां लग्न करण्याचा मानस नाहीं " हें ठरीव उत्तर मिळावयाचेंच. पुढें टिपण घेऊन पहाण्याकरितां फारच गळ घातल्यास ' उद्यां या, परवां या" हें ठेविलेलेंच. टिपण मिळवून जर कां तें जुळलें तर मुलगी पहाण्याबद्दल टंगळमंगळ. मुलगी पाहून ती पूर्णपणें पसंत झाली तरी तसें कबूल न करतां हुंड्यापांड्याबद्दल हेंगल सुरू. पुढें लग्न ठरलें तर सीमांतपूजनापासून तंटे; तटेभांडणावांचून लग्न होणेंच नाहीं. त्या भांडणांत अर्थातच वधूपक्षानें कांहीं एक जास्त कमती बोलतां कामा नये. वरपक्षाकडील अरेराव मंडळी जें बोलेल तें निमुटपणे सहन करून घेतलें पाहिजे. त्यांनीं सर्व मानापमान सोडून देऊन आपल्या माना खालीं घातल्या पाहिजेत. कोणत्याही पक्षाकडची चुकी असली तरी त्यांनीच नवऱ्याकडील मंडळीपुढें नाकें घांसून " चूक झाली, माफ करा, पायां पडतों, गरीबांस पदरांत घेतल्यासारखें शेवटपर्यंत संभाळून घ्या" असें म्हटलें पाहिजे.

काय चमत्कार आहे पहा ! स्वतःच्या पोटचा गोळा दुसऱ्याच्या स्वाधीन करा; बरोबर आणखी हुंडा म्हणून ते मागतील तसे पैसे द्या; आणि पुनः " तुमच्या पायां पडतों, हात जोडतों, पदरांत घ्या, चूक झाली," इत्यादि शब्द मानापमानाची सर्व चाड सोडून देऊन पदोपदी म्हणा ! काय ही दशा ! स्त्रियांच्या परवशतेनें पृथ्वीवरील प्रत्येक देशांत स्त्रियांची थोडी बहुत दुर्दशा केलीच आहे. परंतु आमच्या येथें त्यांची जितकी दुर्दशा झाली आहे, तितकी कोणत्याही देशांत कोणत्याही काळी झाली नसेल. कोणी म्हणतो " न स्त्री स्वातन्त्र्यमर्हति " कोणी म्हणतो स्त्रिया या पुरुषांच्या उपभोगार्थ ज्या इतर अनेक वस्तू आहेत त्यांपैकींच आहेत. स्त्री म्हणजे चालतीबोलती वस्तू. याच्यापलीकडे तिची किंमत नाहीं. ती जगांत मनुष्यजाती सदोदित चालावी म्हणूनच उत्पन्न केली आहे. अशा एक कीं दोन गोष्टींनीं हल्लीं आमच्या स्त्रियांची अवहेलना चालली आहे म्हणून सांगावी ! त्यांचें बालपण आईबापांच्या ताब्यांत, नंतर कांहीं काळ

सासूसासऱ्यांच्या ताब्यांत, पुढें नवऱ्याच्या ताब्यांत ! आणि सरतेशेवटीं मुलाच्या ताब्यांत ! मग तो मुलगा गाढवांतला राजा कां असेना ! किंवा नवरा मूर्खशिरोमणी कां असेना ! अशी स्थिति जर चालली तर त्या बिचाऱ्यांची तरी भावि स्थिति काय होणार, कांहीं सांगवत नाहीं. ही स्थिति दुःखद आहे हें प्रत्येकाच्या अनुभवास येत आहे. मुलगी झाली म्हणजे प्रत्येकास वाईट वाटत आहे तरी देखील आमचे अजून डोळे उघडत नाहींत, तेव्हां काय म्हणावें ! पूर्वजांविषयीं आम्हांस केवढा अभिमान ! त्यांच्या चालीरीतीस अगर ज्ञानास कोणी दूषणें लाविलीं तर आम्हांला केवढा राग येतो ! पण जर ' त्यांच्या चालरीती सोडून तुम्ही बहकलां आहां तेवढे ताळ्यावर या ' असें सांगितलें तर नाकास मिरच्या लागतात ?

**कृष्णरावां**चें पत्र व **नानासाहेबां**नीं **गोविंदरावां**स लिहिलेलें दुसरें पत्र-या दोन पत्रांनीं **काशीनाथपंतां**च्या घरी बरीच चर्चा झाली. **कृष्णरावां**नीं आपले पत्रांत स्पष्टपणानें असें लिहिलें होतें की, हुंडा वगैरे कांहींएक न देतां आह्मी मुलीच्या अंगावर कांहीं दागिने घालूं व मुलाची एल्. एल्. बी. ची परीक्षा पास होईपर्यंतचा व पास झाल्यानंतर चाकरी लागेपर्यंतचा अगर हायकोर्टाची वकिली करीपर्यंतचा सर्व खर्च आम्ही चालवूं. आपण फक्त येथें येऊन देवदेवक ठेवावें. **नानासाहेबां**नीं **गोविंदरावां**स पाठविलेल्या पत्रांतही हाच मजकूर होता.

**काशीनाथपंतां**कडे तीं पत्रें जातांच आपल्या बायकोस त्यांनीं वाचून दाखविलीं. त्या पत्रांतील आशय ऐकून ती तर टणटणा फुटाण्यासारखी उडूं लागली. 'आम्ही काय मुलाचा खर्च चालवायला नामर्द होतों का काय ? आजपर्यंत हेच आले असतील मुलाचा खर्च चालवायला. मला पक्कं कळलं आहे हें सारं त्या **नान्या**चंच करणं आहे. त्यानंच असं ल्याहा म्हणून सांगितलं असेल त्यांना. काय चारगटानं मुलगी काय पाहिलीन् ! जसा कांहीं अगदीं धाधावला आहे लग्नाकरितां ! मला सगळं कळून चुकलं आहे काय आहे तें. त्यांच्या मनांतून एकदां लग्न करून घ्यावं आणखी मग पैशाची आणखी दागिन्यांची सांगावी कानांत गोष्ट ! काय बाई तरी ! पण म्हणावं मुलगी नांदायची माझ्याच इथें ' असें एकसारखें तिचें चऱ्हाट सुरू झालें. पुढें पुढें ती आपल्या बोलण्यांत मध्यें **गोपिकाबाई**सही ओढूं लागली. ' हिनच कुणाकडून तरी पत्र पाठवलं असेल त्यांना तुम्ही असं ल्याहा म्हणून ! तिला अगदीं दीड बोट स्वर्ग उरला आहे, आतां मुलगा बी.ए. होणार म्हणून. अग हो ! पण परीक्षा तरी उतरूं दे. कांहीं एव्हांच नको ढुंगणाला हात पोंचवूं ! अजून परीक्षा

उतरायची आहे ! मग चाकरी लागेल ! अन् बसलाय् कोण खेटरधन्या लागलीच चाकरी द्यायला ! त्यांतून मिळाली तर कांहीं आमच्यासारखी का एकदम मिळायची आहे ! मिळतील मेल्या तीस नाहींतर चाळीस रुपड्या ! दम-धराशी त्याला आतां येऊं द्या इथें म्हणजे काढतें त्याची चांगली खरड ! मेल्यांनो आम्हीं इतके दिवस केलं सवरलं तें कुणीकडेच गेलं. आणखी हा मुक्त्यारीनं मुली पहातो ! काय मेला का हा लग्नावांचून—तें सांगतेंना या गोपकेला झालं आहे एकदांची सून कधी येईल म्हणून ! तें मी सांगतें तेंच हें हुंडा देऊं नका विऊं नका म्हणून सांगणं दिखील या मायलेकरांचंच. अगदीं त्यांत संशय नको. मी म्हणतें याचा येईल अनुभव ? अजून आला आहे कुठें ! कधी कधीं म्हणायच असतं मला, ' आमचा **नाना** अगदीं गरीब ! ' पहा आतां हा गरीबपणा ! अहो लोकांच्या इथें असलं म्हणजे सारे गरीब असतात ! गरीब न होऊन करतात काय ! गळगळां पाशीं आदळायला पाहिजेना ! आतां पहा अंमळ कुठें परीक्षा बिरीक्षा होताहेत तों लागला आपल्या मुखत्यारीवर लग्नाचं जुळवायला ! छे ! छे ! छे ! आतांच्या या कारट्यांना लाजाच नाहींत कशा त्या ! त्यांच्या आया आणखी बाई त्यांना भर देतात, तेव्हां काय सांगावं ? ''

**सीताबाई** ही कशा तऱ्हेची बायको होती हें वाचकांच्या लक्षांत असेलच. तेव्हां **कृष्णरावांचें** असें पत्र ऐकून तिच्या नाकास मिरच्या लागून सर्वांगाची आग होऊन गेली हें कांहीं आश्चर्य करण्यासारखें आहे असें त्यांस वाटेल असें नाहीं. तिची **नानाच्या** लग्नावर पैसे मिळविण्याची केवढी उडी होती? ज्याप्रमाणें कवडीचाही खर्च न होतां **गोदावरीचें** लग्न करून टाकण्याचें अहोरात्र तिच्या मनांत होतें व सरते शेवटीं तिनें ते सिद्धीसही नेलें, त्याप्रमाणेंच **नानाच्या** लग्नांत पदरचा कांहीएक खर्च न होतां सर्वोपरी आपल्या मानापानाचा बेत राहून ( गोपिकाबाईविषयीं विचारही नको) हुंडा म्हणून आठशें हजार रुपये किंबहुना अधिक मिळावे हा तिचा पक्का आशय होता; व त्याप्रमाणें तो सिद्धीस जाईल अशा खटपटींतही ती होती.

कशी तें पहा. वर **काशीनाथपंतांनीं** जें **कृष्णरावांस** पत्र पाठविलें त्यांत सरते शेवटीं कोणा एका सावकाराविषयीं लिहून सुचविलें होतें तें बऱ्याच अंशीं खरें होतें. व या "**सांजोरी**" च्या सावकारांनीं **नानास** पहिल्या दिवसापासून हवा तितका पैसा पडला तरी आपली मुलगी या मुलास द्यावी असा बेत केला होता. आतां, ते एवढे मोठे सावकार असून **नानासारख्या**

गरीबास एवढा खर्च करून आपली मुलगी देण्याचें कारण काय हें वाचकांस थोडेंसें गूढ पडेल; परंतु मुलीचें थोडेंसें वर्णन दिलें असतां तें गूढ तेव्हांच नाहींसें होईल. **सांजोरी**च्या सावकारांचीं मुलगी अगदीं खुजी, काळी, एका डोळ्यानें अजीबात व एका पायानें अंमळ अधू अशी होती. शिवाय डोक्यांतही अधूपणा होता. पायाचा व डोक्याचा अधूपणा मुलगी पहावयास येणाऱ्यांस झटकन् कळत नसे. पण डोळ्यांची गोष्ट तशी नव्हती; कारण, त्या डोळ्यावर देवींनीं आपला प्रताप गाजविला होता. तेव्हां अशी मुलगी असल्यावर बरोबरीचे श्रीमंत असतील ते आपल्या मुलाला काय म्हणून करतील ? आणि यांना तरी श्रीमंतांच्या येथें जाऊन मुलगी दाखविण्यास अगर दाखविल्यावर करा म्हणून म्हणण्यास तोंड कोठलें ? तेव्हां तेही असाच गरीब कोणी मिळाल्यास पहात होते, तें हें आयतेंच घाऊक त्यांस सांपडलें. **सीताबाई**च्या मनांतला आशय काय तो आपल्यास कवडीचाही खर्च न पडतां उलट रगड पैसे मिळावे. मुलगी चांगली, वाईट, याचा विचार करतो कोण ? आणि एखादे वेळीं केला, तरी " गरिबांच्या कारट्यांना चांगली बायको पाहिजे कशाला ? आणखी देणार आहे कोण ? आलं आहे आयतं तें उरकून घ्यावं. " असे एकसारखे विचार व उद्गार तिच्या मनांत व मुखांत उठत. **काशीनाथपंतां**ला मात्र तें कांहीं आवडलें नाहीं, म्हणूनच तें लग्न झालें नाहीं; नाहीं तर केव्हांच होऊन जावयाचें. त्याला थोडीबहुत लोकांची चाड असल्याकारणानें तें करणें त्याचे मनांत येईना ! पैशाच्या आशेनें **काशीनाथपं**तानें पोराच्या संसाराचा नाश करून सोडला असें जो तो म्हणेल व तोंडांत शेण घालील, हें त्यास पक्केपणीं वाटत होतें. मुलगी पाहिल्याबरोबर कोणाच्याही तोंडांतून सहजगत्या " अरेरे " असा शब्द निघणार हें तो जाणून होता. त्यांतून पोरगा अगदीं ठोंब्या ! किंवा त्याला कांहीं व्यंग अशांतली तरी गोष्ट आहे ? मुलगा चांगला सशक्त, अव्यंग व हुशार. चार महिन्यांनीं बी. ए. होणार. **सीताबाई**ला त्याचें बरें व्हावें ही इच्छाच नव्हती. ती म्हणे: " अशा पोरी झाल्या म्हणून कुणीं टाकून दिल्या आहेत का काय ? गरिबांच्या मुलांनीं अशाच बायका कराव्या, त्यांतून ते वाटेल तितके पैसे खर्च करावयाला तयार आहेत. मग कां हातचें घालवा ? " एक पैशाखेरीज तिला कांहींच दिसत नव्हतें. तिला दुसरा विचार कोठला ? आणि **नान्याच्या** व **गोपिकाबाई**च्या मनाची अगर संसाराची तिला कशाला काळजी ? नवऱ्याच्या कानीं कपाळीं तिचा एकसारखा जप हाः " आयते ते सावकार चालून येताहेत तर आपण नाहीं होय काय म्हणून

म्हणावं ? झालं काय अंमळ मुलगी वाईट असली म्हणून ? कांहीं संसार रहातो का काय ? नाहीं तेंच आपलं एक. अशा श्रीमंताची मुलगी मिळायला पाहिजे. खर्च नाहीं वेंच नाहीं. कांहीं नाहीं. ”

गोपिकाबाईस बरें वाईट कधीं विचारावयाचेंच नाहीं तेव्हां तिला बिचारीला बोलण्याला जागा कोठली ?

काशीनाथपंत ऐकेना आणि तशांत वर लिहिलेलीं पत्रें आलीं त्यामुळें सीताबाईच्या अंगाची अधिकाधिकच आग होऊन तिला असें झालें कीं, हें कृष्णरावाच्या मुलीचें मोडीन कसें ? तें जुळल्यास आपल्यास एक कवडीचीही प्राप्ति होणार नाहीं. तेव्हां हें असलें जुळूं देतां कामा नये. आपल्या नवऱ्याचा पडला भोळा कारभार. तो कदाचित् कोणीं बाहेरल्या मंडळींनीं भर घातल्यास चटकन् कबूल करील. तर आपण आतां जाकरूक राहून प्रत्येक दुसऱ्या जमवाजमवीत मोडता घालून आपल्या मनांत आहे तेंच जमवून आणलें पाहिजे. असा तिनें पक्का विचार केला व त्या विचारानुसार नवऱ्याच्या पाठीमागें टुमणी लावण्याचाही निश्चय करून, तो होईल तितक्या नेटानें अंमलांत आणण्याचा तिनें प्रयत्न सुरू केला. दुसऱ्याचें होईल तितकें वाईट करण्याची इच्छा आणि स्वतःला प्राप्ति होण्याची आशा, या दोन गोष्टी जेथें एक झाल्या तेथें काय विचारावयाचें आहे ? प्राप्तीची इच्छा एकटी असली तरी केवढालीं जबरदस्त पापें करविते पहा ! या पृथ्वीवरील सर्व पातकांपैकीं तीनचतुर्थांश पातकें म्हणजे बालहत्या, स्त्रीहत्या, पुरुषहत्यां, राष्ट्रहत्या, सर्वथा प्राप्तिच्यालोभानें होत आहेत. असें जो म्हणेल तो खऱ्यापासून फार दूर नाहीं इतकेंच नाहीं, परंतु अगदीं नजिक आहे, हें कोणीही सांगूं शकेल. हा धनलोभ नसता, तर द्वेषाचें मूळ जातें. हा धनलोभ नसता, तर लढायांचें नांव फार थोडेंच निघतें. हा धनलोभ नसता, तर पुष्कळांस अपमान सोसूनही कित्येक गोष्टी कराव्या लागतात त्या कराव्या लागल्या नसत्या. परंतु, हेंही एक येथें लक्षांत धरलें पाहिजे कीं, हा धनलोभ नसता, तर ज्या उन्नत स्थितींत आज हें जग आहे त्या स्थितींत ते कधींही नसतें.

लोभी मनुष्य आपल्या तृष्णेचें शमन व्हावें म्हणून लोकांचें नुकसानही करण्यास प्रवृत्त होतो व बहुतेक प्रसंगीं खुशालपणें मनाला कांहींएक दिक्कत न वाळमतां दुसऱ्याचें नुकसान करतो. मग जेथें दुसऱ्याचें नुकसान करण्याची इच्छा मूळची असून त्यांत लोभ मिसळला असेल तेथें काय विचारावयाचें आहे ? पहिल्यापासून सीताबाईस

**नानाचें** व **गोपिकाबाईचें** कोणत्याही तऱ्हेनें चांगलें व्हावें असें वाटत नव्हतें इतकेंच नव्हे, उलट त्यांचें जेवढें नुकसान होईल तेवढें ती करण्यास पाही. मग तिला अशा वेळीं **नानास** चांगलीं सासूसासरा अगर बायको मिळावी असें वाटेल कशाला ? **कृष्णरावांचें** पत्र आल्यापासून तिला अगदीं चैन पडेनासें झालें व तिनें नवऱ्याच्या पाठीमागें **सांजोरीच्या** सावकारांचीच मुलगी करावी अशाबद्दल एकसारखा आग्रह चालविला व **कृष्णरावांस** स्पष्टपणें " आमचे मनांतून यंदां लग्न करणें नाहीं. " असें लिहिण्याची एकसारखी टुमणी लाविली. त्याचा तूर्त परिणाम एवढाच झाला कीं, **काशीनाथपंतांनें कृष्णरावास** मुळीच पत्र लिहिलें नाहीं व **बाबा-साहेबांस**ही कांहींएक विचार कळविला नाहीं. आणखी कांहीं परिणाम झाला तो अर्थातच पुढें कळेल.

---

# प्रकरण ७ वें.

## गोविंदराव दप्तरदार.

—— ( मुद्दाम नांव लिहीत नाहीं ) हें मध्यम स्थितींतलें शहर असून जिल्ह्याचें ठिकाण आहे. येथें वस्ती चांगली तीस पसतीस हजारांपेक्षां जास्त असून येथें लष्करही असतें. शहर जुनें म्हटलें तर जुनें; नवें म्हटलें तर नवें. कारण, हें मागील काळीं जरी प्रसिद्ध होतें तरी याचा कांहीं कांहीं भाग नवीन आहे, पण हें मोडतें जुन्यांत. येथें जुने वाडे बरेच असून ते चांगले शोभिवंत आहेत. येथें व्यापार चांगला चालतो. सर्व जिल्ह्याच्या व्यापाराचें ठिकाणच हें म्हटलें तरी चालेल. इंग्रजसरकारचीं जिल्ह्याचे ठिकाणीं असणारीं सर्व ऑफिसें या ठिकाणीं आहेत. मोठें थोरलें हायस्कूल आहे, लायब्ररी आहे. दोन वर्तमानपत्रें निघतात. लोक बरे आहेत. एक लोकहित-वर्धिनी सभा आहे. लोकहितवर्धिनी हें त्या सभेचें नांव नव्हे, परंतु तिच्या उद्देशावरून मीं तसें म्हटलें आहे. तिचें नांव आतां माझ्या लक्षांत नाहीं. पण या सभेनें लोकहिताचीं पुष्कळ कामें करण्याचा प्रयत्न केला; पुष्कळ अर्ज पाठविले; पुष्कळ डेप्युटेशनें पाठविलीं; तेव्हां तिला **लोकहितवर्धिनी** हें नांव दिलें तर शोभण्याजोगें आहे. गांवांत म्युनिसिपालिटी आहे. पाणी

हवें तेवढें. नदी मोठी थोरली. स्वच्छता अर्थातच आहे तितकी ! किती ती आपण आपल्या मनांत समजून घ्यावी. पण जाऊं द्या. याचें सारेंच वर्णन करण्यापेक्षां तें यथावकाश देत गेलेलें बरें. सध्यां आपण आपल्या गोष्टीकडे वळूं. चला तर त्या खालच्या आळींतल्या दुमजली वाड्यांत. कारण, तेथेंच आमचे **गोविंदराव** दप्तरदार राहतात.

हा वाडा दुमजली व चांगला मोठा आहे. याला पुढें मागें जागा रगड. पुढें आंगण वलांडलें कीं ओटी आणि डाव्या उजव्या बाजूला उघडीं दालनें म्हणजे आंगण चौकासारखें आहे. मग पहिली फरशी आतां काढली आहे कीं काय कोण जाणे ? मोठ्या वाड्यांत ज्या ज्या कांहीं जागा असतात त्या त्या या वाड्यांत आहेत. तळमजल्यावर दालनें, ओटी, माजघर, देवघर स्वयंपाकघर, कोठीची खोली, सोंवळ्यांची खोली, पडवी, आणखी पाठीमागें परसूं. दुसऱ्या मजल्यावर दिवाणखाना, मधली माडी, आडवी माडी, व पलीकडली माडी, आणखी थोडीशी गच्ची. शिवाय एक दोन खोल्या व त्याच्यावर माळा.

पुढला दिवाणखाना चांगला विस्तीर्ण असून यांत वस्तू कांहीं फार नव्हत्या. एका कोंपऱ्याला एक लिहिण्याचें टेबल व त्याजवळ दोन तीन खुर्च्या होत्या. एक ईझीचेअर व एक कोंच होतें, एक कपाट तेथेंच होतें त्यांत पुस्तकें होतीं. एक मोठी थोरली सतरंजी इथून तिथून पसरली होती. वर सांगितलेल्या टेबलाजवळ एक तरुण गृहस्थ लिहीत बसलेला होता. वर जें कोंच सांगितलें त्यावर एक गृहस्थ वामकुक्षी करीत पडला होता. हा गृहस्थ अमळ पोक्त सुमारें चाळीस पंचेचाळीस वर्षांचा असावा असें अनुमान कोणीही करील. ज्यावेळीं हा गृहस्थ वामकुक्षी करण्याच्या बेतानें त्या कोंचावर पडला असेल त्या वेळीं त्यानें आपलें उपरणें निदान गळ्यापर्यंत घेतलें असावें; परंतु आतां तें अंगावरून दूर झालें होतें; याचा चेहरा किंचित् त्याच्या हृदयांत कठोरतेचें आधिक्य असावें असें दाखवीत असे. शरीरावरून पाहतां यास सशक्तांतही गणतां येणार नाहीं व अशक्तांतही गणतां येणार नाहीं. मग कांहीं काळजीमुळें तो उतरल्यासारखा दिसत असल्यास सांगवत नाहीं. चेहरा जरी त्याच्या हृदयांतील कठोरता दाखवीत असे, तरी त्यावर तेज नव्हतें व तेवढ्यावरून त्यास कांहीं तरी जबरदस्त काळजी असावी असें मनांत येई. **गोविंदराव** दप्तरदारांसारख्या खाऊन-पिऊन सुखी व चार पैसे बाळगून सचोटीनें वागणाऱ्या मनुष्यास एवढी

काय काळजी असेल कोण जाणे. वास्तविक म्हटलें म्हणजे **गोविंदरावास** कांहीं काळजी असेल असें कोणास वाटूं नये. पण सूक्ष्म पहाणारास त्यांचा चेहरा तसें वाटावयास लावी. वर ज्याचें वर्णन दिलें आहे तो गृहस्थ आमच्या **गणपतरावा**चा बाप होय. **गोविंदराव** दप्तरदार एकंदरींत चांगला होता. पापभीरु असे. त्यास आपल्या माणसांचा मोठा अभिमान असून जोंपर्यंत आपल्या अंगांत ताकद आहे तोंपर्यंत आपल्या नातेवाईकांपैकीं जे गरीबगुरीब असतील त्यांचा प्रत्यक्ष अगर परोक्ष चांगला समाचार घेत जावा असें त्याचें मत असे, व वर्तनही असे. वास्तविक म्हटलें म्हणजे **गोविंदराव** दप्तरदारांचीं स्वतःचीं माणसें काय तीं चार कीं पांच. तो, त्याची आई, बायको, सून व मुलगा. **गणपतरावा** खेरीज त्याला दुसरें अपत्य मुळीच नव्हतें हें मागें सांगितलेंच आहे; परंतु तो गृहस्थ फार चांगल्या मनाचा होता व पैशाचा योग्य व्यय होत असल्यास कधीही मागें न घेणारा असा होता. यामुळें त्यानें आपल्या नातेवाईकांपैकीं गरीब स्थितींत असले-ल्यांस आपलेजवळ आणून ठेवून त्यांचा सांभाळ चालविला होता. शिवाय एक दोन गरीब विद्यार्थीही घरीं ठेविले होते. आणि इतक्या सर्व मंडळी-साठींच त्यानें एवढें थोरलें घर घेतलें होतें. तो आपलीच माणसें घेऊन राहता तर त्याला एवढ्या घराचें काय करावयाचे होतें? याच्या या स्वभावामुळें त्याचे येथें पाहुणेराहुणेही पुष्कळ येत व त्यामुळें घर नेहमीं लग्न-घरासारखें गजबजलेलें असे.

खरोखर ज्या घरांत मुलें माणसें पुष्कळ असून सर्व अगदीं आनंदानें राहतात त्या घरांतल्या शोभेसारखी शोभा दुसऱ्या कोठें तरी असेल काय? ज्याजवळ पैसा असून तो कोणाच्याही उपयोगीं पडत नाहीं असा मनुष्य सुखी असें कोण बरें समजत असेल? जर द्रव्यरक्षक कद्रूस सुखी असें म्हणतां येईल तर सरकारी खजिन्याच्या पेट्या, कीं ज्यांत केव्हां केव्हां कोटी कोटी रुपयेही असतात त्या, किंवा ज्या टांकसाळींतून सर्व नाणीं निघतें त्या किती बरें सुखी समजाव्या? पैसा हा काय चंचल असतो. तो जाण्याची वेळ आली म्हणजे लाखों कुलपें तोडून व शेंकडों फूट खोल भुयारांतून झपाट्यानें बाहेर येऊन खुशाल निघून जातो. **सोमनाथाच्या** मूर्तींत एवढी संपत्ति भरली होती, परंतु वेळ येण्याबरोबर ती मूर्ति फोडून म्लेंच्छांकडे निघून गेली! कोणत्या संपत्तिवान् मनुष्याची, देशाची अगर राष्ट्राची संपत्ति फार काळपर्यंत टिकली आहे? फार कशाला समुद्रांत अत्यंत

खोल अशा जागीं व पृथ्वीच्या पोटांत शेंकडों फूट खोलीवर ज्या **विश्वानें** संपत्ति नेऊन ठेविली त्या **विश्वास**देखील फसवून ती संपत्ति बाहेर आली आहे आणि अजून येईलही व पुनः भलत्याच ठिकाणीं जाईलही, असा या संपत्तीचा चपलपणा जबरदस्त आहे. तर शहाण्या मनुष्यानें तिचा जेवढा अंश आपल्या हातीं लागेल तेवढा सत्कर्मीं लावून कीर्तीचा लाभ करून घ्यावा हें चांगलें असें कोण म्हणणार नाहीं ?

**गोविंदराव** दूसरदार याच मताचा असून त्याप्रमाणें चालतही असे. आपलें मनुष्य संकटांत पाहिलें म्हणजे त्यास मदत केल्यावांचून त्याला रहावत नसे. परंतु त्यांचे हातून यासंबंधांत थोडा अतिरेक होऊन उधळपट्टी होई. त्यांच्या मातुश्रीचा स्वभाव तसा नसे. कांहीं तरी द्रव्याचा संचय करावा असें तिला वाटे. व यामुळें **गोविंदरावांचें** व तिचें एखादे वेळीं भांडण होत असे. वर लिहिलेल्या एकंदर गोष्टींवरून **गोविंदराव** एकंदरींत चांगला मनुष्य असें सर्वास वाटेल; परंतु 'न निर्दोषं न **निर्गुणम्**' हें वाक्य नेहमीं लक्षांत ठेविलें पाहिजे. व या वाक्याप्रमाणें **गोविंदरावांच्या** अंगींही एक दोन दुर्गुण होते. त्यांपैकीं एक हा कीं, यांचा स्वभाव फारच उतावळा व कडक होता. त्यांस राग फारच लवकर येई. आपल्या मर्जीविरुद्ध बारीकशी गोष्ट झाली तरी त्यांस ती खपत नसे. ते आपल्याकडून पुष्कळ खटपट करून रागाविण्याचे प्रसंग फार थोडे येऊं देत; परंतु राग आला म्हणजे त्यांस तो अगदीं अनावर होत असे आणि हा राग अनावर झाला म्हणजे त्यांचे हातून ते शांत स्थितींत असतांना स्वप्नांतही होणार नाहींत अशा गोष्टी होऊन जात. ते खऱ्या मार्गाचे अगदी निःसीम भक्त असत, यामुळें त्यांस खोटें म्हणजे तिळप्रायही खपत नसे. गड्यामाणसांस किंवा कचेरीतील हाताखालच्या मंडळीस तर काय, परंतु वरांतील मंडळीसही त्यांचा अतिशय धाक वाटे. कचेरींतील कारकून लोकांस ते कधीं वाईट तऱ्हेनें बोलत नसत; परंतु एखाद्याची चूक ( मग ती अगदी लहान असो अगर मोठी असो ) त्यांना आढळली किंवा एखादा टंगळमंगळ करणारा आहे असें त्यांच्या नजरेस आलें किंवा कोणाचा जाणूनबुजून केलेला असो किंवा न कळत झालेला असो पण खोटेपणा त्यांच्या दृष्टीस पडला, कीं त्यांच्यासारखा वाईट कोणी नव्हता. अशा वेळीं त्यांस अत्यंत संताप येऊन ते हव्या त्या शिव्या देत, हवा तो दंड करीत. यामुळें जे वाईट मनाचे लोक होते ते हे वरिष्ठ म्हणून यांच्या तोंडावर तेवढें गोडगोड बोलून नेहमीं यांचे अनिष्ट

चिंतीत असत. अगदीं गरीब, सालस, कोणाच्या अध्यामध्यांत न पडणारा, कोणाचें नुकसान न करणारा, असा जरी मनुष्य असला तरी देखील त्याला शत्रु असतात; मग **गोविंदरावां**सारख्या रागीट व रागाच्या भरांत, न व्हाव्या त्या गोष्टी करणाऱ्या गृहस्थास पुष्कळ शत्रू असावेत यांत नवल तें काय ? जे स्वभावतः वाईट त्यांस **गोविंदरावांची** सत्यावरील निःसीम भक्ति काय होय ? त्यांचा जर त्यापासून फायदा न होतां फाजील तोटा होतो आहे तर ते काय म्हणून त्याचा द्वेष करणार नाहींत ? दुसरा एक दुर्गुण **गोविंदरावां**च्या अंगीं होता. तो हा कीं, एखाद्या मनुष्याविषयीं त्यांचें एकदां मत वाईट झालें म्हणजे मग तें बदलण्याचा फारसा संभव नव्हता. या दुर्गुणापासून केव्हां केव्हां असें होई कीं, मनुष्य अगदीं चांगलाही असून त्याच्याविषयीं **गोविंदरावां**चें मत वाईट होई आणि एकदां असें झालें म्हणजे तो जर **गोविंदरावां**च्या हाताखालील असला तर त्या बिचाऱ्याचें थोडेंबहुत नुकसानही होत असे.

एकदां असें झालें कीं, **गोविंदरावां**च्या कचेरींत एक जागा रिकामी झाली, त्याजवर साहेबांच्या स्नेह्यांच्या शिफारशीवरून एक दुसऱ्या जिल्ह्यांतला मनुष्य लागला. **गोविंदरावा**चा मूळपासून अगदीं असा ग्रह कीं, नुसत्या शिफारशीनें जे चाकऱ्या मिळवितात ते केवळ शंख असून कुचकामाचे असतात. आतां था ग्रहापासूनच जेव्हां त्या नवीन मनुष्याविषयीं त्यांचें मत वाईट झालें तेव्हां मग पुढें काय विचारावयाचें आहे ? त्यांत आणखी मजा अशी झाली कीं, पहिलेच दिवशीं त्या मनुष्याच्या हातून कामांत पुष्कळ चुका झाल्या. वास्तविक पाहतां यांत कांहीं विशेष नाहीं. नवखा मनुष्य—ज्या कामावर हल्लीं त्याला नेमिलें होतें तें काम त्यानें पूर्वीं कधीं केलेलें नाहीं त्यांत चुका होतील यांत नवल काय ? परंतु ही गोष्ट **गोविंदरावा**च्या ध्यानांत येतां त्या मनुष्याविषयीं त्यांचा फार वाईट ग्रह झाला; आणि शेवटीं असा परिणाम झाला कीं कांहीं दिवसांनीं तो गृहस्थ आपली दुसऱ्या ठिकाणीं बदली करून घेऊन गेला. अशा आणखी देखील बारीकसारीक गोष्टी सांगतां येतील. या सर्व गोष्टींमुळें **गोविंदरावांस** सर्व लोक भीत असत. कचेरींतील लोक तर यानें कांहीं सांगितलें असतां तावडतोब करीत; कारण न जाणों, एखादे वेळीं मत वाईट झालें तर करतां काय? या दोन दुर्गुणांखेरीज त्यांचे अंगीं दुसरी कोणतीही वाकगी गोष्ट नव्हती. कुणा दया करूं लागला म्हणजे तिला पारावार नसे. घरांतील सर्व माणसांवर

त्याचें सारखें प्रेम असून तो सारखी नजर ठेवी. कोणाला कांहीं कमी पडूं देत नसे. एकदां चांगले वाटलें म्हणजे त्याचा कधींही तिरस्कार करीत नसे. हें सारें खरें होतें; पण वरील गोष्टींनीं या सर्वांवर पाणी पडल्यासारखें झालें होतें. ज्यांचा वं त्याचा ऋणानुबंध असेल त्यांसच काय तो त्याचा खरा स्वभाव, खरें मोल ठाऊक होतें. इतरांस त्याच्या स्वभावाची जी बाजू दिसेल त्या बाजूवरून त्यांच्या मनांत या गृहस्थाच्या बऱ्यावाईटपणाविषयीं काय तो ग्रह होई. ज्याला त्याच्या स्वभावाची चांगलीच बाजू दिसे त्याला तो फार मायाळू , सज्जन व उपकारी असा दिसे, ज्याला त्या वर सांगितलेल्या नवख्या कारकुनाप्रमाणें फक्त रागीट बाजू दिसे तो त्यास फार तामसी असें समजे. असे त्याच्याविषयीं नानातऱ्हेच्या लोकांचे मनांत नानातऱ्हेचे ग्रह असत. जे लोक मनानें चांगले व ज्यांस त्याचा अनुभव जास्त त्यांस तो चांगला वाटे. पण असे लोक किती असावयाचे ? इतर प्रकारचे म्हणजे **काशीनाथपंत** व त्याच्याच सारखे जे आणखी कांहीं लोक असत ते यास वचकून असत व याच्या तोंडावर मोठें गोड बोलून स्तुति करीत; परंतु त्यांच्या मनांत याच्याबद्दल मोठा द्वेष असे. हा द्वेष अर्थातच एकतर्फी होता. एकतर्फी म्हणण्याचें कारण इतकेंच कीं, **काशीनाथपंत** व त्याचे अनुयायी हेच काय ते याचा द्वेष करून याला पाण्यांत पहात असत. त्यांचा आपण द्वेष करावा हें यांच्या स्वप्नींही नव्हतें.

**गोविंदरावाचें** आपल्या मुलावर व बायकोवर अत्यंत प्रेम असल्याकारणानें त्यांचा राग त्या दोन ठिकाणीं मात्र कधींही होत नसे; इतकेंच नव्हे, तर दुसऱ्या कोणावर राग झाला असतां या दोघांपैकीं एक जर मध्यें पडलें, तर तो राग शांतही होत असे. पदार्थविज्ञानशास्त्रावरून आपल्यास कांहीं कांहीं पदार्थ असे दिसून आले आहेत कीं, ते बाह्यतः एक दिसून आंतून अनेक पदार्थांच्या बेमालूम मिश्रणाचे बनलेले असतात. त्याचप्रमाणें **गोविंदराव** जरी बाह्यतः एक दिसत होता, तरी तो अनेक गोष्टींचें विलक्षण मिश्रण होता. त्याचें पुरतेपणीं पृथक्करण करणें मोठें कठिण होतें. निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या अनुभवांनींच तें जाणिलें पाहिजे; सबब आतां त्यांस येथेंच सोडूं.

वर दिवाणखान्याचें वर्णन देतांना असें सांगितलेंच आहे कीं, या दिवाणखान्यांत, आम्ही वर्णन देत आहों या वेळीं, दोन व्यक्ति होत्या. एक कोंचावर निजलेले **गोविंदराव**; व टेबलाजवळ लिहित बसलेला तरुण

गृहस्थ. हा तरुण गृहस्थ कोण हें आतां वाचकांना काय सांगावयाचें आहे. **गणपतराव** या वेळीं एक पत्र लिहिण्यांत अगदीं गढून गेला होता. तो असा गढला आहे तोंच आपण एकदां त्याच्या सर्वांगाकडे व चेहेऱ्याकडे पाहून घेऊं. वर मीं असा प्रश्न केला खरा कीं " हा दुसरा तरुण गृहस्थ कोण होता हें वाचकांस काय सांगावयाचें आहे ? " परंतु माझी तसें करण्यांत थोडीशी चुकी झाली. कित्येक वाचक त्यास झट्कन् ओळखतील, कित्येक ओळखणार नाहींत अशी आज **गणपतरावाची** स्थिति झाली होती. ज्यांनीं प्रथम भेटीलाच, याचा व आपला संबध फार येणार असें जाणून, त्याची पुरी ओळख करून घेतली असेल, त्यांनीं दिवाणखान्यांत येण्याबरोबरच त्यास ओळखलें असेल, परंतु ज्यानीं तसें केलें नसेल त्यांजला **गणपतरावा**ची हल्लीं बरीच दुरवस्था झाल्याकारणानें त्यास ओळखण्यास जड गेलें असेल. आपल्या व त्याच्या प्रथम भेटीला कांहीं फार दिवस झाले नाहींत, तरी तितक्या अवकाशांत काय कारण असेल तें असो, त्याची शरीरावस्था फार बदलली होती. गाल बरेच बसून आंतील हाडें आपलें अस्तित्व पूर्णपणें जरी नाहीं तरी बऱ्याच अंशानें दाखवीत होतीं. डोळे खोल गेले होते. गळ्याच्या खालचीं हाडें दिसूं लागलीं होतीं. यावरून अगदीं स्पष्ट दिसून येई कीं, याला कांहीं तरी होत असावें. कांहीं तरी हृद्रोग लागला असावा. हृद्रोगासारखा जबर दुसरा कोणताही रोग नाहीं; अत्यंत सुखावस्थेंत असणाऱ्या, ज्याला खायची प्यायची कांहींएक उणीव नाहीं; अशा मनुष्याला देखील हा रोग एकदां लागला कीं त्याला तेव्हांच गिळावयाला लागतो. काळजी म्हणजे ती अमुकच गोष्टीविषयीं म्हणजे जाळते आणि अमुक गोष्टीविषयी असली म्हणजे जाळीत नाहीं, असें नाहीं; काय जो फरक तो फार झालें तर जाळण्याच्या प्रखरतेंत किंवा जलद्पणांत असेल. बाकी काळजीचा धर्म एक. " काय होईल कसें होईल " हें ज्या मनुष्याच्या पाठीमागें लागलें त्या मनुष्यानें शांतीचें नांव सोडावें. ती त्याला कधींही प्राप्त व्हावयाची नाहीं.

Deep in the breast Care builds her nest,
Rocks restlessly and scares away all rest.
Some secret sorrow, still the envious one
Keeps stirring at till peace and joy are gone.

जर्मन महाकवि जो **गअठे** त्याच्या उत्तमोत्तम नाटकांतील नायकाच्या तोंडच्या या चार ओळी किती सुंदर आहेत ! तसेंच आपल्याही एका कवीनें चिता व चिंता यांचें सभेद साम्य किती सुंदर तऱ्हेनें दाखविलें आहे ! एका बिंदूचाच काय तो भेद. जाळणें हा दोघांचाही धर्म. पण त्या बिंदूनें भेद केला; एक निर्जीवाला जाळणारी आणखी दुसरी सजीवाला !

वर जी **गणपतरावा**ची स्थिति वर्णन करून सांगितली आहे तीवरून त्यास मोठी काळजी लागली असावी असा आमचा आपला तर्क. कारण थोडक्या अवधींत दुसऱ्या कोणत्याही रोगानें तो इतका खंगला नसता.

**गणपतराव** वर सांगितल्याप्रमाणें पत्र लिहीत बसला होता. बऱ्याच वेळानें त्याचें तें पत्र लिहिणें झालें, व तो तें पुनः वाचूं लागला. कागद बरेच होते, यावरून पत्रही खूप मोठें असावें असें वाटतें. तो तें वाचण्यास प्रारंभ करितो आहे तों एक वृद्ध बाई त्या दिवाणखान्यांत आली. ही बाई निदान साठ वर्षांवर वृद्ध असावी. ती किंचित् वांकली होती, तरी जातीची ठेंगणीच असल्याकारणानें वार्द्धक्यानें जितकी वांकावी तितकी वांकली नव्हती. तिचा चेहरा फार सौम्य व गंभीर दिसे व ती आपल्या पणांत असतांना मोठी दक्ष बायको असावी असें दाखवी. ही वृद्ध बाई हलकेच आंत आली. **गणपतरावा**च्या लक्ष्यांतही आलें नाहीं. आणि तशांत तो पाठमोराही होता. ती **गणपतरावा**च्या अगदीं जवळ जाऊन त्यास हलकेंच म्हणाली, " काय रे करतो आहेस **गणपु** ? अन् तिथें कोण निजलं आहे ? **गोविंदा** का ? आज एव्हांशीं निजला आहेसा ! "

या तिच्या बोलण्यावरून व हांका मारण्याच्या पद्धतीवरून ही बाई कोण हें सर्वांच्या लक्ष्यांत आलेंच असेल. ही **गोविंदरावां**ची वृद्ध मातुःश्री-**गणपतरावांचें** अगदीं लहाणपणापासून संगोपन करून त्याला जिनें वाढविलें व तो जिचा अगदीं जीव कीं प्राण होता, तीच ही **गणपतरावां**ची आजी.

आपल्या आजीचा प्रश्न ऐकून **गणपतराव** तीस म्हणाला, " उगच निजले आहेत. कांहीं कारण नाहीं. " व हे शब्द तो जों बोलतो आहे तों **गोविंदराव** अर्धवट जागेच होते, तेही म्हणाले, " कांहीं नाहीं उगच पडलों आहें. " परंतु एवढ्या उत्तरानें त्या म्हातारीचें समाधान होईना. ती लागलीच **गोविंदरावा**चे जवळ गेली व त्याचे कपाळास हात लावून म्हणाली, " कांहीं कपाळबिपाळ का दुखतं आहे ?" त्यावर **गोविंदरावांनीं**

पुन्हां तिला आपल्याला कांहीं एक होत नसून उगीच पडल्या पडल्या झोंप लागली, असें सांगितलें. परंतु म्हातारीला तें कांहीं खरें वाटेना. कारण **गोविंदरावां**स दोन प्रहरीं निजण्याची कधींच संवय नसे. त्यांतून सध्यां रात्रींदेखील त्यांना झोंप येत नसे. इत्यादि गोष्टींवरून तिला तें त्यांचें दुपारीं निजण्याचें कारण बिलकुल खरें वाटेना. तिनें त्यांच्या अंगास हात लावून पाहिला, व " हें ! आंग देखील कोंबट लागतं आहे. आणखी कांहीं नाहीं म्हणतोस का ? असं काय आतांशा करतोस तें ? कांहीं आणखी का लिहून आलं आहे ? इतकी कशाला काळजी करावी ती ? असेल नशिबीं तें होईल. काळजी करून काय उपयोग ?" अशा तऱ्हेनें तिनें आणखी कित्येक प्रश्न त्याला केले. मातृप्रेम कांहीं विलक्षण आहे. त्याला आपल्या लेकरांसंबंधीं सर्व गोष्टींची काळजी असते. मग तें अपत्य केवढेंही असो. **गोविंदरावां**ना ताप वगैरे कांहीं एक नव्हता, त्यांचें अंग तापलें नव्हतें, परंतु त्या वृद्ध मातेला नसती भ्रांति उत्पन्न होऊन तिनें लागलींच विचारून पुसून सर्व कांही खटपट केली. **गोविंदराव** बिचारा वास्तविक उगीचच कांहीं एका महत्त्वाच्या गोष्टीवर विचार करीत पडला होता, तों कांहीं वेळानें अंमळ त्याचा डोळा लागला. दुसरें असें दिसतें कीं, ( अर्थातच त्या वृद्ध बाईच्या भाषणावरून ) **गोविंदरावा**स कांहीं एका गोष्टीविषयीं मोठी काळजी लागली असावी. त्याचा चेहरा व **गणपतरावा**चा चेहराही या आपल्या तर्कास बळकटीच देणारे होते हें वर दिलेल्या वर्णनावरून समजेलच; पण ही काळजी काय असेल ती समजण्याची, किंवा या सर्वांना अगदीं कृश व निस्तेज करणारें कारण तरी काय हें शोधून काढण्याची तजवीज करावयाची असल्यास ती यांच्या संभाषणांवरूनच होण्याचा संभव जास्त; तेव्हां यांचें संभाषण झाल्यास तें कांहीं वेळ ऐकिलें पाहिजे.

**गोविंदरावा**ची आई वरीलप्रमाणें बोलल्यानंतर **गोविंदरावां**नीं तीस आपल्याला कांहीं होत नाहीं व कोणत्याही गोष्टीची आपण कांहीं काळजी बाळगीत नाहीं असें सांगितलें; आणि एवढी गोष्ट खरी होती कीं, कांहीं विशेष गोष्टी खेरीजकरून एकंदरींत **गोविंदराव** हा मनुष्य मोठा धिम्मा होता. कांहीं नुकसानविकसान झालें किंवा अधिक आगळा खर्चवेंच झाला तर त्यास त्याची बिलकुल दिक्कत वाटत नसे. एखादी राग उत्पन्न करणारी गोष्ट असली; म्हणजे मग मात्र केव्हां केव्हां त्याचा धिम्मेपणा लपत असे. मग त्याचा तो आपल्या स्वाधीन नसे.

असा धिम्मा मनुष्य असून त्याला जर कांहीं गोष्टीविषयीं काळजी लागली असेल, व त्या काळजीमुळेंच जर तो इतका खंगला असेल तर ती काळजी लागणारी गोष्ट सामान्य नसावी हें उघड आहे. **गोविंदरावाच्या** आईला लहानपणापासून आपल्या मुलाचा स्वभाव ठाऊक असून तीही त्यास काळजी करूं नको, काळजी करूं नको, म्हणून पुनः पुनः सांगत आहे, तेव्हां वरील अनुमानच विशेष दृढता पावतें.

**गोविंदरावा**पासून कांहीं निष्पन्न होत नाहीं असें पाहून त्या वृद्ध बाईनें आपल्या नातवास विचारलें, " काय रे **गणपु** ? आणखी का कांहीं लिहून आलं ? "

**गणपतराव**:–नाहीं बरं आई. कांहींएक नाहीं. अगदीं काळजी करूं नको तूं.

**गोविंदरावांची आई**–तूं काय हें करतो आहेस ? कोणाला हें पत्र लिहितो आहेस एवढं ?

**गणपतराव**:–आई, **नानाला**. तो आला तर कदाचित् येईलय् इथें. कांहीं आणायचं आहे का पुण्याहून ?

**आई**:–पुण्याहून काय आणायचं आहे ? आलाच तो लवकर तर एक पायलीभर रांगोळी घेऊन यायला लिही. आणखी कांहीं नाहीं दिसत आणायचं ? पण तो इतके दिवस नाहीं आला आणखी आतां रे कशाला यायचा? त्याच्या लग्नाचं जुळतं आहे कीं काय ? पण आतां मुहूर्त तरी कुठें उरले आहेत ? काल ती **सीता** आली होती ती सांगत होती कीं तें **सांजोरीचं स्थळ** जमतं आहे म्हणून. मग काय होईल तें पहावं. मुलगी कांहीं नाहीं रे बाबा चांगली ! पण त्याचं त्या **सीता**ला कांहींच वाईट वाटत नाहीं ती तर म्हणाली कीं बहुतेक ठरल्यासारखंच झालं आहे.

**गणपतराव**:–खरं का काय ? पण सकाळीं **काशीनाथ**पंत मला भेटले होते ते नाहीं कुठें बोलले ? मीं लिहिलं आहे **नानाला** अशा स्थळाविषयीं इथें वाटाघाट चालली आहे म्हणून. मी आणखी त्याला लिहितों कीं तूं कांहीं एव्हां इथें येऊं नको असं असलं तर !

**आई**:–तुला काय करायचं आहे असं लिहून ? म्हणजे आणखी त्या **सीताला** आपल्या नांवानं खडे फोडायला चांगलंच होईल. ती म्हणे जिथें तिथें असं गात असते कीं, यांनीं आमच्या **नानाला** बिघडवला. आमचं काय एवढं आडलं होतं ! ती एक जी बया आहे !

**गोविंदरावः**–जाऊं दे कीं, आपल्याला काय करायचं आहे ? **गणपु !** झालं का तुझं पत्र ? इकडे आण तुझं लिहिणं झालं असलं तर ती दौत–लेखणी, म्हणजे मी त्या ह्याला एक पत्र ल्याहायचंय् तें लिहून टाकतों.

**आईः**–कोणाला तें !

**गोविंदरावः**— कोणाला नाहीं. ते मुंबईस माझे स्नेही **बाबा**साहेब आहेत कीं नाहीं, परभू त्यांना.

असें म्हणून **गोविंदरावांनीं** **गणपतरावा**जवळून दऊत, लेखणी व कागद घेऊन पत्र लिहिण्यास प्रारंभ केला. त्यांची वृद्ध **आई** कांहीं वेळानें तेथून निघून गेली.

**आजी** आली त्या वेळीं **गणपतराव** आपण लिहिलेलें पत्र नुकतेंच वाचणार होता, तें पत्र **आजी** होती तोंपर्यंत त्यास वाचतां आलें नाहीं हें उघडच आहे. एक दोन ओळी वाचाव्या तों तिचा कांहीं तरी प्रश्न येई. ती कांहीं बोले. **गोविंदरावाचें** तिचें बोलणें चाललेंच होतें. तिकडे लक्ष्य जाई. **आजी** गेल्यानंतर त्यानें तें वाचण्यास पुनः प्रारंभ केला. हें पत्र मूळ इंग्रजींत होतें; परंतु तें रूपांतर येथें घेतल्यास वाचकांना निरुपयोगी वाटणार नाहीं असें समजून त्याचा तर्जुमा येथें देतों.

**प्रिय मित्र नाना,** ता०—मे १८८२

आपलें मागचें पत्र व त्यांतील हकीकत वाचून मला किती आनंद झाला, हें माझें मलाच ठाऊक. उत्तर पाठविण्यास फार दिवस लागले याची मात्र माफी असावी. आतां उत्तर पाठविण्यास कां उशीर लागला हें कांहीं आपणास सांगावयास पाहिजे असें नाहीं. आमचे घरांत एक मनुष्य देखील स्वस्थ नाहीं. काळजीनें सर्वांची अवस्था अतिशय वाईट झाली आहे. **अण्णा (गणपतराव** आपल्या वडिलांस **अण्णा** म्हणत असत ) बोलत नाहींत, परंतु त्यांच्या मनांत जें कांहीं होत असेल तें कल्पनेनेंच जाणावें. **आई**ही चिंतेनें अगदीं अन्न खाईनाशी झाली आहे. त्याचप्रमाणें **काकू** तर काय ? तिला मी पुष्कळ समाधानाच्या गोष्टी सांगतों पण कांहीं नाहीं. इतक्या थोड्या दिवसांत अशी कोणाचीही स्थिति झाली नसेल. तुमच्या **वहिनी**चीही अवस्था तीच म्हटली तरी चालेल. आम्हांस अन्न गोड लागत नाहीं. एवढी उलाढाल करणारा कोण हें कांहीं कळत नाहीं. **अण्णां**च्याकडे येणारी सर्व मंडळी कोणाचें नांव घेतात हें मी आपल्यास सांगावयास पाहिजे असें नाहीं. लव-

करच काय तो निकाल लागेल तर बरें होईल. अजून प्रकरण बाहेर मात्र आलें नाहीं एवढें भाग्य म्हणावयाचें. पण जाऊं द्या ही कटकट. ही आमची कथा किती दिवस चालणार आहे कोणास ठाऊक ? सध्यां तुझ्याविषयीं पाहूं या.

कृष्णरावाची मुलगी जर आपल्याला बायको मिळाली तर फारच चांगलें होईल. अण्णांना माझ्या सासऱ्याचें आलेलें पत्र मीं वाचलें त्यांत त्या मुलीचें वर्णन होतेंच; तें व आपलें बरेंच जुळतें. आणि अशी बायको तुला मिळाली तरच आपले सर्व हेतु सिद्धीस जातील. मी तुझ्या वहिनीस नित्यनित्य शिकविण्याची खटपट करतों, व या आपल्या कल्पना व आपले पुढले विचार तिच्या मनांत भरवून देण्याविषयीं होईल तितका प्रयत्न करीत असतों. पण ती असली मठ्ठ आहे ! तिच्या डोक्यांत कांहीं-एक शिरत नाहीं. तुझ्या मागल्या पत्रांतील मजकूर मीं तिला वाचून दाखविला. तेव्हां तिला मनांतून तर मोठा आनंद झाला, परंतु ती मला बाहेरून काय म्हणते, " हें असं काय हें नानाभावजींनीं अगदीं निर्भिडपणानं लिहिलं आहे ? कांहीं इतक्यांतच नको त्या मुलीला आपली बायको म्हणायला ! " पहिल्यानें ती असें म्हणाली, पण मग आपणच काय म्हणते, " तर मग आतां आम्हांला छानदार शिकलेल्या जाऊबाई मिळणार ? त्या सांजोरीच्या मुलीसंबंधानें तर तिनें किती किती तरी थट्टा केली ! तुझ्या काकूच्या मनांतून फार फार तिथें जुळवावें असें आहे. तूं आपला रुकार अगदीं देऊं नकोस. येऊन जाऊन तुला कृतघ्न म्हणून काकू व काका शिव्या देतील एवढेंच कीं नाहीं ? आजपर्यंत कांहीं त्यांनीं तुला शिव्या दिल्या नाहींत असें नाहीं. तर बोवा आतांच त्याची मोठीशी भीति ! आपण आपलें हित पाहिलें पाहिजे. तुझ्या वहिनीचें असेंच सांगणें आहे, व ती आपल्या कोंबडचा कुतऱ्यांच्या पायांनीं तुला असेंच कळविणार आहे. खरेंच ! ती लिहूं लागली म्हणजे मला फार हंसावयास येतें. कृष्णरावाच्या मुलीचें लिहिणें तूं पाहिलें आहेस काय ? कांहीं असो, बायकांना वाचण्यापेक्षां लिहिणें फार जड जातें असें मला वाटतें. दुसऱ्यांचा अनुभव कसा आहे कोणास ठाऊक ?

आपलीं दोन तीन पत्रें आलीं पण आपण " सब्जेक्शन आफ वुइमेन " वाचलें कीं नाहीं तें कळविलें नाहीं. असें कां ! वाचलें नसल्यास अवश्य वाच. व विशेषतः शेवटले दोन भाग. मी येथें आल्यापासून अभ्यास

**कांहीं** झाला नाहीं. मला कांहीं सुचेना. एक दोन नाव्हेलें मात्र वाचलीं, त्यांत मला एक फार आवडलें; तें मीं लायब्ररींतून आणलें होतें. तेंही मीं तुला वाचावयास सांगितलें असतें. पण सध्यां नको. वेळ सांपडल्यास व कुठें मिळाल्यास तूं चाळून पहा. **वुइल्की कॉलिन्सचें "मॅन ॲण्ड वाईफ."** त्यांतील **ॲन सिल्व्हेस्टरची** गोष्ट वाचून मला वारंवार आपल्या **गोदूताईची** आठवण होते. ॲनच्या हातून चुकी तरी झाली होती पण गोदूताईच्या हातून काय बरें झाली आहे ! तूं तिच्या घरीं गेला होतास का ? तूं जाशील तेवढा वेळच काय तिला बरें वाटत असेल तें. **विनोबा** हल्लीं काय करीत असतात कांहीं कळलें का ? छे बोआ ! अशाच्या हातांत **गोदूताईसारखें** रत्न पडणें फार वाईट. पण लग्नाच्या संबंधांत आमच्या इकडेच काय ? सगळीकडे सारखीच अवस्था आहे. आमच्या इकडे एवढाच विशेष कीं; मुलगा १५।१६ वर्षांचा झाला कीं, आपला त्याला हक्कानें एक **गुलाम** मिळतो ! त्याच्यावर त्याची हवें तें करण्याची मालकी. दुसऱ्या देशांतून उशीरानें ही स्थिति येते. फरक काय तो एवढाच. आहे तें ठीक आहे झालें. आपण काळजी करून काय उपयोग ? पण तूं **गोदूताईकडे** आठ दिवसांतून एकदां तरी जातच जा. तुला पाहून तिची सासू शिव्या देईल एवढेंच कीं नाहीं ? तुझ्या **वहिनीला** तर त्या तिच्याविषयीं फार वाईट वाटतें. **गोदूताईची** सासू कोणत्या प्रकारची आहे हें तिला पक्केपणीं ठाऊक आहे. तिनें तिच्या सासुरवासाचे जे प्रकार मला सांगितले ते कांहीं विलक्षणच. ती म्हणाली " मला जर बाई असं असतं तर मीं जीवच दिला असता. " सकाळीं मी तुझ्या घरीं गेलों होतों. **गोपिकाकाकू** भेटल्या होत्या. त्यांची प्रकृति ठीक आहे. अजून इकडे उकाडा फार होतो. बाकी कांहीं विशेष नाहीं. मला आणखी कांहीं गोष्टींविषयीं किती तरी लिहावयाचें होतें पण आतां नको. हेंच पत्र किती तरी मोठें झालें आणखी मन स्वस्थ नसल्यामुळें कसें तरी खरडलें आहे. तुला मजकूर कळला म्हणजे झालें. **विष्णुपंतास** नमस्कार कळीव, तो वरीक सुखी आहे खरा. बायको असावी तर त्याच्या बायकोसारखीच असावी; पण बिचाऱ्याला आईबाप नाहींत. आपल्या मताला व विचाराला त्याचीं मतें व विचार फार जुळतात. मागच्या पत्रांत लिहिल्याप्रमाणें तूं इकडे येणार आहेस कीं काय ?

आपला मित्र,

**गणपति.**

ता०—वरचें पत्र लिहून झाल्यावर ' आई ' येथें आली होती तिच्या सांगण्यांत असें आलें कीं, तुझी काकू सांजोरीच्या मुलीसंबंधानें जुळलें व लवकरच लग्न होईल असें म्हणाली. तेव्हां तें तूं कांहीं कबूल करूं नको, व इकडे येऊं नको. इकडे येण्याविषयीं आणखी पत्रें आलीं तरी उत्तरच लिहूं नको म्हणजे झालें. आलास तर उशीरानें ये, व तूं व मी सुटी सरतांच एकदम परत जाऊं म्हणजे झालें. मुहूर्त असेल अशा बेतानें येऊंच नको. मार्गशीर्षांत पहातां येईल.

असें पत्र लिहून त्यानें तें बंद केलें. तितक्यांत गोविंदरावांचेंही पत्र आटपलें तेंही घेऊन तो तीं पोस्टांत टाकण्याकरितां बाहेर गेला. पोस्टांत टाकिल्यावर तो नदीकांठीं थोडी हवा खाण्याकरितां गेला. तेथें नदीच्या कांठाकांठानें हवा खात खात हिंडत असतां त्याच्या चित्ताला थोडासा आल्हाद झाल्यासारखें दिसलें. गणपतरावाच्या मनांत नेहमीं समाजसुधारणेचे विचार चालत व त्या विचारांनीं केव्हां केव्हां त्याचें डोकें अगदीं भणाणून जाई. या विचारांमुळें तो केव्हां केव्हां आकाशांत भराऱ्या मारी. जें चांगलें आहे तें लोकांनीं पटकन् कां घेऊं नये ! आपल्याला जे विचार चांगले दिसतात तेच विचार लोकांना कां चांगले वाटूं नयेत ! उदाहरणार्थ, पुनर्विवाहाची चाल. ही आपल्यांत मागें होती; चांगली आहे; ती पडल्यापासून पुष्कळ अनर्थ टळतील; असें असून ती कां प्रचारांत येऊं नये ? तसाच बालविवाह बंद कां होऊं नये ? तसेंच स्त्रीशिक्षण कां वाढूं नये ? जातिभेद कां मोडला जाऊं नये ? एक कीं दोन ! सर्व गोष्टी एकदम व्हाव्या तशा होऊन आपला देश सुधारलेल्या देशांसारखा सुखी व्हावा असें त्यास वाटे. " हळूहळू " हें त्यास मुळींच आवडत नसे. कोणतीही गोष्ट एकदम झाली पाहिजे. त्याचे विचार किती उतावळेपणाचे होते हें पहिल्या प्रकरणांतील वर्णनावरून वाचकांस कळलेंच असेल. त्याला असें वाटे कीं आपल्या बायकोनें एकदम आपल्याइतकें शिक्षित व्हावें. वास्तविक तिला शिक्षणाचा गंधही नव्हता. परंतु याला वाटे तिनें आपण सांगूं तसा अभ्यास करून एकदम मोठी विदुषी व्हावें. पण तें कसें व्हावें ? तसें होत नाहीं म्हणून हा केव्हां केव्हां फार असंतुष्ट असे. अशी एकंदर गणपतरावाच्या मनाची स्थिति होती. तो पुष्कळदां कल्पनेनें हव्या त्या गोष्टींची रचना करून सुखानुभव घेत असे. यामुळें तर त्याच्या मनावर फारच चमत्कारिक परिणाम झाला होता. आपण अमुक करतों आहों,

तमुक करतों आहों, अमुक केलें, तमुक केलें अशा नाना तऱ्हेच्या कल्पना—सृष्टि निर्माण करून तो चैन भोगी, परंतु त्या वेळीं आपली सद्यःस्थिति त्याच्या यत्किंचितही लक्षांत येत नसे. कल्पना ही केव्हां केव्हां मोठी बाधक होत असते व तसाच कांहीं परिणाम **गणपतरावा**च्या मनावर झाला होता. त्यानें प्लेटोच्या लोकसत्ताक राज्याप्रमाणें कल्पनेनें आपल्याला जशी हवी तशी सृष्टि बनविली होती. त्यांतल्या प्रत्येक गोष्टीची रचना त्यानें आपल्याकडून बेताची व योग्य अशी बसवून ठेवलेली असून त्याप्रमाणें या जगाची रचना असावी असें त्यास वाटे. त्याच्या सृष्टीचें आद्य तत्त्व समता हें होय. तो असें म्हणे की, जगांतील सर्व अनर्थ टाळावयाचे असल्यास आज जें जगांत असमतेचें तत्व नांदतें आहे त्याला पूर्ण फांटा दिला पाहिजे. ज्या वेळीं मनुष्यप्राणी प्रथमतः उत्पन्न झाला तेव्हां कोण मोठा आणि कोण लहान होता ! काय म्हणे अमुक मनुष्य बाकीच्या सर्व प्राण्यांचा राजा. त्यानें व त्याच्या पुत्रांनीं एकसारखें राज्य करीत असावें. **गणपतरावा**नें आपल्या कल्पनासृष्टींतून हें राजतत्त्व अगदीं काढून टाकिलें होतें; त्याचप्रमाणें त्यानें आपल्या मतें समाजव्यवस्थेंत अगदीं ठीक अशा सुधारणा करून ठेविल्या होत्या. त्याच्या जगांत स्त्री व पुरुष यांत भेद मुळींच नव्हता. किंबहुना हे शब्द देखील नसावेत असें त्याचें मत. फ्रान्सदेशांत विलक्षण **राज्यक्रांति** झाली त्या वेळीं ज़शा सर्व गोष्टी बदलण्याचा क्रांति करणारांनीं यत्न केला त्याचप्रमाणें हल्लींच्या आमच्या धर्मसंबंधांत व्यवहारसंबंधांत आमच्या या नायकाचा बेत होता. कांहीं नवीन गोष्टींची अडचण आली की, मग त्या कल्पनासृष्टींत किंचित् बदल होत असे; परंतु मुख्य ढासळण्याजोगी अडचण अजून त्याला आली नव्हती. शिवाय दुसरें एक त्याचें मत असे, तें हें कीं, पैशाची इच्छा असणें व तो मिळविण्यासाठींच केवळ मनुष्यानें उद्योग करणें हें फारच वाईट आहे. उद्योग हा निवळ उद्योग करावयाचा म्हणूनच केला पाहिजे; किंवा त्यामुळें सर्व समाजाचें बरें होत असेल तर केला पाहिजे. पैसा हें एक सध्यांच्या स्थितींत सुखोत्पत्ति करण्यास साधन आहे. त्यास कोणत्याही वेळीं प्रधानत्व देऊन उद्योगास अप्रधानत्व देणें म्हणजे खरा पदार्थ सोडून छायेस धरण्यास जाणें आहे. मनुष्याचे हेतु सिद्धीस जावे म्हणून त्यानें त्यासाठीं लागेल एवढाच पैसा मिळवावा, जास्त हांव धरूं नये असेंही तो नेहमीं म्हणे. त्याचे स्वतःचे जे जे हेतू होते त्यांच्या सिद्धीसाठीं फार पैशाची जरूरी होती, व तो मिळवावा म्हणून त्यास वाटेही; पण तो मिळविण्यांतच आपली कार्यसिद्धि झाली

असें समजून आपण कृतार्थ झालों असें म्हणत बसूं नये, हें तो नेहमीं आपल्या स्वतःला सांगे, असो. त्या कल्पनासृष्टीवरच त्याचे आज विचार चालले होते. व त्या विचारांतच तो मग्न असतां अगदीं संध्याकाळ झाली, मनुष्यांची गर्दी मोडूं लागली; अगदीं शांतता पसरली तेव्हां त्याचें लक्ष्य त्या कल्पनासृष्टींतून निघून ऐहिक सृष्टीकडे आलें व तो घरीं आला.

---

# प्रकरण ८ वें.

## सीताबाईंचा तोरा.

मागील प्रकरणांत सांगितलेली गोष्ट घडून सुमारें आठ एक दिवस झाले फराळ करून **काशीनाथपंत** व त्यांची बायको **सीताबाई** सोमवारीं रात्रीं १० च्या सुमारास मोठ्या आनंदानें बोलत होतीं. हा कसला एवढा आनंद झाला होता हें त्यांच्या संभाषणावरून आपणांस कळेलच; पण त्याच्या आधीं आपण हीं दोघेंही स्वरूपानें वगैरे कशीं काय आहेत हें पाहूं. कारण, यांचा व आपला प्रत्यक्ष भेटीचा हा पहिलाच प्रसंग. **काशीनाथपंत** हा बराच उंच असून काळ्या वर्णाचा होता; व त्याचा चेहरा, नाकपुड्या वगैरे जरी फेंदारलेल्या अशा होत्या, व डोळे मोठाले असून नेहमीं किंचित् लाल असे होते, तरी हा क्रूर दिसत नसे. इतकेंच नव्हे, तर प्रथमदर्शनीं हा पुरुष चेहेऱ्यावरून अगदीं बावळट आहे असेंही कित्येकांस वाटे. याची छाती फार रुंद नसून केंसांनीं भरलेली असे. याच्या सर्व अंगावरच विशेष केंस असत. कपाळ चिंचोळें होतें. हा दिसण्यांत मोठा कणखर दिसे. पण तसा खरोखर होता कीं नाहीं ह्याची शंका आहे. हा या वेळीं विडी ओढीत बिछान्यावर पडला होता.

**सीताबाई**ची गोष्ट याच्या अगदीं उलट होती. ती दिसण्यांत चांगली, ठेंगणी, ठुसकी असून नखरेबाज बायको असे. तिच्या डोळ्यांतलें पाणी तर फार विलक्षण असे. तिचें नाक, डोळे, कपाळ, हनुवटी, हात पाय अगदीं सर्व अवयव यथायोग्य परिमाणांत होते. तिचा चेहराही फार मोहक असे. तिच्या डोळ्याचें पाणी तर असें कांहीं विलक्षण होतें कीं, तिनें

कोणाकडे पाहिलें असतां ही आपणांस डोळ्यावाटें आंत ओढून घेते कीं काय असें वाटे. तें पहाणें तरी इतकें चंचल व लचक्याचें असे कीं कांहीं पुसूं नये. ती चार पांच ( दोन जिवंत असून तीन वारलीं होतीं ) पोरांची आई होती, परंतु ती तशी असेल असें वाटतही नसे. तिच्यांत फक्त एक काय ती उणींव होती—अं हं ! ती उणीव नव्हेच, मला तर वाटतें तें तिच्या मोहकपणास कारण असावें— कीं तिचा वर्ण काळसर रंग बऱ्याच व्यक्तींचा मोहकपणा वाढविण्यास कारण होतो; व त्यांपैकींच इचीही गोष्ट होती. हिच्या व नवऱ्याच्या वयांत बरेंच अंतर होतें. याचें कारण **काशीनाथपंताचें** लग्न मोठेपणीं व स्वतःच्या पसंतीनें झालें, हें होय. **काशीनाथपंत** मूळचा फार गरीब. लहानपणीं तर त्यानें माधुकरीही मागितली होती. त्याचा बाप **पुण्यास** कोणा सावकाराच्या येथें कोरड्या बारा रुपयांवर होता. तेवढ्यांत सारा संसार व्हावयाचा. **काशीनाथपंताची** आई बिचारी गरीब, साळसूद होती. तिनें दळण कांडण करून कसा तरी संसार चालविला होता; परंतु **काशीनाथपंत** ११।१२ वर्षांचा झाला त्या वेळीं त्याच्या वडिलांवर त्याच सावकाराच्या येथें कांहीं दगा केल्याबद्दलचें खटलें आलें व त्यामुळें त्यास फरारी व्हावें लागलें. तो जो फरारी झाला तो कोणास न कळतां, बायकोस देखील न सांगतां एकदम काशीस जाऊन राहिला. तेथें दोन एक वर्षें होता, परंतु पुढें वाख्याच्या उपद्रवानें मरण पावला. तेव्हां तो तेथें होता असें कळलें; तोंपर्यंत कळलेंही नाहीं. बाप न विचारतां न सवरतां फरारी झाला त्या वेळीं **काशीनाथपंत** सारा ११।१२ वर्षांचा होता हें वर सांगितलेंच आहे. बाप गेल्यानंतर आई स्वयंपाक करावयास दुसऱ्याच्या येथें राहिली व मुलगा माधुकरी मागूं लागला. आईचें जेवण ती स्वयंपाक करावयास राहिली होती तेथें होई व **काशीनाथपंत** वार व माधुकरी यांवर आपली उपजीविका करी. शाळेंत नादारी होतीच. अशा तऱ्हेनें जेमतेम १६।१७ वर्षें होईपर्यंत त्यानें दिवस काढले व मग एकदांची त्यास १० कीं १२ रुपयांची असामी लागली. त्याचें अक्षर बरें असल्याकारणानें व तो हुषार असल्यामुळें चढत चढत पंचविसाव्या वर्षाच्या सुमारास त्यास २२ रुपये पगार झाला. तितक्या दरम्यान त्यानें थोडेसें इंग्रजीचेंही तुटपुंजें ज्ञान मिळविण्याचा यत्न केला. यामुळें त्यास पुढें सरकण्यास जागा झाली. अशा तऱ्हेनें जरी त्याची इकडे बढती होत गेली तरी त्यास कुटुंबसौख्य मुळींच नव्हतें. १५ वर्षांचा होण्याच्या सुमारास बाप वारल्याचें वर्तमान आलें. व पुढें चाकरी लागल्यावर तिच्या तोऱ्यांतच नाना-

तऱ्हेचे ढंग करावयास लागून व आईनें आपणाकरितां भोगिलेले कष्ट विसरून, यानें तिचा छळ मांडिला. एकुलताएक मुलगा, याच्यावर तिचा सारा जीव व उडया; पण यानें तिला सुख दिलें नाहीं. " आतां आपल्या पोरास चाकरी लागली, आतां त्याचें लग्न करूं, मग सून येईल अन् मी चांगल्या तऱ्हेनें संसार थाटीन, " असे ती नित्य बेत करीत असे; परंतु यानें तिला एक दिवसही बरा शब्द दिला नाहीं, कीं तिच्या कपाळचे कष्टही चुकविले नाहींत. उलट जास्तच कष्ट करावे लागले. अशा जाचणींत तीही म्हातारी हा बावीस चोवीस वर्षांचा झाला तेव्हां मेली. एका अर्थी तेंही बरें झालें. कारण या सुनेनें आणि त्या ' आधींच मर्कट ' असून फटाकडया स्त्रीरूपी ' मद्य ' प्यालेल्या पोरानें तिला कधींही सुख लागूं दिलें नसतें. आई वारल्यानंतर मात्र रावसाहेबांचे डोळे उघडल्यासारखे झाले, व आपण लग्न करावें असें त्यांस वाटलें. मग पहिले सगळे ढंग व चार सोडून त्यानें आपले वयाचे पंचविसावे वर्षीं लग्न केलें. नशिबानें पैसे वगैरे भरावयाला न लागतां चांगली बारा वर्षांची मुलगी आणखी खाऊन–पिऊन सुखी अशा गृहस्थाची मिळाली. खाऊन–पिऊन सुखी अशा गृहस्थाची मुलगी गरीब व एवढ्या मोठ्या मुलाला कशी मिळाली असा कांहीं वाचक प्रश्न करतील. ' कांहीं ' असें म्हणण्याचें कारण एवढेंच कीं, पत्रिका पहाण्याचें वेड असून ज्यांच्या मुलीला मंगळ व राक्षस गण असतील ते असा प्रश्न करणार नाहींत. या दोन खंबीर गोष्टी असल्यामुळें **काशीनाथपंतास** अशी चांगल्याची चांगली व मोठी मुलगी मिळाली. लग्न झाल्यापासून **काशीनाथपंत** आपल्या सासऱ्याच्या नादानें वागूं लागला; व त्यामुळें त्याचें बरेंही झालें. त्याचा सासरा वजनदार असल्यामुळें व सुस्वभावाचा असल्यामुळें **काशीनाथपंथास** त्याचा फार उपयोग झाला. केव्हां केव्हां तर त्यास बढती मिळण्यासही तोच कारण झाला. शिवाय लग्न झाल्यानंतर पहिले कांहीं दिवस **काशीनाथपंत** घरजांवईच होते. त्यांचा पगार त्या वेळीं बावीस कीं चोवीस रुपये होता. तो अगदीं शिलकेंत पडत असे. पुढें बायकोला लवकरच चार सहा महिन्यांत ऋतु प्राप्त झाला. तेव्हां सासऱ्याच्या येथें राहणें बरें न वाटून त्यानें निराळें बिऱ्हाड करण्याची गोष्ट काढली व त्याप्रमाणें सासऱ्यानें शेजारीं एक जागा पाहून त्यास बिऱ्हाड करून दिलें. लागल्या संवरल्या सासुरवाडी होतीच. **सीताबाईला** काम होणार नाहीं म्हणून एक,–दोन रुपये दरमहाची बाईही ठेवली. अशा तऱ्हेनें त्यांचा संसार चालूं झाला व एक–दोन वर्षें झालीं नाहींत तोंच **सीताबाई** गरोदर होऊन योग्य वेळीं तिला मुलगी झाली; व **काशी-**

नाथपंतास गोविंदराव दप्तरदारांच्या कचेरींत ५० रुपयांची जागा मिळाली; त्यामुळें पुणें सोडून–या गांवीं त्यास यावें लागलें. येथें प्रथमतः तो एकटाच आला. बायको बाळंत होती; त्यांतून श्रीमंताची लेंक; तेव्हां ती कशी लवकर येते ? मुलगी चांगली सहा महिन्यांची झाली तेव्हां कोठें ती आली. मग बिऱ्हाड वगैरे केलें. प्रथमतः तिनें आपली एक आत बरोबर आणली होती, पण तिच्यामुळें हिला स्वतंत्रता मिळेना; तेव्हां तिला लवकरच जावें लागलें. आत गेल्यावर हिनें एक बाई ठेविली व आपण मोठ्या तोऱ्यानें राहूं लागली. असें होतां होतां चार–पांच वर्षें झालीं. नवऱ्याचा पगारही आणखी वाढला. याच सुमारास त्याचा चुलतभाऊ वारून बायको व दोन पोरें उघडीं पडलीं आहेत असें त्यांस कळलें. त्याच्या स्नेह्यांनीं त्यास ‘ तुम्ही आतां त्यांचा सांभाळ करा ’ असें सांगितलें. तेव्हां आपली भावजय घरांत आल्यास मोठेपणाचा मोठेपणा मिळून स्वयंपाकाची बाई ठेवण्याचा त्रासही होणार नाहीं असें वाटून त्यानें बायकोचा विचार घेतला. तिनें पहिल्यानें त्यास अगदींच झिडकारून टाकलें “ जेव्हां माधुकरी मागायची होती तेव्हां येत होतं का कोणी विचारायला ? मामंजी गेले तेव्हां असाचना पण प्रसंग आला होता ? मग तेव्हां नाहीं कोणी आले चुलतेन् चुलतभाऊ ?आपला सारा भोळा कारभार ! बाबांच्यामुळें तर हे आतां दिवस दिसताहेत ! तेव्हां कोणी विचारीत नव्हतें. आतां पैसा मिळायला लागला. आतां येतील तर काय झालं सारीं लुलूपुतू करायला. रांडेच्यांनो, एवढा चुलता म्हणे कोंकणांत होता, अन् त्यानं कांहीं विचारलें नाहीं ! अन् आतां या पोरांनान् त्या भद्रीला आणून ठेवणार माझ्या उरावर खायला ! मी नाहीं ग बाई इथें राहायची असं कोणी आणून ठेवलं तर ! हो, काय म्हणतात ना तशांतली गत, वरचं झालं थोडं अन् व्याह्यानं धाडलं घोडं ! इकडे नाहीं का झालं सगळं कोणी विचारल्यावांचून ? तसेंच होईल त्याय् कारट्यांचं. नाहीं तर मरतील. करायचीं आहेत काय जगून ! कांहीं दुनिया नाहीं ओस पडत ! कोण मस्णा म्हणे चुलत दीर ! कधीं ऐकलाय् नव्हता, अन् त्याचीं पोरं इथें आणून पोसायचीं ! पोसा हवीं असलीं तर तुम्हाला ! मला नको तो त्रास. मीं आपली उद्यां जातें पुण्यास. ” असे एक नाहीं ती हज्जार शब्द बोलली. नवरोजी आपले मेणघुणेंच. त्यांनीं त्या वेळीं कांहींच न बोलतां पुन्हां पुन्हां गोष्ट काढून तिला विचारावें. कारण, त्याच्या जुन्या व नव्या सर्व स्नेह्यांचें त्याला तसेंच सांगणें असे. शिवाय आंतडें एक असल्यामुळेंही त्यास फार क्वचित् परंतु

आपल्या माणसांची दुर्दशा होऊं नये असें वाटे. त्याच्या नातलगांपैकीं कायतीं तीं तीनच माणसें होतीं.

मनुष्य कितीही क्षुद्रबुद्धीचा व क्रूर हृदयाचा किंवा दुसऱ्याच्या शिकवणीप्रमाणें चालणारा असला तरी केव्हां केव्हां त्यास बरें करण्याची इच्छा उत्पन्न होते; परंतु ती क्षणिक असते. त्यांतलीच ही वेळ होती. नानाचें नशीब म्हणावयाचें. पुढें सीताबाईसही असें वाटलें कीं, आपण मोलानें माणसें ठेवितों त्यांतलींच तीं असें समजून त्यांस तुकडा घालावा झालें! असें वाटून तिनें गोपिकाबाईस, नानास व गोदावरीस आणण्यास मोठ्या कष्टानें रुकार दिला.

असा सर्व इतिहास पूर्वींचा होता. त्यापुढील म्हणजे नाना व त्याची आई येथें येऊन राहिल्यानंतरचें यांचें चरित्र कसकसें झालें वगैरे थोडक्यांत मागें आलेंच आहे. पुढें काशीनाथपंतास पगार वाढत वाढत जाऊन ते १२५ रुपयांवर आले, व गोविंदराव दप्तरदारांचे शिरस्तेदार बनले. इतका पगार झाल्यावर त्या सीताबाईला तर अर्धा बोटच स्वर्ग उरला. त्यांतून पुढें पुढें तर लोक असेंही म्हणूं लागले कीं, गोविंदरावांनीं पेन्शन घेतल्यावर काशीनाथपंतास ती जागा खास मिळणार. मग काय विचारतां? पण तें जाऊं द्या, आपण हें काय करीत बसलों? काशीनाथपंत व सीताबाई यांचें आनंदांतलें बोलणें ऐकायला म्हणून आलों तों पाठीमागली हकीकतच सांगत बसलों. पण तेंही कांहीं वावगें झालें नाहीं. ती सर्व पाठीमागली हकीकत चांगल्या तऱ्हेनें कळल्यावांचून काशीनाथपंत कशा तऱ्हेचा मनुष्य होता व असा कशा तऱ्हेनें झाला हें कळलें नसतें. मनुष्य निपजतांच अत्यंत दुष्ट किंवा सुष्ट असतो असें म्हणणें थोडेंसें धाडसाचें असतें. आनुवंशिक गुण कसेही असले तरी त्या गुणांचा विकास होण्यास अगर ते जेथें जिरून त्याचे जागीं दुसऱ्याच गुणांचा उदय होण्यास त्याजवर येणारे प्रसंग; त्याची संगति व त्याची एकंदर स्थिति हींच विशेष कारण असतात. हेंच पहा कीं, सीताबाईचा नवऱ्यावर इतका पगडा बसावयाला कारण, तिच्या माहेरची श्रीमंती, तिचें स्वरूप, तिचा स्वभाव, याची गरिबी व याचा पोंचट स्वभाव इत्यादि सर्व गोष्टींचें मिश्रण होय. नुसता उपजत अंगस्वभावच जर कारण असता तर तो आईच्या ठिकाणीं मात्र कां लोपता? जो गृहस्थ आईशीं, दहा रुपड्या मिळावयास लागल्याबरोबर अरेरावीनें वागून तिला दुप्पट दुःख देऊं लागला तो बायकोपाशीं ताटाखालच्या

मांजराप्रमाणें कां वागतां ? ज्याप्रमाणें बीं पेरलें असतां त्यापासून उत्पन्न होणाऱ्या वृक्षपुष्पफुलांचा बरेवाईटपणा, जमीन, पाणी, त्यास मिळणारी उष्णता वगैरे अनेक गोष्टींवर अवलंबून असतो, त्याचप्रमाणें मानवी प्राण्याचीही स्थिति आहे.

वर सांगितलेंच आहे कीं, **काशीनाथपंत** बिडीचे झुरके मारीत पडला होता. **सीताबाई** तशीच भिंतीपाशीं उभी होती, व तिचा चेहरा किंचित् आनंदानें प्रफुल्लित झालेला दिसत होता. ती गालांतल्यागालांत हंसत होती म्हटलें तरी कांहीं हरकत नाहीं, व त्या आनंदानें तिचे डोळे विशेषच मजेदार दिसत होते. त्या आनंदाच्या भरांत ती एकदम म्हणाली:

**सीताबाई**:—खरंच का पण हें ? कां आपलं मला उगीच फसवायचं कांहीं तरी सांगून ? हो, नाहीं तर माग एकदां अशीच अवई उठली होती म्हणून म्हणतें ?

**काशीनाथपंत**:—काय वेडी आहेस ग तूं ? मी का तुला खोटं सांगतों कीं काय ? तुला वाचायला येत असलं तर आतां पत्र दाखवितों.

**सीताबाई**:—अहाहा एवढं हिणवायला नको कांहीं. मला वाचायला येतं तर इतका वेळ विचारीत कशाला बसलें असतें ? केव्हांच पत्र वाचून खरं का खोटं पाहिलं असतं. मग खरंचना अगदीं ! कां अजूनय्.

**काशीनाथपंत**:—हो खरं ! ! खरं ! ! ! काय शिंची मूर्ख आहे पहा !

हें वाक्य हंसत हंसत **काशीनाथपंत** बोलतो आहे तोंच पुढील शब्द **सीताबाईनें** काढले:

**सीताबाई**:—हें काय ? अशा शिव्या भलत्यान् सलत्याच ? मी कांहीं लहान का आहें ?

**काशीनाथपंत**:—अग, पण देतं आहे कोण शिव्या ? तिनदां तिनदां विचारतेस म्हणून आपलं आलं तोंडांत. पण इकडे पहा, ही बातमी अजून बाहेर फोडायची नाहीं बरं का ? नाहीं तर उजाडलं नाहीं तों करशील साऱ्या गांवभर !

**सीताबाई**:—तर तर ! आतां मला दुसरं काम काय ? एक दिवटीन् ढोलगं घेऊन साऱ्या गांवभर रात्रीं हेंच सांगत फिरतें. हेंच तें मला आवडत नाहीं.

**काशीनाथपंत**:—अगदीं नाकावर माशी बसूं देऊं नकोस बरं. अंमळ कांहीं बोललं कीं लागली फणफणायला.

**सीताबाई:**–बोलावं कशाला आधीं ?

**काशीनाथपंत:**— बरं. पण आनंदाची बातमी सांगितली त्याला हें बक्षीस का ?

**सीताबाई:**—पण आधीं कोणीं भांडण काढलं ? मी का ?—बरं पण मग पगार किती तीनशें होणार का ? का चारशें ?

**काशीनाथपंत:**—पहिल्यांदां तीनशें होईल. तो दोन वर्षें तितकाच रहायचा. मग पुढें **गोविंदरावां**नीं राजीनामा दिला कीं चारशें होतील. पाहूं आतां. सध्यां त्यांना तर रजा घ्यायला लावलं आहे. साहेबाची पण अगदीं खात्री झाली कीं—

**सीताबाई:**–तें जाऊं द्या मेलं ! सध्यां आपलं पहावं ! कोणी कसं का वागेना ! बरं, आतां या महिन्याचा पगार आला कीं आधीं तोडयांत भर घालायची बरं का ? आणखी त्या साळीला तेवढ्या मोत्याच्या बुगड्या करून द्यायच्या. मग येऊन जाऊन बाळ्याचीं कडींच राहिलीं तीं पुढल्या महिन्याला पाहतां येईल.

**काशीनाथपंत:**–हं हं ! पगार अजून आला नाहीं तों दोन महिन्यांच्या पगाराची वाट लावून पार मसलत अं ? आणखी त्याच्या पुढल्या महिन्याला काय करायचं ?

**सीताबाई:**–काय पाहिजे तें मी करीन, इकडे कशाला त्याची विचारपूस करावी ? नसती उठाठेव भारी. कळत नाहीन् सवरत नाहीं.

**काशीनाथपंत:**– अग, तर एव्हांपासून पगाराची वासलात लावतेस तेव्हां तुला म्हणावं तरी काय ? उद्यां त्या नान्याचं लग्न जुळलं तर नको का कांहीं त्याच्या बायकोच्या अंगावर दागिने करून घालायला? आपण जर कांही केलं नाहीं तर लोक काय म्हणतील ?

**सीताबाई:**–लोक काय म्हणतात ? लोकांना काय म्हणायलान् बडबडायला झालं आहे ! कांहीं त्यांचा पैसा थोडाच खर्च होत आहे ! तें सांगतेंना ? सगळा आपला भोळा कारभार. यानं सांगितलं असं ! हं बरं असं ! त्यानं सांगितलं तसें ! हं बरं तसं ! लोक काय म्हणतील, लोक काय म्हणतील असं करून करून तर सारं बुडवलं. म्हणे नान्याचं लगीन झालं तर नको का कांहीं दागिने करायला. काय सगळ्या गोष्टींचं कर्ज घेतलं आहे का काय ?

**काशीनाथपंतः**—तर आतां त्याचं लग्न करून चार दिवस तरी त्याच्या बायकोच्या अंगावर कांहीं दागिने घालायला नकोत ? तेच दागिने उद्यां सुनेच्या उपयोगी पडतील.

**सीताबाईः**—हो- मी असे उष्टेनूमाष्टे दागिने घालतें आहें आपल्या सुनेच्या अंगावर ? मला अगदीं भीक लागली असेल किनई? पण आधीं दागिने करायचे आहेत काय करून ? **गिरिधरराव** ( हेच ते सांजोरीचे सावकार ) जर साळंकृत कन्यादान करून दागदागिन्यांसकट वर आणखी हुंडा देऊन मुलगी देताहेत, तर मग हें काय लचांड लावून घ्यायचं !

**काशीनाथपंतः**—पुन्हां आपलंच. अग वेडी तर नाहींस तूं ! ती मुलगी करायची म्हणून म्हटलं कोणी ? लोक तोंडावर थुंकतील असा वेडेपणा केला तर. तूं आपलं सांगितलंस आणखी मीं आपलं म्हटलं हो म्हणून ! पण आपलं कांहीं मत नाहीं न् आपण सांगणार उद्यां त्यांनाही कीं कांहीं आमचा मुलसा लुळा, लंगडा नाहीं, तर बोआ, घ्या कसं तरी करून. कांहीं ठोंब्याही नाहीं. उद्यां बाळ्याला जर कोणी अशी मुलगी करा म्हणून म्हटलं तर करशील का !

**सीताबाईः**—बरं बरं, रुचेल तें बोलावन् पचेल तें खावं. काय तरी बोलणं ! ह्मणे बाळ्याला करशील का मुलगी ? काय म्हणून करीन मी ? अन् तितका हुंडा आलाच तर केली म्हणून काय झालं ? काय झालं आहे असल्या मुलीला ? अन् त्यांतून भिकारड्यांना काय करायच्या आहेत चांगल्या मुली ? माझी गोष्ट तशी का आहे ? कांहीं भीक का लागली आहे मला ? का माझा बाळ्या दुसऱ्याच्या घरीं तुकडे मोडीत बसला आहे ? मेली भिकारी तर भिकारी आणखी ओकारी तरी किती ! पाहीन बरं कसे दागिने होताहेत तें ! माझ्या बाळ्याचंच मुळीं वैशाखांत लगीन करून टाकायचं. त्याला असा भिकाऱ्यासारखा घोडनवरा करायचाच नाहीं. चांगली त्या **राधाबाईची** लेक आहे पांच वर्साची. काय होईल तें होईल, वैशाखांत बाळ्याचं लगीन करायचंच. तुह्मी काय उद्यां **गिरिधररावांना** नाहीं म्हणून सांगणार का? मग पहिल्यानूदाच कुठें गेली होती—आतां बोलत होतें—

**काशीनाथपंतः**—( थोडेसे रागावून ह्मणा अगर रागावल्यासारखें करून ह्मणा ) बरं पुरे पुरे. फार चालला आपला शहाणपणा वहावत. त्या नानाच्या संबंधाचं कांहीं निघालं कीं तुझं जसं कांहीं अगदीं पित्त भडकून जातं ना ? तरी बरं स्वतांला मिळवायला लागत नाहीं. मीच मिळवतों आहें.

**सीताबाई**:—हें काय हें ! कांहीं बोलण्याचं समजत नाहीं म्हणून म्हणतें तें कांहीं खोटं का ? कांहीं बायका का कुठें मिळवीत असतात ? नाहीं तरी माझ्याचमुळें ना हे दिवस दिसताहेत ? बाबांनीं हात दिला नसता तर कुठें देशोधडीला जावं लागलं असतं कुणाला ठाऊक ? आतां मात्र **नान्या, नान्याची** आई, मोठं मेलं अन् ह्मणे नान्याची गोष्ट काढलीं कीं जसं कांहीं तुझं पित्त भडकतं ! माझं हो कशाला पित्त भडकेल. मी आपली आतां शपथ वाहतें कशी या कामांत म्हणून बोलायची नाहीं पुन्हां म्हणून—

**काशीनाथपंत**:— वाहवा ! असं झालं तर मग आणखी काय पाहिजे !

हे शब्द **काशीनाथपंतानें** किंचित् टवाळकी करण्याच्या व **सीता-बाईस** चिडविण्याच्या हेतूनें उच्चारिले मात्र तों ती कर्कशा खसकन ओरडून म्हणाली:

**सीताबाई**:— बरं बरं ! तुम्हाला तसंच हवं असेल तर काय झालं ? पण मी ऐकायला पाहिजेना ? आपलं मऊ सांपडलं कीं कोंपरानं खणीत जावं. मग कांहीं कां होईना ? त्यांतूनच तुम्हाला आपलाच हेका करायचा असेल तर मी आपल्या पोरांना घेऊन आपली चालती होतें कशी ? गोप-केलाच घेऊन संसार करा. आणखी तिच्या कारट्यांचं काय तें कौतुक करा. माझीं सोन्यासारखीं मुलं ? पण या कारट्यांच्यामुळें त्यांच्या अंगा-वर एक गुंजभर दिखील सोनं घातलं नाहीं.

**काशीनाथपंत**:— खरंच खरंच. आतां तुला अन् त्यांना एकदम सोन्यानं मढवून आणतों म्हणजे तरी तुझं समाधान होईल. कित्ती जरी केलं तरी संतोष म्हणून नाहीं.

**सीताबाई**:— ( रागावून ) हें पहा, आतां हीं अशीं बोलणीं बोलून मला उगीच राग आणूं नका ! मला एकदां राग आला म्हणजे मी काय करीन न् काय नाहीं याचा नेम नाहीं. माणसानं सोसायचं तरी कुठवर ! मेलं जेव्हां पहावं तेव्हां अस्सं बोलणं. जेव्हां पहावे तेव्हां त्या भिकारड्यांचा कड घेऊन माझ्याशीं भांडायचं. वळणाचं पाणी वळणालाच जायचं. मी आहें का कुणी तुमची ! कायग बाई तरी वनवास मेला ?

इतकें बोलते आहे तों **सीताबाईस** हुंदके येऊन गंगायमुनाही वाहूं लागल्या; व ती रडत रडत आपल्याला व आपल्या पोरांना शिव्या घेऊं लागली. हें पाहून **काशीनाथपंताचें** धाबें दणाणलें. अशा तऱ्हेचे प्रसंग त्यांस पुष्कळदां आले होते, पण संतापानें गंगायमुनांचे ओघ घळघळ

वाहण्याइतका प्रसंग फारसा आला नव्हता. तेव्हां आतां उपेक्षा करतां उपयोगी नाहीं असें वाटून तो किंचित् हंसत म्हणतोः

" कां ? अगदीं रडण्यापर्यंत न् शिव्या देण्यापर्यंत का येऊन ठेपलं ? एक गोष्ट तरी तुझ्या मताशिवाय मी करतों का ? इतका अगदीं तुझ्या मुठींत कीं घोटभर पाणी पी म्हणालीस कीं घोटभरच पितों, तरी आणखी हें—आहेच का ? छे छे छे ! तुझ्यापुढें अगदीं हात टेंकावे बोआ !"

" बरं बरं, येऊन जाऊन शेवटीं मीच द्वाड ! तुझी तर सारीं चांगलींना ? हो. तेवढीं तरी आहांत चांगलीं माणसं म्हणून जग चाललं आहे ! नाहीं तर—"

**काशीनाथपंत**:— अग पण तुला द्वाड म्हटलं कुणीं ? वा ! तुझ्यासारखी सुशील, सरळ, चांगली अशी दुसरी बायको आहे कुठें ?

**सीताबाई**:— बरं बरं. मी कांहीं बोल्यानं नाहीं दूध पीत, मला सारं समजतं आहे बरं का ? तुमचीं ही बोलणीं म्हटलं सारीं माझ्या लक्षांत आलीं आहेत. मी थोडे दिवस वाट पहातें आहें. पाहीन पाहीन अन् एखाद्या दिवशीं पोरांना घेईन न् चालती होईन पुण्याला, मग बसा आपल्या भावजयीला आणखी त्या दिवटयाला घेऊन. येऊन जाऊन मी नको ना ? जाईन मी आपली.

**काशीनाथपंत**:— तूं नको तर मग हवं कोण मला ? तुझ्यासाठीं तर सारं. बरं मग काय ? पहिल्यांदा तोंडयांत भर घालायची का ? का साळीला मोत्यांच्या बुगडया करायच्या ?

**सीताबाई**:— मला नाहीं येत असला चावनीटपणा. दिवसभर मेली जशी थट्टा ! माझ्या हातांत पगार पडला म्हणजे मला काय पाहिजे तें मी करीन. लोकांना कशाला हवी त्याची पंचाईत ?

**काशीनाथपंत**:— मी लोक का ? शिकस्त झाली बोआ तुझ्यापुढें. मी एवढा मोठा प्रत्यक्ष तुझा नवरा पण माझा काडीभर दिखील मान ठेवीत नाहींस. याला म्हणावं तरी काय ? मी आपला निमूटपणानं ऐकून घेतों म्हणून होय !

**सीताबाई**:— नका ऐकून घेऊं. कोणीं म्हटलं ऐकून घ्या म्हणून ? काढा माझे काय गांव मुकासे काढायचे असतील ते. मान तरी ठेवून घ्यावा लागतो. मला मान द्या, मला मान द्या असं म्हणून का कोणी मान देत असतो ? म्हणे मान देत नाहीं ! अन् मला आज किती वर्षं झालीं तुम्हीं

पोरासोरांच्या देखत वाटेल तसं बोलतां, मला नाहीं का राग येत न् वाईट वाटत ? ह्या अक्काबाई घरांत आणल्यापासून मी म्हणजे आपली कोण्या कोंपऱ्यांतला केर झालें आहे. जसं कांहीं पोतेरं ! मी आपली गरिबीनं सोसून घेतें म्हणूनचना हें सारं ? दुसरी तिसरी असती तर सतरा गाडे बोलती न् काय हवं तें करती.

**काशीनाथपंत:**– बरं बोवा आम्हीच द्वाड, आम्हीच मूर्ख; मग तर झालं ? पण हें असंच कुठवर चालायचं ? वाजले किती आलं का लक्ष्यांत?

**सीताबाई:**– कितीकां वाजेनात मेले ? मला काय करायचंय् ? मी ही जातें न् खालीं जाऊन चौघडी हांतरून पडतें. कुठें तरी पडायचं न् आली झोंप तर घ्यायची. ती दिखील टवळी आतांशा येत नाहीं.

**काशीनाथपंत:**– असं रागावलं नाहीं, जळफळलं नाहीं, म्हणजे येईल झोंप. नाही तर कशी येईल ?

**सीताबाई:**– तीनतीनदां बोलून आणखी मला राग आणूं नका बरं. माझा राग आहे कठीण. मी मग काय हवं तें बोलेन अन् मनास वाटेल तें करीन. मग बसाल.–पण एवढं हवं कशाला ? मी आपली उठूनच जातें कशी. म्हणजे हा त्रासच नको आणखी कांहींच नको.

असें म्हणून **सीताबाई** उठून जाऊं लागली. **काशीनाथपंत** अर्थातच उठून तिला धरून बसवूं लागले. ती मोठमोठ्यानें रडूं ओरडूं लागली. शेवटीं **काशीनाथपंत** "मी चुकलों, तुझ्या पायां पडतों. पुन्हां असं बोलणार नाहीं" असें अक्षरश: जेव्हां म्हणाला, तेव्हां ती किंचित् शांत झाली व म्हणाली, 'हो थट्टा थट्टा तरी किती ? कांहीं त्याला ताळतंत्र आहे का नाहीं ? अन् ही कसली आली आहे थट्टा ? आपलं हवं तसं बोलायचं अन् मी रागावलें म्हणजे मग म्हणायचं 'उगीच आपली थट्टा केली, चुकलों पुन्हां नाहीं करायचा. पायां पडतों.' एवढं बरं साधलं आहे. मी आपली भोळी ! आपली माझी तेव्हांच समजूत होते."

**काशीनाथपंत:**– बरं पण आतां गेला ना राग ? कुणीकडून राग गेला म्हणजे झालं. एकदां हंसून माझ्याकडे पहा पाहूं तर मग ?

**सीताबाई:**— ( हंसून ) हें काय हें पोरांसोरांसारखं ? रागाचं काय आलं आहे म्हणा, पण म्हटलं माणसाचा अंत पाहूं नये. बरं साळीच्या बुगड्यांला मोतीं आणायचीं तीं चांगलीं खाशीं पाणीदार आणायचीं बरं का ? नाहीं तर आपलीं माझ्या त्या नथेच्या वेळीं पिंपळ्यांना लावायला

आणलीं होतीं तशीं आणाल. हो इकडे कांहीं त्यांतलं कळत नाहीं म्हणून सांगतें.

**काशीनाथपंतः**— आणून तुला दाखवून तुला पसंत झाल्याखेरीज का घेईन मी ? पण हें उद्यांच्या लचांडाचं काय करावं असं झालं आहे मला. दोन दिवस त्याच्यामुळें चांगली झोंप दिखील आली नाहीं. एकदां वाटतं—

**सीताबाईः**— एवढं कसलं लचांड आलं आहे बाई ? कांहीं हपीसांत झालं आहे का काय ?

**काशीनाथपंतः**— छे ग, ऑफिसांत माझ्यावर कोण लचांड आणणार आहे आतां ? आतां माझा मी अगदीं कुलमुखत्यार आहें. त्या गोविंदरावांनीं भारी छळलं होतं लोकांना. आपल्या कारकीर्दींत आपण सुख देणार साऱ्यांना.

**सीताबाईः**— नाहीं, सुख तर द्यावंच. पण म्हटलं अंमळ साऱ्यांना वचकय् असावा. नाहीं तर म्हणतील दप्तरदार आपला पोंचटच आहे—पण मला मग लचांड कसलं तें नाहींच सांगितलं ?

**काशीनाथपंतः**— अग दुसरं कसलं लचांड ? हें **गिरिधररावांचंच.** हो उद्यां तो गृहस्थ आला सकाळीं म्हणजे त्याला सांगावं काय ?

**सीताबाईः**— हात्त्याच्या ! मीं म्हटलं कसलें लचांड एवढं ? याचंच का एवढं गूढ पडलं आहे ? त्यांना सांगाय् सांगायचं तें काय ? देण्याघेण्याचं मानापानाचं काय तें ठरवा, आणखी मुहूर्त नेमा असं सांगायचं ! आणखी काय ?

**काशीनाथपंतः**— तूं म्हणतेस त्या साऱ्या गोष्टी खऱ्या, पण चार चौघे काय म्हणतील इकडे पाह्यलं पाहिजे ना ? मला दिखील तुझ्यासारखंच वाटतं, पण आमची मंडळी अगदीं त्याला हो म्हणत नाहींत.

**सीताबाईः**— अहो पण मला असा चमत्कार वाटतो, त्या मंडळीचं ऐकायचं काय म्हणून ? कांहीं उद्यां पैसे लागले तर मंडळी नाहींना येत द्यायला ! म्हणे मंडळी असं म्हणते तसं न् तसं म्हणते. उद्यां दुसऱ्या एखाद्याची कारटी केली म्हणजे कांहीं तरी नांवासारखे डागडागिने नकोत का घालायला ? **गिरिधररावाची** ती कांहीं कटकट आहे का ? आपल्याला कांहीं घालायला नको, संवरायला नको, उलट मानापानाचं

येईल हुंडा येईल. आपल्याला करायचंय् काय म्हणा ? पण आपली गोष्ट सांगितली.

**काशीनाथपंतः**— हूं. तोच हुंडापांडा काय येईल तो ब्यांकेंत टाकून त्याच्या पुढच्या शिकण्याला लावूं म्हणजे झालं.

**सीताबाईः**— म्हणजे ? अजून शिकणं रडायचंच आहे का ? तो मेला अभ्यासच करीत नाहीं. त्याचं शिकणं आटपावं तरी कधीं ? कांहीं आपो-आप थोडंच आटपतंय् ? मी आपल्या बाळ्याला असा अभ्यास करायला शिकवीन, घटकाभर दिखील त्यानं बूक ठेवूं नये.— हो बरं सुचलं, आतां यंदांचं वरीस संपलं म्हणजे आपली चाकरी धर म्हणून सांगावं त्याला. आतां पुरें झालं तें शिकणं. त्या तिघांच्या पायीं कांही नाहीं तरी दहा हजार रुपये गेले असतील नाहीं का ?

**काशीनाथपंतः**— भलतंच एखादं. दहा कांहीं नाही, पण चार पांच हजार रुपये गेले खरे.

**सीताबाईः**— त्याचाच अर्थ तो. म्हणूनच म्हणतें, आतां आपला हात आंखडावा आणखी मोकळं व्हावं. इतकं केल्यासारखं उद्यां एकदां लग्नाचं ठरवा म्हणजे झालं. मग कुणाच्या बाप्पाची दिखील भीति नाहीं. हो, लहानपणापासून वाढवल्यासारखं लग्न करून टाकलं म्हणजे झालं. अन् माझं म्हणणं दुसरं कांहीं नाहीं. आयती वर चालून आलेली लक्ष्मी तट्कन नाहीं म्हणून कां टाकावी ? एखादी चांगली अगदीं फक्कड मुलगी केली, तर तिला दागिने नकोत का घालायला ? ते कुठले आणायचे ? मांडवशोभेला सुद्धां मी आपल्यापासले कांहीं घालायची नाहीं आणखी नवे कांहीं करूं द्यायची नाहीं.

**काशीनाथपंतः**— अग, माझ्या कुठें आहे मनांत ? मी दिखील तेंच पाहतों आहें. पण आपलं उगीच लोकांकरितां म्हणून म्हणत होतों झालं.

**सीताबाईः**— पुनः आपलंच. तें कांहीं नाहीं. हजार रुपये हुंडा, दोन हजारांचे मुलीच्या अंगावर दागिने, आणखी पांचशें रुपये करणी—तोंड धुण्याचं रुप्याचं सामान. रासनाहणीं, खणा—नारळाच्या ओट्या हे सारे आमचे बायकांचे मानपान. इतकं सगळं ठरवावं आणखी हो म्हणून सांगावं झालं. उगीच लोकांकडे पाहूं नयेन् कांहीं करूं नये. लोकांना काय ?

**काशीनाथपंतः**— बरं तर, असंच सांगतों झालं उद्यां.

**सीताबाईः**— सांगितलंच पाहिजे न् सांगतों काय नुसतं कामाचं ?

याप्रमाणें या एकमेकांवर अत्यंत प्रेम करणाऱ्या नाजूक जोडप्याचा बराच वेळ संवाद होऊन शेवटीं त्या कुरूप व वेडसर पोरीशींच बिचाऱ्या **नाना**चें लग्न लावण्याचा निश्चय ठरला. **गोपिकाबाई**च्या मुलाचें लग्न, परंतु तिला एका शब्दानें कोणी देखील बरें वाईट विचारलें नाहीं. यांचा हा प्रेमळ संवाद संपून निर्णय होण्याच्या वेळेसच म्हणजे बारा वाजून गेल्यावर ती खालीं स्वयंपाकघरांत काम आटपून आपलें अंथरूण टाकून निजली होती. बिचारा **नाना** या वेळीं पुण्यास डेक्कन कॉलेजांत बेकन व काव्यप्रकाश यांचें पारायण करून थकून आपल्या खोलींत स्वस्थ निजला होता. त्यास आपल्या आयुष्यांतील एका अत्यंत महत्त्वाच्या गोष्टीविषयीं चुलता व चुलती हवा तसा निर्णय करीत आहेत याचें स्वप्न देखील पडलें नसेल.

वर सांगितल्याप्रमाणें आमच्या त्या प्रेमळ जोडप्यानें **नाना**च्या लग्ना-संबंधानें निकाल केल्यानंतर कांहीं वेळ आणखी कित्येक गोष्टींसंबंधीं व विशेषतः ' बाळ्या ' च्या लग्नासंबंधीं विचार झाला; परंतु त्या विचारांचा निकाल होऊन ठराव होण्यापूर्वींच **सीताबाईस** झोंप लागली व **काशी-नाथपंतही** निजले.

रात्रीं ठरल्याप्रमाणें दुसरे दिवशीं **गिरिधरराव** आल्यावर **काशीनाथ-पंतां**नी त्यास " हो " म्हटलें व मग हुंडा, मानपान वगैरेंविषयीं ठराव होऊन फक्त तिथि नेमावयाची राहिली. मधून मधून **काशीनाथपंत** चुक-तील तेथें दारापाशीं किंचित् आड उभी राहून **सीताबाई** निरनिराळ्या गोष्टींसंबंधानें कसें कसें करावयाचें व काय काय पाहिजे तें सुचवीत होती. **गिरि-धररावा**चें म्हणणें असें पडलें कीं, हुंडा मुळींच न देतां फक्त पोरीच्या अंगावर दोन तीन हजारांचे दागिने घालावे. **सीताबाई** कांहीं स्वतः व कांहीं **पंतांच्या** मुखानें असें म्हणाली कीं, मुलीच्या अंगावर दागिने घालावयाचे ते न घालतां रोख तीन हजार हुंडा म्हणून द्यावे, म्हणजे मुलाच्या शिक-ण्याला उपयोगी पडतील. हें ती कोणत्या अर्थानें म्हणाली असेल तें असो, पण म्हणाली खरी. **गिरिधररावां**नी हंसत हंसत, " मुलाच्या शिकण्याचं काय ? त्याची व्यवस्था आपण करतांच आहां, " असा टोला दिलाच. **सीताबाई** किंचित् **निरुत्तर** झाल्यासारखी झाली. पण तिनें आपला हट्ट

सोडला नाहींच. शेवटीं तिच्या म्हणण्याप्रमाणें सर्व गोष्टी ठरल्या. **गिरिधरराव** पडला गरजू. त्याला हीं दोघें वांकवतील तसें वांकलेंच पाहिजे होतें. हा ठराव झाल्यानंतर अर्थातच **नाना**स इकडे येण्याविषयीं पत्र गेलें व लग्नाचें ठरल्याबद्दल सगळ्यांस कळलें.

---

# प्रकरण ९ वें.

## दोन पत्रें.

**नाना** जेवून सुपारी खात खात असा सकाळीं पावणे अकरा वाजतां क्लबाकडून आपल्या खोलींत जात होता. इतक्यांत त्याला टपालचाला दिसला. तेव्हां त्यानें आपलें एखादें पत्र आहे कीं काय हें, त्याच्या जवळचीं पत्रें घेऊन पाहिलें, तों त्यास दोन पत्रें मिळालीं. तीं घेऊन तो आपल्या खोलींत गेला. एक फोडून पाहिलें तों तें **काशीनाथपंता**चें होतें. तें वाचून त्यास मोठें चमत्कारिक झालें. त्यांत स्पष्टपणें लग्न ठरलें आहे, आपण निघून यावें असा जरी उल्लेख नव्हता तरी " लग्नाचें जुळवायचें आहे. लोक विचारायला येतात, तर हें पत्र पावतांच निघून यावें. सध्यां सुट्टीच आहे. सबबी सांगू नयेत." अशा तऱ्हेचा मजकूर होता. तो वाचून त्याला बुचकळ्यांत पडल्यासारखें झालें. काय करावें तें सुचेना. इतक्यांत दुसरें पत्र त्याच्या दृष्टीस पडलें. तें पत्र **गणपतरावां**चें हें त्यानें तेव्हांच ओळखलें. पत्र फोडून वाचलें तेव्हां त्यास खरा प्रकार काय तो कळला. **गिरिधररावां**चा व **काशीनाथपंता**चा ठराव झाला हें **गणपतरावास** **गिरिधरराव**कडूनच कळलें. कारण **गणपतराव** त्या शोधांत होता. तें कळल्याबरोबर त्यानें एक लांबलचक पत्र **नाना**स लिहिलें. त्यांत सर्व हकीकत लिहिली व शेवटीं म्हटलें होतें " अशी एकंदर हकीकत आहे तेव्हां जें काय करणें तें पूर्ण विचार करून कर. निव्वळ काका सांगतात तेव्हां आपण मान वांकविलीच पाहिजे असें म्हणून आंधळ्यासारखा वागूं नको. लग्न म्हणजे आपल्या आयुष्यांत ज्या कित्येक गोष्टी घडून येतात त्यांच्यापैकीं अत्यंत महत्त्वाची गोष्ट आहे हें तूं जाणतोच आहेस. ' सब्जेक्शन ऑफ वुइमेन ' मध्यें लग्न म्हणजे काय हें सांगितलें आहे तें लक्षांत आण. पहा

बरें ' लग्न ' या शब्दांत काय गोष्टी भरल्या आहेत ? वधूवरांचे मनांत परस्परांविषयीं प्रेम, मैत्री, आदर एक कीं दोन ? जगांतील ज्या ज्या कांहीं उत्कृष्ट गोष्टी आहेत त्या सर्वांचें सार म्हणजे विवाह होय. सर्व सुखांचें भांडार चांगल्या विवाहांत आहे. दोन प्राण्यांच्या आयुष्यक्रमाचा मेळ त्या यःकश्चित् पिंवळ्या दोऱ्यानें व हळकुंडानें बांधला जातो तो असा कीं मरणावांचून त्यांची ताटातूट नाहीं. तेव्हां ही जी विवाहाची थोरवी आहे त्या थोरवीच्या मानानेंच त्याविषयीं फार खोल विचार केला पाहिजे, असें सुशिक्षित मनुष्य कधींही म्हटल्यावांचून राहणार नाहीं. आपल्या मनाप्रमाणें आपल्या सर्व सुखदुःखांचा वांटा घेणारा प्राणी असावा असें कोणास वाटणार नाहीं ? नर नवराबायकोचें खरें प्रेम असेल तर त्यांनीं सुखाची आशा करावी. नाना, तूंच पहा कीं, तुझी आमची मैत्री आहे यामुळें आपणां दोघांस किती सुख होतें आहे बरें ! मग आपल्या जिवा-पेक्षांही ज्याच्यावर आपण ज्यास्त प्रीति करतों असा एक प्राणी नेहमीं आपल्या सन्निध आहे असें आपल्यास वाटत असलें तर किती बरें आप-ल्यास सुख होणार आहे ? आपणास आनंद होवो, दुःख होवो त्याचा सारखा वांटा मोठ्या आनंदानें उचलणारी अशी आपली अर्धांगी आहे अशी खात्री असल्यावर सुख म्हणजे काय हें कोणाला विचारायला पाहिजे काय ? कोणताही विचार येवो, व तो कसलाही असो; आपल्या अंतःकर-णांतून त्या दुसऱ्या अंतःकरणांत गेला कीं पुरे, दुःख हलकें झालेंच. सुख मात्र या वांटपानें अधिक होतें. असें ज्याच्याविषयीं आपल्या मनांत सतत वागत आहे असा प्राणी आपल्यास मिळाल्यावर आणखी काय पाहिजे ? सर्व जगानें जरी आपल्यावर हव्या त्या गोष्टींचें काहूर माजविलें तरी आपली अर्धांगी आपणास एका उत्तरानें तर काय; परंतु क्षणिक विचारानेंही दुख-विणार नाही. आपणास दारिद्र्य येवो, चिंता जडो, ती म्हणून कधींही आपला त्याग करणार नाहीं. आपण आजारी पडलों किंवा दुसऱ्या संक-टांत सांपडलों तरी ती आपल्यास जास्त जास्त सुख देण्यास झटेल. आप-णाकरितां आपलें सर्वस्व गेलें तरी जाऊं देईल व आपणही तिच्याकरितां त्याच तऱ्हेनें वागूं. दिवस असो, रात्र असो, वियोगाचा विचार कधीं मनां-तही येणार नाहीं. आपणास सुख झालें असतां तिला त्या सुखाखेरीज कांहीं दिसणार नाहीं. त्याचप्रमाणें तिचें सुख पाहून आपल्यासही सुखाशि-वाय कांहीं ध्यानांत येणार नाहीं. तिच्या दुःखानें आपण व आपल्या दुःखानें ती दुःखी होईल इत्यादि गोष्टींची जेव्हां नवराबायकोच्या मनांत

खात्री असेल तेव्हांच त्याला विवाह, आणि अशी ज्यांना एकमेकांविषयीं खात्री आहे तींच नवराबायको म्हणावें. असें जोडपें माझ्या पहाण्यांत एकच आहे. तें आपल्या **विष्णुपंताचें** व **लक्ष्मीबाईचें** होय. तीं दोघेंही एके ठिकाणीं वाढलीं, दोघेंही सुशील, यामुळें त्यांच्यांत जें प्रेम आहे असें मला वाटतें तसें कोठेंही नसेल. **यमुना**बाई ऊर्फ **लक्ष्मी**बाईचीं **विष्णुपंतास** आलेली पत्रें मीं पाहिलीं तीं किती तरी मजेदार आहेत ! तीं एखाद्या कादंबरींत वाचलींशींच मला वाटतात. नाहीं तर घरोघर विवाह आणि घरोघर नवराबायको आहेतच. मित्रा, हें जें मीं एवढें लांबलचक लिहिलें आहे याचा पक्का विचार कर. तुला आपल्या मनाप्रमाणें करण्यास करण्यास सवड आहे. जर तूं आपला विचार केला नाहींस तर त्याचा दोष तुझा तुझ्यावर राहणार आहे. पश्चात्ताप झाला तरी तुला होईल. ” अशा तऱ्हेचा आणखी पुष्कळ मजकूर होता. हा मजकूर **गणपतरावा**च्या एकंदर विचारांस किती साजणारा होता हें कोणाच्याही ध्यानांत येईल. ज्याप्रमाणें इतर सर्व गोष्टींत तो आकाशांत भराऱ्या मारीत असे, त्याचप्रमाणें यांतही होता हें सांगवयास पाहिजे असें नाहीं. **गणपतरावाचें** हें पत्र वाचून **नाना**स बरें तर वाटलेंच, परंतु वाचतां वाचतां किंचित् हंसूंही आलें.

**नानाला** हंसूं आलें तें कांहीं **गणपतरावा**चा उपदेश कांहीं तरी चमत्कारिक होता असें वाटून नव्हे. **गणपतरावाच्या** त्या लिहिण्यांत अयोग्य असा मजकूर बिलकुल नव्हता हें कोणीही कबूल करील. मग नानासारख्या त्याच्या मित्रास तो फार योग्य असें वाटेल यांत नवल तें काय ? **नाना**स हंसूं येण्याचीं कारणें दोन तीन होतीं. त्यांतलें मुख्य कारण हें कीं, **गणपतरावा**च्या त्या प्रत्येक वाक्यांत व विचारांत त्याला लिहिणाराचें प्रतिबिंब दिसत होतें. **गणपतरावा**ची जी नेहमीं बोलण्याची व कोणत्याही गोष्टीविषयीं अत्यंत आस्था दाखविण्याची तऱ्हा ती त्या प्रत्येक वाक्यांत किंबहुना शब्दांतही त्याला दिसून येत होती. इंग्रजी पुस्तकांतील स्वतंत्रतेचा वाद सांगणारे विचार वाचून **गणपतरावाचें** मन फार विलक्षण होत असे. त्या वेळीं जितक्या जोरानें तो आपल्या मित्राजवळ स्वदेशाविषयीं बोलत असे किंवा एखाद्या उत्कृष्ट कादंबरीमधील नायकनायिकेची प्रेमकथा वाचून जितक्या प्रेमळपणानें तो “ आपल्या देशांत अशीं जोडपीं जिकडे तिकडे कधीं दिसूं लागतील” अशा तऱ्हेचे उद्गार काढीत असे, तितक्या

जोरानें व त्याच प्रेमपूर्ण आवाजानें तो आपल्याशीं बोलतो आहे **असें नानास** वाटलें. परंतु तितक्यांतल्या तितक्यांत हे **गणपतरावाचे** विचार आपल्या या खालावलेल्या स्थितीसंबंधानें पाहतां किती चमत्कारिक व असंभवनीय आहेत, हें पाहून त्यास हंसूं आलें. त्यास हंसूं येण्याचें दुसरें कारण त्याच्यापुढें असलेल्या दोन पत्रांचा परस्पर विरोध हें होय. एक त्याच्या प्रत्यक्ष चुलत्याचें व दुसरें ज्याच्याशीं त्याचा मैत्रीशिवाय वास्तविक संबंध कांहीं नाहीं अशा **गणपतरावाचें**. एकांत आपल्या जन्माचें मातेरें करणारे प्रत्यक्ष जरी नाहीं तरी अप्रत्यक्ष रीतीनें लिहिलेले शब्द आणि दुसऱ्यांत आपणच काय परंतु सर्व जगांतील मनुष्यांनीं जरी वाचून ध्यानांत ठेवले तरी त्यांचें कल्याण करणारे विचार. एक केवळ द्रव्येच्छेनें लिहिणारा. दुसरा अगदीं निरपेक्ष. असे एक की दोन ! विरोध दाखविणारे अनेक विचार त्याच्या मनांत आले; व त्यामुळेंही त्याला किंचित् हंसूं आलें. **गणपतरावानें**, लग्नाची बातमी कळतांच आस्थेनें तावडतोब लिहिलेलें व उदात्त व रमणीय अशा विचारांनीं ओतप्रोत भरलेलें तें पत्र वाचल्यावर त्याच्या मनाची स्थिति चमत्कारिक होईल यांत नवल तें काय? कांहीं वेळपर्यंत त्यास नजीक आलेल्या संकटाची देखील आठवण झाली नाहीं. लोभी नातेवाईक व निर्लोभी मित्र या दोघांच्याही मूर्ति त्याच्या डोळ्यांपुढें दिसूं लागल्या. **काशीनाथपंत** आपला प्रत्यक्ष चुलता असून व **सीताबाई** चुलती असून आपल्या भावि सुखाचा विचार मुळींच करीत नाहींत इतकेंच नाही, तर त्या सुखाचें मातेरें होईल अशी गोष्ट करूं पाहत आहेत, असें पाहून व **गणपतराव** ती गोष्ट कळतांच तावडतोब आपल्याला सावध करून आपणावर तें संकट ओढवूं नये म्हणून आपल्या मतानें उपाय सुचवीत आहे हें पाहून क्षणभर तरी मनुष्यप्राण्याच्या स्वभावावर त्यानें विचार करणें हें किती साहजिक आहे ! आणि हें अगदीं साहजिक असल्यामुळें त्याच्या मनांत त्या प्रकारचे अनेक विचार आलेच; व मैत्रीच्या मोठेपणाबद्दल जें आजपर्यंत लोकांनीं लिहिलें आहे तें अगदीं यथायोग्य असें त्याच्या अनुभवास आलें.

अशा तऱ्हेनें **गणपतरावाच्या** स्वभावावर, **काशीनाथपंताच्या** स्वभावावर व **सीताबाईच्या** स्वभावावर त्यानें बराच वेळ विचार केला, मनुष्यस्वभावावर विचार केला, व अशा विचारांत तो गुंग होऊन गेला असतां समोर उघडया असलेल्या खिडकींतून वाऱ्याची झुळूक येऊन टेबलावर

पडलेल्या दोन पत्रांपैकीं **काशीनाथपंता**चें पत्र उडून त्याच्या अंगावर आलें. त्यासरसा तो त्या कोणालाही गुंग करून सोडणाऱ्या विचारांतून बाहेर आला. जणूं काय तें **काशीनाथपंता**चें पत्र "इसापनीतील" आकाशांतील ताऱ्यांकडे पहात असतांना विहिरींत पडणाऱ्या तत्वशोधकाप्रमाणें "हे भलतेच विचार काय करीत बसला आहेस ? मीं जें संकट आतां तुझ्यावर आणलें आहे त्याचा आधीं विचार कर." असें सांगण्याकरितांच वाऱ्याच्या झुळुकीसरसें त्याच्या अंगावर आलें. **नाना**नेंही त्या पत्राच्या उपदेशाप्रमाणें ऐकलेंसें दिसलें; कारण त्यानें ते पूर्वीचे उदात्त व सर्वव्यापी विचार सोडून देऊन आपल्यावर आलेल्या संकटाविषयीं तो विचार करूं लागला. त्यानें तें **काशीनाथपंता**चें पत्र पुनः वाचलें, व **गणपतरावा**चेंही वाचलें. नंतर तीं दोनही पत्रें पुढें ठेवून त्यांजकडे बघत तो तटस्थ राहिला. "आतां काय करावें" हा काय तो प्रश्न त्याच्यापुढें येऊन उभा राहिला. **काशीनाथपंताच्या** लिहिण्याप्रमाणें जावें असें तर त्यास मुळींच वाटेना. कारण, ज्या गोष्टीविषयीं नाहीं होय असें म्हणावयाचें तें प्रत्यक्ष तेथें गेल्यानें व्हावयाचें नाहीं. पत्रोपत्रीं कांहीं तितकी पंचाईत नसते. हो, आपण तेथें गेलों आणि अमुक मुलीशीं तुझें लग्न जुळविलें आहे असें त्यांनीं सांगितलें किंवा न सांगतांच सर्व तयारी केली तर तोंडावरतोंड देऊन नाहीं होय म्हणणें फारच अवघड आहे. तेंच कांहीं तरी युक्तीनें पत्र लिहून तिकडे जाणें टाळणें अगर प्रसंगीं 'माझ्या मनांतून त्या मुलीशीं लग्न करणें नाहीं.' असें स्पष्टपणें पत्रद्वारें कळविणें तितकें अवघड नाहीं, असें त्यास वाटलें; व त्यामुळें **काशीनाथपंता**च्या बोलावण्याप्रमाणें जावयाचें नाहीं, हें त्यानें अगदीं नक्की ठरविल्यासारखें केलें. आपण असें केलें तर लोक काय म्हणतील ? ह्या प्रश्नांचें मात्र समाधान कसें करावें हें त्यास सुचेना. आज इतके दिवस ज्यानें सर्व प्रकारानें आपणांस पोसलें, आपल्याला या स्थितीला आणण्याला जो कारण झाला, ज्यानें हात दिला नसता तर आपली आज फारच वाईट स्थिति झाली असती, त्या चुलत्याला आज जर अशा तऱ्हेचें पत्र लिहिलें तर आपणावर कृतघ्नतेचा दोष येईल कीं काय ? "याचे आतां ढुंगणाला हात पोहोंचले. आतां हा चुलत्याला गोष्टी सांगावयाला लागला. मोठा शहाणा झाला" असें म्हणून सर्व लोक आपल्याला दोष देतील कीं काय ? आणि त्यांनीं दोष दिला तरी त्यांस आपण कितपत जुमानावें ? असे नानातऱ्हेचे प्रश्न त्याच्या मनांत उद्भवले, व किती वेळ विचार केला तरी त्या प्रश्नांचा उलगडा त्याच्यानें होईना, प्रश्न तर अत्यंत

महत्त्वाचा. या प्रश्नाच्या ज्या तऱ्हेनें आपण निकाल लावूं त्यावर आपलें सर्व आयुष्याचें सुखदुःख अवलंबून आहे. जर आज चुलत्याच्या मर्जी-प्रमाणें लग्न झालें, तर गृहसौख्यास आंचवलों इतकेंच नव्हे परंतु पुढें जे **गणपतरावा**चे, त्याचे व आणखी एक दोघां त्याच्यासारख्याच मंडळींचे विचार होते त्या सर्वांचा आपल्यापुरता पायाच ढांसळला असें म्हटलें पाहिजे. **गणपतरावानें सांजोरी**च्या **गिरिधररावा**च्या मुलीविषयीं जी माहिती दिली होती ती त्या मुलीस अगदींच प्रतिकूल होती. शिवाय त्याला स्वतः-लाही थोडीबहुत माहिती होतीच; तेव्हां तिच्याशीं लग्न लागणें हें त्याला मुळींच इष्ट नव्हतें. बरें **काशीनाथपंता**स स्पष्टपणें नाहीं म्हणून 'नाहीं' सांगितल्यास आपणावर काय प्रसंग ओढवेल याची अटकळ करणें त्यास अशक्य नव्हतें. **काशीनाथपंत** ताबडतोब त्यास "आतां मजजवळून एक कवडीही मिळणार नाहीं, आपली व आपल्या आईची सोय पहावी." असें—**सीताबाई**मुळें कां होईना पण—सांगण्यास कमी करणार नाहीं—असा जर प्रसंग आला तर आज आपण काय करणार? त्यास कांहीं सुचेना. आज जें आपण **काशीनाथपंता**स पत्र पाठवूं तें आपल्या पुढल्या आयुष्यक्रमाचें निदान ठरविणार, हें मात्र त्यास पक्कें कळून चुकलें. **नाना**चा स्वभाव मोठा विचारी होता. आज तो ज्या स्थितींत आहे त्याच स्थितींत **गणपतरावाला** आणून टाकलें असतें तर त्यानें क्षणाधींत वरील प्रश्नांचा निकाल लावला असता. त्यानें तेव्हांच **काशीनाथपंतास** पत्र लिहून तट् कीं फट् करून टाकलें असतें. **नाना** व **गणपतराव** या दोघांच्या स्वभावांत मोठा फरक काय तो हाच होता. दोघांचे विचार एक, दोघांचे बेत जवळ जवळ एक, दोघांच्या इच्छा एक; परंतु **गणपतराव** मनांत आलें कीं 'ताबडतोब करून टाकी' असें म्हणणारा. व **नाना** तीच गोष्ट विचारानें व सोयीनें अशी करणारा होता. 'हळू' सावकाश,' धीरेधीरे हे शब्द **गणपतरावा**चे कोशांत कधींच सांपडले नाहींत; **नाना**ची सर्व इमारत तर त्या शब्दांवर होती. त्याला कोणतीही गोष्ट घाईनें करून टाकावी असें वाटत नसे. कॉले-जांतील आणखी कांहीं मित्रमंडळी मिळून त्यांनीं निरानिराळया विषयांवर चार घटका वाद करण्याकरितां म्हणून जो एक लहानसा 'डिबेटिंगक्लब[१]'[२]

१ वादविवाद करणारी मंडळी. २ 'आजकालच्या गोष्टी' मधली स्थिति गोष्ट १ ली पहा.

काढला होता. त्यांत बालविवाह, पुनर्विवाह वगैरे विषयांसंबंधीं वाद असला म्हणजे **नाना** व **विष्णुपंत** एकीकडे व **गणपतराव** एकीकडे असा पक्षभेद असावयाचाच. इतर मंडळी कांहीं इकडे व कांहीं तिकडे असत; परंतु दोन बाजूला धुरीण काय ते हे असत. अशा वेळीं तरी काय ? **गणपतराव** सर्वांच्या पुढें. दोनही बाजूंचें हेतु एकच, परंतु **गणपतराव** म्हणायचा ' जर तुम्हांला बालविवाहाची चाल मोडायची आहे, पुनर्विवाहाची चाल सुरू व्हावी अशी इच्छा आहे, तर हर उपायांनीं तुम्ही ताबडतोब त्या इच्छा पूर्ण करून कां घेत नाही ? ' **नाना** व **विष्णुपंत** म्हणत ' तुम्ही म्हणतह्या सर्व गोष्टी आम्हांलाही मान्य आहेत, परंतु तत्काळ होणें हें शक्य नाहीं. आणि कदाचित् असल्या तरी समाजास ज्या फार त्याज्य अशा गोष्टी वाटांतात त्या बळजबरीनें अंमलांत आणणें हें समाजाच्या हिताला अपायकारक आहे. त्या सावकाश व आपोआप प्रचारांत आल्या म्हणजे फार हितावह होत. अस्तु.

कसेंहीं असो. **गणपतरावा**च्या व **नाना**च्या स्वभावांत व विचारांत हा मोठा थोरला फरक होता खरा, **नाना** जास्त विचारी असल्यामुळें त्यास कोणतीही गोष्ट पुरता विचार केल्याखेरीज करूं नये असें वाटत असे. अशी त्याच्या मनाची स्थिति असल्यामुळें त्यानें आपल्यापुढें आलेल्या गोष्टीविषयीं फार वेळ व फार खोल असा विचार केला. तरी त्याचें समाधान होईना. तो मोठ्या बुचकळ्यांत पडला. एकदां त्याला वाटे सध्यां काशीनाथपंतास "आतां सुटी आली; यंदा शेवटचें वर्ष आहे, तेव्हां अभ्यासाची काळजी लागली आहे, व अभ्यास पुष्कळ आहे सबब येऊं नये असें वाटतें " असें लिहून प्रसंग टाळावा. पण लागलींच त्याला वाटलें " अशानें हा प्रसंग सध्यांपुरता टळेल. अजीबात टळावयाचा नाहीं. पुनः मार्गशीर्षाच्या सुमाराला तोच लकडा लागेल, आणि तेव्हां तरी स्पष्टपणें ' नाहीं ' असें म्हणण्याचा प्रसंग येणारच. मग त्याची आतांच वाट लावून टाकली तर काय वावगें ? " पुनः वाटे ' पुढचें पुढें. सध्यांची अडचण तर दूर करूं. या " असे विचार करतां करतां त्याचे मनांत आलें, **विष्णुपंतास** हीं दोनही पत्रें दाखवावीं व त्याचा विचार घ्यावा. **विष्णुपंताचा** व **नाना** आणि **गणपतराव** यांचा मोठा स्नेह असे. तिघांचे विचार अगदीं सारखे असत. त्यांतून **नाना** व **विष्णुपंत** या दोघांचे विचार तर अगदीं तंतोतंत जुळत. **विष्णुपंत** खालच्या वर्गांत जरी होता तरी यांच्यांत मिसळत असे व यांच्या 'डिबेटिंगक्लब' चा तो एक मेंबर होता हें वर सांगितलेंच आहे. **नानाचे** व त्याचे विचार अगदीं

जुळत असत यामुळें त्यांचा अत्यंत स्नेह जमला होता. **विष्णुपंत** मोठा विचारी असल्यामुळें **नानानें** त्यास पत्रें दाखवून व सर्व हकीकत सांगून त्याचा विचार घ्यावा, असें मनांत आणलें. परंतु **विष्णुपंत** सुटींत गांवांत रहात असे व आतां तर साडेतीन वाजून गेले. गांवांत जाऊन परत यावें केव्हां असें वाटून त्यानें तो विचार दुसरे दिवसावर टाकला. पण पुनः वाटलें ' पत्राचें उत्तर तावडतोब गेलें पाहिजे. उशीर होतां उपयोगीं नाहीं' असा विचार करून त्यानें आपला पोषाख केला; तीं दोनही पत्रें खिशांत घातलीं व खोलीला कुलूप लावून गांवाचा रस्ता धरला.

रस्त्यानें तरी काय ! त्याच्या डोक्यांत नुसतें काहूर माजलें होतें. तो चालला होता हें त्याचें त्यास देखील कळत नव्हतें; इतका तो विचारांत चूर होऊन गेला होता. पांच वाजण्याच्या सुमारास तो गांवांत जाऊन पोंचला. **विष्णुपंत** घरींच होता. त्याची व याची गांठ पडली. ' कां आलां ' वगैरे प्रश्न झाल्यानंतर **नानानें** त्यास प्रथम आपल्या काकाचें पत्र दाखविलें व लागलीच **गणपतरावा**चेंही पत्र दाखविलें. **विष्णुपंता**नें तीं पत्रें वाचून पाहिलीं. **नाना**नें त्यास काय सांगावयाचें तेंही सांगितलें. दोघांचें बराच वेळ त्यासंबंधानें बोलणें झालें. शेवटीं दोघांच्या विचारानें असेंच ठरलें कीं, "सध्यां अभ्यासाच्या नडीमुळें येतां येत नाहीं. " असें ल्याहावें. या लिहिण्यापासून कांहीं तादृश फायदा होणार नाहीं हें दोघे जाणून होतेच. **विष्णुपंता**नें तर अशी आणखी शंका काढली कीं, या पत्रानें **काशीनाथपंत** रागावून लग्नाचें पक्कें करील व ' अमुक मुहूर्तावर लग्न करावयाचें ठरलें आहे तर तावडतोब निघून ये ' असा खलिताही पाठवील. नाहीं म्हणून कशावरून ? आणि असें झाल्यावर मग त्याला फशीं पाडावें यांत कांहीं तात्पर्य नाहीं. तेव्हां त्या **विष्णुपंता**च्या शंकेचेंही त्यांनीं निवारण कसें करावें याचा विचार चालविला. बरीच भवति न भवति होऊन शेवटी असें ठरलें कीं, सध्यां ' येण्यास सवड नाहीं ' असें तर ल्याहावेंच; परंतु त्यांत आपल्या मनांतून एव्हां लग्न करणें नाहीं असेंही सुचवावें. पत्र कसें ल्याहावें. याविषयींचा विचार होऊन ' त्याप्रमाणें रात्रीं मी पत्र लिहितों ' असें म्हणून **नाना** परत कॉलेजांत येण्यासाठीं निघाला. **विष्णुपंता**नें त्यास अर्थातच न जाण्याविषयीं आग्रह केला. " जेऊन रात्रीं इथेंच निजा आणि सकाळीं जा. आतां इतक्यांत आलांत तोंच पुनः एवढ्या लांब जाण्यांत काय अर्थ आहे ? पत्र ल्याहायचं तें इथेंच ल्याहा.

म्हणजे झालं. आतां तुम्ही इथून जाऊन पोंचेपर्यंत ९।९॥ वाजतील. त्यांत कांहीं अर्थ नाहीं. " असा **विष्णुपंताचा** फारच आग्रह पाहून **नानानें**ही फारसे आढेवेढे घेतले नाहींत. **विष्णुपंतानें राधाकाकूं**स " माझा एक मित्र जेवायचा आहे " असें सांगितलें; व हे दोघे गोष्टी सांगत बसले. त्यांच्या अनेक विषयांवर गप्पागोष्टी झाल्या. त्यांत कांहीं कॉलेजांतल्या संबंधानें, कांहीं सामाजिक विषयांच्या संबंधानें, व कांहीं इतर मित्रमंडळी-संबंधानें अशा गोष्टी झाल्या. बोलतां बोलतां **गणपतरावा**संबंधानेंही गोष्टी निघाल्या. तेव्हां **विष्णुपंत** म्हणतोः

" तुम्हीं कांहीं म्हणा; **गणपतरावाला** कोणताही दोष द्या. पण तुम्हांला सांगतों त्यांच्या अंगांत एक जो गुण आहे तो मोठा जबर आहे. कोणतीही गोष्ट मनांत आली म्हणजे त्याविषयींची त्याची आस्था फारच चमत्कारिक असते. त्या गोष्टींत त्याचं मन अगदीं तल्लीन होऊन जातं. आपल्या कॉलेजांतले लोक काय, पाहिजे त्याला वाईट म्हणतील. तुम्हांला नाहीं वाटत कीं, हल्लीं जी ती सुधारणेची गोष्ट हाणून पाडण्याचा जो कांहीं लोकांचा अगदीं कट झालेला आहे हा वाईट आहे म्हणून ? मी स्वतः जरी **गणपतरावाच्याइ**तका उतावळा नाहीं तरी पण मला असें वाटतं कीं, **गणपतरावासारखे** लोक अवश्य पाहिजेत. त्याखेरीज या दुराग्रही लोकांना तोंडीस तोंड मिळणार नाहीं. "

**नानाः—विष्णुपंत**, तुम्ही म्हणतां ही गोष्ट खरी. पण **गणपरावाच्या**-इतका उतावीळपणा कांहीं उपयोगाचा नाहीं. आतां मागें तो म्हणत होता कीं, पुनर्विवाहाची चाल सुरू करण्याला सरकारापासून कायदाच मागून घेतला पाहिजे म्हणून. पण माझी खात्री आहे. आणखी तुम्हीदेखील कबूल कराल कीं, त्याच्या म्हणण्याप्रमाणें जर उद्यां कायदा झाला तर फार अनर्थ होतील. अहो, हे असले कायदे आपल्याला प्रथमदर्शनीं मोठे सुखाचे वाटतात खरे, पण स्वतंत्रतेचा नाश करणारे असतात. हीच पुनर्विवाहाची चाल हलके हलके पडत चालली म्हणजे कोणाला त्याच्या-संबंधानें वाईट वाटायचं नाहीं. धीरेधीरे कां होईना पण खात्रीची सुधारणा पाहिजे. अतिशय उष्णतेंतून निघून अतिशय थंडींत गेलं म्हणजे काय वरं अनर्थ होतात.

**विष्णुपंतः— नाना**, तुम्ही म्हणतां ही गोष्ट मला अगदीं सर्वथैव कबूल आहे. समवं धीरेधीरे झालं पाहिजे. पण **गणपतरावासारखी** मंडळीही कांहीं

पाहिजेत. आणखी **गणपतरावां**चे विचार जसे आहेत तसे त्यानं कां बोलून दाखवूं नयेत ? इतकंच नव्हे, पण मी तर म्हणतों जनहिताचा नवा कांहीं विचार ज्यांच्या मनांत येईल त्यांनीं त्याचा उच्चार केला पाहिजे. ज्यांना होईल त्यांनीं त्याप्रमाणें आचार ठेवण्याला झटलं पाहिजे. तुम्हीच पहा, जे जे प्रचार आज जगांत आले आहेत. ते ते या तीनही स्थितींतून आले आहेत कीं नाहींत ! पहिल्यानं विचार, मग उच्चार; आणखी मग आचार. या तीनहीं स्थिति होऊन प्रत्येक मनुष्य तो आचार पाळूं लागला म्हणजे झाला तो प्रचार सुरू. तर मी म्हणतों जी गोष्ट आपल्या मनांत आली ती खरोखर आपल्याला जर चांगली वाटते आहे तर बोलून दाखवायला काय हरकत आहे ? आणि त्याप्रमाणें वागण्याचं धैर्य असल्यावर वागणूक तरी कां करूं नये ? माझा असा समज आहे कीं, **गणपतरावा-सारखे** लोक समाजाच्या सुधारणेला अगदीं अवश्य आहेत. ते जेव्हां खूप पुढें चला असें म्हणून लोकांना ओढतील तेव्हां लोक एक पाऊलभर पुढें सरकतील. तुम्ही ह्मणतां एकदम सुधारणा नको; **गणपतराव** म्हणतात हवी. पण होते आहे का ? ती कधीं व्हायचीच नाहीं. मग तुम्हांला याचा एवढा बाऊ कां वाटतो ? तुम्हीं, आह्मी, **गणपतराव** सगळे लोक समाजाच्या सुधारणेला सारखे उपयोगी आहों.

इतकें **विष्णुपंता**चें बोलणें होतें आहे, तोंच **नारोपंत** बाहेरून आले. तेव्हां कांहीं वेळानें सर्व मंडळी जेवावयास गेली. जेवतांना **नारोपंतां**नीं **नाना**ची विचारपूस केली. तेव्हां **नानानें** त्यांस आपली हकीकत सांगितली. **नारोपंत विष्णुपंतां**शी हल्लीं फारच सलगीनें वागूं लागले होते. कारण, **विष्णुपंता**वर त्यांचा अगदी पूर्ण भरंवसा होता. **विष्णुपंता**स असें वाटलें कीं, आपल्या मित्राला जी काय अडचण आली आहे ती **नारोपंता**स सांगून त्यांचा विचार घ्यावा. **नाना**स त्यानें जेवल्यावर आपला विचार कळविला, व **नारोपंतां**बद्दल **नाना**च्या मनांत फार आदर असल्यामुळें त्यासही तो विचार पसंत पडला व त्यानें **विष्णुपंता**च्या म्हणण्यास रुकार दिला. **विष्णुपंतानें नारोपंता**स **नाना**च्या लग्नाबद्दलची सर्व हकीकत सांगितली, व त्यांचाही त्या दोघांनीं जो बेत केला होता त्यासच रुकार पडला. त्या रात्रींही **विष्णुपंता**चें व **नाना**चें बऱ्याच गोष्टींसंबंधानें पुनः भाषण झालें. **नाना** रात्री तेथेंच निजला व सकाळींच उठून आपल्या बहिणीस भेटून व तिला **काशीनाथपंता**चें पत्र वाचून दाखवून कॉलेजांत परत आला.

कॉलेजांत आल्यावर दुपारचें जेवणखाण झाल्यावर त्यानें **काशीनाथ-पंतास** व **गणपतरावास** दोघांसही दोन पत्रें लिहिली. आदले रात्रीं जसें ठरलें होतें तसेंच त्यानें **काशीनाथपंताच्या** पत्रांत लिहिलेलें होतें. सबंध पत्रांत दांडगाईचा शब्द एक देखील न घालतां त्या मुलीशीं आपल्याला लग्न कर्तव्य नाहीं असें स्पष्ट न दाखवितां जितकें गरिबीनें होईल तितकें करून त्यानें आपला हेतु स्पष्टपणें कळविला होता **गणपत रावास** जें त्यानें पत्र लिहिलें होतें त्यांत हा सर्व मजकूर असून शिवाय इतर गोष्टीही पुष्कळ होत्या. **विष्णुपंतां**च्या वरीं गेल्याची हकीकत, **गोदावरी**च्या घरची हकीकत, आपल्या मनाची स्थिति, काका रागावून जाऊन त्यांनीं 'आपली व आपल्या आईची सोय पहा ' असें सांगितल्यास पुढें विचार काय तें, **गणपतरावा**च्या पत्रावरून आपल्या मनांत आलेले सर्व विचार, वगैरे सर्व कांहीं गोष्टी त्यांत होत्या. ज्यांची अंतःकरणें एक-मेकांस पक्कीं माहीत, एकाच्या मनांत विचार आला कीं तो दुसऱ्यास सांगितल्याखेरीज ज्यांना एक क्षणभरही व्हावयाचें नाहीं अशा मित्रांचीं पत्रें तीं ! त्यांत काय नसेल ? पृथ्वीवरील सगळ्यांत मोठें सुख मित्राला मनसोक्त पत्र लिहिण्याचें. ज्याजवळून आपणांस एकही गोष्ट चोरून ठेववत नाहीं अशा मित्रास पत्र लिहिणें हें जितकें सुखदायक असतें तितकी कोणतीही दुसरी गोष्ट सुखकर नाहीं. ' स्निग्धजनसंविभक्तं हि दुःखं सह्यवेदनं भवति' हें जसें खरें आहे तसेंच हेंही खरें आहे कीं स्नेह्याजवळ सांगितलेलें सुख दुप्पट होतें.

---

# प्रकरण १० वें.

## नानाचें पत्र.

**नानाचें** तें मोठ्या चतुराईनें लिहिलेलें पत्र वाचून **काशी** व **सीताबाई** यांच्या मनाला काय वाटलें असेल तें स्पष्टपणानें सांगावयास पाहिजे असें नाहीं. बिचाऱ्या **सीताबाईनें** तर तोंडाचा पट्टा जो चालविला तो कांहीं पुसूंच नये. " तो आतां अगदीं उर्मटच झाला, त्याचे हात आतां गगनाला पोहोंचले. आतां कशाला तो पर्वा करतो आहे

आमची ! पाहिलं ना हें, असं होतं बरं ! आधीं नान्या, नान्या म्हणून डोक्यावर चढवून ठेवलात, आतां लागला तो डोक्यावर मिरीं वांटायला ! आतां कशाला एवढं आश्चिर वाटायला पाहिजे ! रांडेच्यानो, निर्लज्जासारखं साफ किंहो लिहिलंन् माझ्या मनांतून लगीन करायचं नाहीं यंदां म्हणून ! छे ! छे ! छे ! बाई धन्य एकूण आतांच्या पोरांची, त्यांना कांहीं ताळच नाहीं ! बरं म्हणावं आमच्याशीं गांठ आहे. काय समजला आहेस तूं ? या गोपकाचे हे खेळ बरं हे सारे ! आमची कांहीं राहिली शोभा आतां ? " अशा तऱ्हेचे उद्गार पत्र वाचून झाल्यापासून एक लक्ष वेळां तिच्या तोंडून निघाले असतील ! **नानाला** व त्याच्या आईला पाहिजे त्या तऱ्हेच्या शिव्या तर तिनें इतक्या दिल्या कीं, कांहीं पुसूं नये. नवऱ्याला म्हणजे वगळला अशांतला कांहीं प्रकार नव्हता. केव्हां केव्हां त्याच्यावरही एखाद् दुसरा कोरडा उडवला जात असे. शेवटीं रात्रीं दोघां नवराबायकोंची एकांतीं गांठ पडल्यावर तर **काशीनाथपंतास** तिनें इतकें बोलबोलून घेतलें कीं तो अगदीं त्रासून जाऊन तिला म्हणाला:—"बरं मग आतां आपलं म्हणणं तरी काय ? "

**सीताबाई:**— माझं म्हणणं का ? माझं म्हणणं कांहीं नाहीं. त्या नान्याच्या आणि गोपकेच्या पुढें नारळ ठेवून आधीं साष्टांग घाला कसा. म्हणे म्हणणं काय ? मोठ्या सोपस्कारांनीं विचारायचं मला. अहो तर इतकी ज्यानं आपली शोभा केली त्याला म्हणायचं काय ? साफ म्हणावं आतां तुमचान् आमचा संबंध नाहीं. आपल्या आईच्या आणि आपल्या पोटापाण्याची तजवीज पहावी. अन् तसं जर नको असलं तर नाकडतोब इथें लग्नाकरतां यावं.

**काशीनाथपंत:**—आपण त्याला लिहिल असं म्हणजे चांगलं का दिसेल ? त्याला किती झालं तरी पोर म्हणतील, पण आपल्याला नाहींना म्हणणार ? आपल्याला हंसतील सारे लोक. जाऊं दे कीं, सांगावं **गिरिधरपंतांना** तें कांहीं जमून येत नाहीं म्हणून म्हणजे झालं.

**सीताबाई:**— अस्सं; मला वाटलंच होतं. त्यानं प्रत्यक्ष येऊन—जाऊंद्या कीं, मी कशाला बोलूं ? फार चांगलं ! बरं. असंच करा. उद्यां त्यांना असेंच सांगा. हो. सगळीकडून फजिती झाली पाहिजे. एकीकडूनच काय उपयोगी ? जा सांगा. आत्तां सांगा हं. उशीर कशाला ? खरंच मला मोठं नवल वाटतं माझ्या नशिबाचं. देवा, कशीरे मला या जन्माला घातलीस !

इतकें म्हणून ही सदय अंतःकरणाची चुलती स्फुंदस्फुंदून रडावयास लागली.

**काशीनाथपंत** तिच्या जवळ जाऊन समजूत करूं लागला, परंतु त्याचा हात तेव्हांच झिडकारून टाकून तिनें आपल्यास व आपल्या नशिबास शिव्या देण्याचा व अद्वातद्वा बडबडण्याचा चांगलाच सपाटा चालविला. **काशीनाथपंता**चें कांहीं चालेना. त्यानें आपल्याकडून जेवढे म्हणून उपाय करवले तितके केले, पण ते सर्व व्यर्थ ! त्यापासून कांहीं एक उपयोग झाला नाहीं. उलट तो जों जों विनवण्या करूं लागला तों तों ती अधिकाधिकच रडूं ओरडूं लागली. " माझं मेलीचं कोणी ऐकतच नाहीं. मी आपली एक बटकीसारखीच आहें " इत्यादि वाक्यांचा मंत्रोच्चार व मधून अगदीं भडभडून हुंदके एकसारखे चालले होते. कर्कशा स्त्रियांचें मोठें हत्यार काय तें रडणें, ओरडणें व स्वतःस व स्वतःच्या पोरांबाळांस हव्या तशा शिव्या देणें; त्यांतून नवरा बाईलबुद्ध्या असल्यावर मग तर विचारूंच नका. आपल्याला जें काय पाहिजे असेल तें कबूल करून घेतल्याखेरीज त्या कधींही रहावयाच्या नाहींत. स्वतःच्या इच्छेपुढें त्यांस कांहींही दिसत नाहीं. दुसऱ्याच्या तर काय, परंतु प्रत्यक्ष नवऱ्याच्याही मानापमानाची त्यांस चाड नसते. या स्वभावास अनुसरूनच **सीताबाई**चें वर्तन होतें. **नाना**चें पत्र आल्यापासून तिला दुसरें कांहीं दिसलें नाहीं. वास्तविक पाहतां तें पत्र मोठ्या चतुराईनें लिहिलेलें होतें. त्यांत उद्धटपणाचें अगर सहजगत्या माणसास राग येईल असें कांहींच नव्हतें; वस्तुतः पाहतां **काशीनाथपंता**स सकृद्दर्शनीं कांहींच वाटलें नाहीं; परंतु **सीताबाईनें** त्या पत्राचा तावडतोब हवा तसा अर्थ करून दाखविला व **काशीनाथपंता**चे डोळे उघडले. ' आमच्या मनांतून लग्न कर्तव्य नाहीं व आह्मी आपल्या विचारानें पाहिजे त्यावेळीं लग्न करूं ' हा त्यांतला इत्यर्थ तिनें क्षणार्धांत काढला. वास्तविक पहातां पत्रांत इतक्या जोरानें कांहीं लिहिलें होतें असें नाहीं. **नाना**च्या मनांतील आशय हा खरा, परंतु तो इतका उघडपणें कळून येईल अशा तऱ्हेनें व्यक्त केलेला नव्हता. **सीताबाई** पडली चाणाक्ष व त्यांतून **नाना**च्या बऱ्यावर ! तेव्हां मग काय ? अस्तु.

वर सांगितल्याप्रमाणें रडणेंकढणें चाललें असतां **काशीनाथपंत** बराच वठणीवर आला असें ध्यानांत आणून **सीताबाईनें** पुन्हां **नानास** चापून

पत्र लिहिण्याची गोष्ट काढली व आतां तर असें निक्षून सांगितलें कीं, " जर असं पत्र गेलं नाहीं तर मी या घरांत अन्न घेणार नाहीं, समजून ठेवा. " इतका जबर हुकूम व तो हुकूम न बजावल्यास अशी जबर शिक्षा सांगितल्यावर **सीताबाई** महाराणीसाहेबांच्या त्या बंदे नौकरानें कोणच्या तऱ्हेचें वर्तन ठेवलें असेल हें कांहीं सांगावयास पाहिजे असें नाहीं. लागलीच त्या घटकेस नव्हे त्या पळास— **काशीनाथपंता**नें पुढील खलिता खरडला. तो असाः—

" आशीर्वाद वि. आपणाकडून उद्धटपणानें लिहिलेलें पत्र आज येऊन पोंचलें. त्या पत्रावरून आपण दिवसानुदिवस किती शहाणे होत चालला आहां हें स्पष्टपणें दिसून आलें. आतां आमची शोभा फारच चांगली झाली. जर आपणांस असें कर्तव्य होतें तर आधींच आम्हांस कळवावयाचें होतें. तरी बरें, आमच्यावर मेहेरबानी केली. येथें येऊन ऐन लग्नाच्या वेळीं अंतर्पाट धरला असतां पळून गेलां नाहीं! आजपर्यंत वाढविल्या—वर्तवल्याचें हें फारच उत्कृष्ट चीज झालें. आपल्या हिताहिताकडे आम्हीं लक्ष पुरविलें. आपणास विद्या देऊन या पदवीस आणून पोंचविलें; या सर्वांची फेड एका टीचभर पत्रानें केली, व गांवांतही आमची फजिती होईल अशी तजवीज मनांत आणली हें पाहून मनास फारच धन्यता वाटली. आतां आपणास एवढेंच सांगणें आहे कीं, इतःपर आपला व आमचा कांहीं एक संबंध नाहीं असें समजून पुढील तजवीज करावी. इतके दिवस झाले याचें चीज फारच चांगलें केलें. अशाबद्दल भरपाईची पावती झाली. " इतकें पत्र लिहिलें व **सीताबाईस** वाचून दाखविलें, तरी तितक्यानें तिची शांतता झाली नाहीं. तिला आणखी किती तरी ल्याहावें व लिहिलेंच पाहिजे असें वाटलें व ती म्हणाली, " हें काय हें ? हें सारं मिळमिळीत झालं. चांगलं सणसणून लिहिलं पाहिजे. अगदीं स्पष्ट ल्याहावं. कीं, ' याउपर कांहीं आमच्याकडून तुला कांहींएक मिळायचं नाहीं. तूं आपली पोटापाण्याची सोय पहा! आपल्या आईलाही घेऊन जा. ' आपलं किनई सारंच करणं मिळमिळीत. त्या कारट्याला पत्र ल्याहायचं तें देखील नीट नाहीं. मग एखाद्या साह्यबाला ल्याहायचं असेल तेव्हां कसं हो असेल बाई ! "

**काशीनाथपंतः**—अग त्या पोराला काय कसं ल्याहायचंय्! इतकं लिहिलं पुरे झालं. तो कांहीं वावगा नाहीं. एवढं लिहिलं आहे, एवढ्यानंच तो उमजेल, आणखी तावडतोब पत्र पोंचल्याबरोबर येईल.

**सीताबाई**:—तर ! तर ! तर ! मुळीं इतका तरी वावगा आहे का तो ! या घरांत कोणी वावगा नाहीं, द्वाड नाहीं. जें काय वाईट म्हणून आहे तेवढं माझ्यांत भरलं आहे. तो जर कारटा इथें आला उगीच तर मी एक क्षणभर दिखील राहणार नाहीं. आतां तर तो मला दृष्टीसमोर देखील नको. काय होय तशी जाय ?

**काशीनाथपंत**:—अग, पण तूं कां त्याच्यावर एवढी संतापतेस ! वेडे-पणानं तो कांहीं तरी लिहून गेला असेल. आतां हें आपलं पत्र त्यानं पाहिलं म्हणजे त्याचं त्याला वाईट वाटेल आणखी तो लग्नाकरतांच येईल. मग तर जाईलना तुझा राग ?

**सीताबाई**:—माझा राग ? मीग बाई तिसऱ्याच ठिकाणीं कशाला रागावूं ? माझ्या कारट्यानं जर मला असं कधीं लिहिलं असतं तर एक त्याचा तरी प्राण घेतला असता, नाहीं तर मी आपला तरी दिला असता. कधीं राहिलें नसतें. पण पाहिजे कशाला मला ही उठाठेव ! तुम्ही आणखी तो काय पाहिजे तें कां कराना ! मी जर पुन्हां या कामांत—याच कामांतशी काय पण कश्शांत—बोलेन तर शपथ ! ही मी आपली चाललेंच.

असें म्हणून ती तट्कन जाऊं लागली. तेव्हां अर्थातच **काशीनाथ-पंतास** विनवण्या कराव्या लागून शेवटीं तिनें जे शब्द सांगितले ते शब्द पत्रांत त्याला लिहावे लागले. ते शब्द लिहून जेव्हां तें पत्र त्यानें तिला वाचून दाखविलें तेव्हां तिच्या मनाला जरासें बरें वाटलें. तरी ती रात्र धुस-पुसण्यांतच गेली.

**काशीनाथपंतास** पत्र लिहिलें त्याबरोबर **नानानें गणपतरावासही** एक पत्र लिहिलें होतें, त्यांत इतकेंच होतें कीं, लग्नासंबंधानें काकांस अशा अशा तऱ्हेचें पत्र लिहिलें आहे, त्यावरून ते काय ह्मणतात वगैरे बारीक शोध काढावा. मीं आपल्याकडून होतां होईल तों फार जपून परंतु आपला आशय जाऊं न देतां लिहिलें आहे तरी न जाणो काकू काय पाहिजे तो अर्थ करतील. तेवढा शोध ठेवून मला ताबडतोब कळवावें. हें पत्र वाचून **गणपतरावास** बरें वाटलें. कारण **सांजोरी**च्या सावका-राच्या मुलीशीं **नानाचें** लग्न होऊं नये असें त्याचें मत पक्कें होतें; पण **नानाचा** स्वभाव भिडस्त असल्यामुळें तो कदाचित् काकांचें हडसूनखडसून पत्र गेल्यास कबूल होईल ही त्यास भीति होती. ती भीति प्रस्तुतच्या पत्रानें किंचित् कमी झाली. **गणपतरावाच्या** मनांत ती **कृष्णराव** मुन्स-

फांची मुलगी **द्वारका** आपल्या मित्रास बायको मिळावी असें फार होतें, व त्याप्रमाणें होण्यास हें लग्न जितकें लवकर मोडेल तितकें फारच चांगलें असें त्यास पक्केपणीं वाटत होतें. तो पुढील पत्री तर **नाना**स असें स्पष्टपणें सांगणार होता कीं, कांहीं केल्या तूं त्या **गिरिधरपंता**च्या मुलीशीं लग्न लावण्यास कबूल होऊं नको. बेहेत्तर आहे कांहीं प्रसंग आला तरी. सध्यांची भीड एका घटकेची होईल; पण ती तुला यावज्जन्म जांचेल. तर हें बिलकूल उपयोगाचें नाहीं.

**नाना**च्या पत्राप्रमाणें कशी काय हालहवाल आहे हें पहाण्यासाठीं अर्थात् सकाळीं आठ नऊ वाजतां **गणपतराव काशीनाथपंता**च्या वरीं गेला. **सीताबाई** दारांतच होती, ती त्याच्याकडे अगदीं तिरसटपणानें पाहूं लागली. तिच्या त्या कपाळाला आंठ्या आणखी चेहऱ्याचें आकुंचन हीं त्यावेळीं पाहण्यासारखीं होतीं. जणूं काय **गणपतरावा**नें तिचें सर्वस्वीं घोडें मारिलें होतें. तिच्या मनांतला आशय हा कीं आपला हा असा चेहरा पाहून **गणपतराव** आपल्यास "कां आज अशा कां उभ्या ?" असें विचारील आणि मग आपण अगदीं भडभडून बोलून टाकूं. **गणपतरावा**चीं **नाना**स पत्रें जात असतील हें तिला पक्कें ठाऊक व आपण असें बोललों म्हणजे तो तें सर्व **नाना**स कळवील आणि त्याला सर्व प्रकारानें वाईट वाटेल. तिच्या या सर्व तर्काप्रमाणें घडून आलेंच. **गणपतरावा**नें तिला अपेक्षित प्रश्न विचारला, व त्या प्रश्नाबरोबर तिनें तिरसटपणाचें ठराविक उत्तर दिलें. तें उत्तर ऐकून **गणपतराव** तसाच पुढें जाऊं लागला, परंतु ही महामाया पुढें बोलूं लागली, व जितकें म्हणून तिच्या पोटांत रात्रीपासून डांचत होतें तितकें तिनें सारें ओकून टाकलें. एक कणभरही मागें ठेविलें नाहीं. **गणपतरावा**नें तिचें कांहीं मधून मधून सांत्वन केलें, कांहीं तुम्ही अशा वाईट मुलीशीं त्याचें लग्नच करूं नका असेंही सुचविलें, पण त्याचा तेथें कांहीं उपयोग झाला नाहीं हें काय सांगावयास पाहिजे ? ती उलट त्याला "तुम्ही त्यांतलेच, त्याच्या बाजूचेंच बोलणार" असें म्हणाली. तिला आपलें तें खरें असें वाटत होतें. शेवटीं रात्रीं पत्र काय लिहिलें तें देखील तिनें त्याला सांगितलें व "खरं खोटं चला दाखवतें" असें म्हणून त्यास **काशीनाथपंता**कडे घेऊन गेली. आपला सर्व हेतु बराच किंबहुना पूर्णपणें सिद्धीस गेला असें पाहून **गणपतरावास** समाधान वाटलें. **काशीनाथपंत** स्वस्थ पडला होता. हीं दोघें खालून वर त्याच्याकडे जाण्याबरोबर त्यानें

**गणपतरावास** या बसा वगैरे म्हटलें. रात्रींचें पत्र टपालांत टाकण्याकरितां म्हणून जवळच ठेविलें होतें तें **सीताबाईनें** झटकन् उचलून **गणपतरावाच्या** हातीं दिलें व तोंडानें पुन्हां त्यांतील मजकुराचा मंत्रोच्चार सुरू केला. **काशीनाथपंतास** हें तिचें करणें बरोबर वाटलें नाहीं, परंतु **गणपतरावाच्या** हातीं गेलेलें पत्र त्यास माघारीं घेतां आलें नाहीं. **गणपतरावानें** तें पत्र पाहिलें न पाहिलेंसें करून मजकूर ध्यानांत आणला, व **काशीनाथपंताजवळ** तें पत्र टाकलें. **सीताबाईनें नानाचें** आलेलें पत्रहि त्यास दाखविलें, तेंही त्यानें पाहिलें; **सीताबाईची** टळळी चालूच होती. त्या पत्राचा अर्थ काय असावा असें ती त्यास विचारूं लागली व त्यानें बोलण्याची वाट न पाहतांच नवऱ्यास जो अर्थ समजला नाहीं तो आपल्यास समजला असें दाखविण्यासाठीं आतांपर्यंत पंचवीस वेळां त्याचा उच्चार झाला होता. तरी पुन्हां पुन्हां मोठमोठ्यानें आपण काढलेला अर्थ ती सांगूं लागली. मधून मधून तिनें त्याला त्याचें मत विचारावें परंतु त्याला बोलूं न देतां आपली टकळीच सारखी सुरू ठेविली होती.

शेवटी जराशी थांबली असें पाहून **गणपतरावानें** हलकेच म्हटलें: " तुम्ही म्हणतां असें तर मला यांत कांहीं दिसत नाहीं. "

मग काय विचारतां ? आधींच तापलेली **सीताबाई** या बोलण्यानें नुसती भडकून गेली. तिला आतां अगदीं ताळ नाहींसा झाला. ती **गणपतरावास** म्हणूं लागली: " तुम्ही त्याचा कड घ्यालच. तुम्हांला कशाला असा अर्थ वाटेल ? तुम्हींच त्याला लिहिलं असेल असं असं लिही म्हणून. आमचें वाईट होईल तेवढं तुम्हांला बरंच वाटायचं. " एक ना दोन ! तिची वाचाळपंचविशी आतां सारखी चालू झाली. **सीताबाईचा** स्वभाव **गणपतरावास** पक्केपणीं ठाऊक असल्यामुळें तिच्या या अशा बोलण्यानें त्याला राग किंवा खेद न वाटतां उलट मनांतल्या मनांत हंसूं मात्र आलें. **काशीनाथपंतानें** तिला थोडंबहुत दाबलें. कारण त्याला तें तिचें बोलणें बरें वाटलें नाहीं. परक्याच्या देखत नवऱ्यानें आपला असा अपमान केला असें पाहून ती फारच संतापली व त्याला अद्वातद्वा बोलत व माना वेळीत वेळीत ती खालीं चालती झाली.

**सीताबाई** खालीं गेल्यानंतर **गणपतराव** व **काशीनाथपंत** यांचें थोडेंबहुत बोलणें झालें. **काशीनाथपंतानें** त्यास सर्व हकीकत सांगितली व **नानाचें** हें वर्तन अगदीं कृतघ्नपणाचें आहे. आपल्याला त्याचा मोठा

संताप आला आहे असें दाखविलें. तें पत्र निवळ संतापांत लिहिलें असून **नानानें** त्याचा नीट विचार करावा असेंही पण त्याला **गणपतरावानें** सुचवावें असें सुचविलें. **नानाचें** पत्र संताप येण्याजोगेंच असून आह्मीं म्हणूनच इतक्या शांतपणाचें उत्तर पाठविलें असेंही दाखविण्याचा त्यानें यत्न केला. एकंदरींत आपणाकडे कांहीं दोष नसून सर्व दोष **नानाचा** आहे असें दाखविण्याचा त्याचा हेतु. **गणपतरावास** तें सर्व कळलें.

थोड्या वेळांत **गणपतराव** आपल्या घरीं गेला. घरीं गेल्यापासून त्याच्या मनांत सर्व सकाळच्याच गोष्टी घोळत होत्या. आधींच त्याला विचार करण्यास कांहीं नको असे, आणखी त्यांत प्रिय मित्राच्या भावी स्थितीविषयीं विचार. मग काय विचारतां! दोन प्रहरची वेळ कशी तरी गेली; परंतु संध्याकाळीं हिंडत असतां व रात्रीं अंथरुणावर पडल्यानंतर त्याच्या डोक्यांत दुसरें कांहीं नव्हतें. **नाना, नानाचें** लग्न, त्याची चुलती, चुलता यांवर काय तो विचार करतां करतां देशाच्या सद्यःस्थितीसंबधानेंही विचार त्यावरून त्याच्या डोक्यांत अर्थातच आले. त्याला असें वाटूं लागलें कीं, वेहेत्तर आहे **काशीनाथपंतानें** घातलेला धाक अमलांत आणला तरी, पण **नानानें** या वेळी अणुमात्र माघार घेऊं नये. लग्न करावयाचें तें अगदीं मनाजोगे करावें. या सांजोरीच्या मुलीशी मुळींही लग्न लावण्यास कबूल होऊं नये. आमच्या देशांत जर चांगली लग्नें व्हावयाला पाहिजे असतील, तर ज्यांच्या हातून होईल त्यांनी या कामांत लोकांची किंवा वडील माणसांची अगदीं भीड म्हणून ऐकूं नये. असे विचार मनांत येऊन त्यानें **नानास** होतां होईल तों आपल्या मताप्रमाणें वागावयाला लावण्याचा निश्चय केला. परंतु हा निश्चय होतां होतां त्यास अशी एक शंका आली कीं, न जाणों आज सकाळचें **काशीनाथपंताचें** पत्र जाऊन पोहोंचलें असतां **नानाचा** विचार बदलून तो सपाट्यासरसा निघून येईल; आणि तो एकदां येथें आल्यानंतर मग लग्न मोडणें मोठें दुस्तर होईल. तेव्हां असा प्रसंग जितका न होईल तेवढा चांगला. आतां हा प्रसंग टाळावा कसा ? मित्रप्रेम हें कांहीं विलक्षण असतें असें जें कवींनीं म्हटलें आहे तें खोटें नाहीं. **नानावर** येणारें संकट, पण **गणपतरावास** त्या रात्रीं झोंप आली नाहीं. त्याच्या बायकोनें त्यास आपण उदासीन कां म्हणून विचारलें तेव्हां त्यानें तिला ही सर्व हकीकत सांगितली. तिने आपापल्या परीनें कांहीं युक्त्या सुचविल्या; आणखी पुष्कळ वेळपर्यंत विचार झाला. दोघांचें बोलणें पहांटपर्यंत चाललें होत. शेवटी

एक युक्ति बरीशी वाटून पुढील विचार ठरला. **गणपतरावा**स युक्ति सुचली ती आपण स्वतःच दुसरे दिवशीं पुण्यास निघून जावें व **नाना**स उपदेश करून इकडे न येऊं द्यावें, ही होय. शिवाय सुटीचे दिवस संपत आले असून ज्या संकटामुळें त्याला घरीं येणें भाग पडलें होतें तें संकटही बऱ्याच अंशीं निवारण झालें होतें. आतां परत जाण्यास कोणत्याही तऱ्हेची हरकत नव्हती. उलट **नाना**वर आलेलें संकट निवारणें आपलें कर्तव्य आहे असें त्यास पक्कें वाटत असल्यामुळें त्याच्या मनाचा अगदीं निश्चयच झाला. न जाणों **नाना** आहे भिडस्त; तो आपल्या काकाच्या धमकावणीला घाबरून नशिबीं असेल तसें होईल असा दैववाद करून धांवत यावयाचा. तेव्हां आपण पत्राच्या पाठोपाठ जाऊन त्याचा निघण्याचा बेत झाला असल्यास अगदीं मोडून काढावा. हा विचार त्यानें आपल्या बायकोस कळवितांच प्रथम दर्शनीं तिनें त्यास रुकार दिला नाहीं.

" एक चांगलं लांबलचक पत्र ल्याहावं म्हणजे झालं. स्वतांच जाऊन तें काय करायचंय् ? कांहीं **नाना**भावजी इतके का वेडे आहेत ? "

" हें बघ तुला एकदां सांगितलंना कीं त्याचा कांहीं नियम नाहीं. तो फार गरीब, भिडस्त आहे म्हणून ! तें **काशीनाथपंतांचें** पत्र वाचून पाहिलं म्हणजे त्याला अतिशय वाईट वाटेल, आणखी त्या झटक्यांत तो निघून देखील येईल. मला तर आतां असं मनांत यायला लागलं आहे कीं, पत्र त्याला आज सकाळीं अकरा वाजतां पोहोंचेल आणखी तें पोहोंचलं म्हणजे कदाचित् तो रात्रीच्या गाडीला निघेल. तर तसं होऊं नये म्हणून मी त्याला जातां जातां तार करणार आहें, कुठल्यातरी स्टेशनावरून ' मी येतों आहें तूं येऊं नको ' म्हणून. इथें कुणाला कळूं द्यायचं नाहीं मात्र. "

" माझा कांहीं आग्रह नाहीं इथें राहिलंच पाहिजे म्हणून. पण मला वाटतं कीं, आणखी रहाणं होईल तेवढं बरंच. "

" तर तर. अन् पहिल्यानदां मुळींच नव्हतो येणार तेव्हां. तुमचं बायकांचं हेंच तर मोठं असतं. "

" नाहीं बाई. माझं कांहीं म्हणणं नाहीं. भाऊजींच्या ह्या संकटापेक्षां मला माझं हें जास्ती का आहे ? खरंच भाऊजींना जसं आतां नाहीं होय म्हणायला सांपडत आहे, तसं बायकांना कांहीं आहे का ? बाप जिथें लोटतील तिथें त्यांना गेलंच पाहिजे. पुरुषांचं आपलं बरं. "

" अग पुरुषांच तरी काय बरं आहे ? आपलं तुमच्यापेक्षां एक रतिभर बरं, झालं ! नाहीं तर मुलांचीं तरी लग्न होतांना कोण त्यांना विचारतो आहे ? जशी बाप बायको करून देईल तशी नांदवली पाहिजे. ज्याचं एखाद्याचं नशीब चांगलं असेल त्याला त्यांतल्या त्यांत आपल्यासारखं रत्न मिळतं. पण सगळ्यांचींच कुठें नशिबं चांगलीं असतात ! "

" हो ? मी रत्न का ? इश्श मेलं काय पण रत्न ! आतां घरांत दिवे म्हणून लावायला नकोत. आपलं आवडवून घ्यायचं झालं. "

" तूं आपल्या मतानं नसशील एक रत्न, पण आह्मांला तर वाटते आहेसना ? "

" ज्याचं त्याला आवडलं मग दुसऱ्याचं काय गेलं बाई ! पण हें खरंच ना ? का आपली मामंजींनीं करून दिली म्हणून कशी तरी नांदवायची ? "

" कांहीं अंशीं तसंय् खरं. एखाद् दिवशीं ल्याहाय् वाचायला सांगितल्या वर ऐकलं नाहीं म्हणजे मग तसंय् वाटायला लागतं. "

" मी ऐकत नाहीं म्हणून इतकं का वाईट वाटायचं ? हें काय बरं हें असं ? मला आतां सांगायचं कोणतं बुक वाचूं तें ? मला कांहीं वाचायला येत नाहीं, वाचावंसं वाटत नाहीं असं नाहीं, पण मेली लाज वाटते. अजून असं वाटतं कीं बायकांनी मेलं काय करायचंय् वाचून ? "

" आतां मात्र शिकस्त झाली बोआ तुझ्यापुढें. तुला हज्जारदां सांगितलं ना असं वाटूं देऊं नको म्हणून ? असं जर तूं म्हणशील तर मग पुढलं तें इंग्रजीन् बिंग्रजी कसं होईल ? "

" बरं तर मग आतां अगदीं वाटूं द्यायची नाहीं बरं का. रोज अगदीं नेमानं वाचीत जाईन. कोणतं बुक वाचूं ? तें पांडवप्रतापाचं वाचूं ?"

" काय करावं मराठींत तुमच्यासारख्यांना वाचायला बुकंच नाहींत चांगलींशीं. हेंच इंग्रजी शिकतीस थोडंसं म्हणजे होती कांहीं पंचाईत ? "

" हो सगळा आपला उतावळीचा कारभार. मराठी झालं पाहिजेना आधीं ? मला दिखील वाटतं इंग्रजी शिकावंसं पण काय बरं करावं ? आपण ती त्या दिवशीं त्या पिंवळ्या बुकांतली " नवराबायको " ची गोष्ट सांगितली ती, ती ऐकून माझ्या बाई अंगावर कांटा उभा राहिला. पण आपण एकदां ती वाचावी असं आपलं मनांत घोळूं लागलं. खरंच गोडू वन्संची आठवण होते ती गोष्ट आठवली कीं- "

" हंः त्याला काय इलाज आहे ! बिचारीची दुर्दशा आहे एवढं खरं. बरें तें असो. आम्ही आतां १०।११ वाजल्यावर जाणार. तीं तिथें पांचचार बुकं आहेत, तुझ्याजवळ पोथ्या आहेत, काय पाहिजे तें वाचीत जा. आणखी मला कांहीं चांगलीं चांगलीं बुकं मिळालीं तर मी पुण्याहून पाठवून देईन. रोज वाचीत जा म्हणजे झालं. पण आपला समाचार कसा कळायचा ? तुला हजारदां सांगितलं कीं काय होईल तें होवो निदान आठ दिवसांनीं एक पत्र वेडंवांकडं जसं येईल तसं खरडावं आणखी टाकावं. पण तेवढं कांहीं तुझ्याच्यानं होत नाहीं ना ? आतां काय म्हणावं तुला ?"

"मी गडे हट्टानं लिहीत नाहीं असं का आपल्याला वाटतं ? मला वेड्यावांकड्या अक्षराची लाज वाटते, दुसरं कांहीं नाहीं. त्या **यमुनाबाई**चं अक्षर कसं बरं आहे आपण दाखवलं तें ! तसं जर माझं असतं तर मीं रोज दहा दिखील पत्रं पाठविलीं असतीं."

" अग पण एकदम का येत असतं ? हलके हलके येईल. तसं म्हणशील तर त्या **यमुनाबाई**ला बरंचसं इंग्रजी देखील समजतं. अहाहा ! तें बरीक जोडपं खरं ! मीं एकदां सहज त्या **विष्णुपंता**ला विचारलं कीं, "कांहो तुमचंन् तुमच्या बायकोचं कधीं भांडण होतं ?" त्यानं तेव्हांच सांगितलं कीं आम्हांला एक दिवस दिखील भांडलेलं आठवत नाहीं. याचं नांव नवराबायको. तुला हजारदां सांगितलं कीं, तूं त्या **यमुनाबाईं**ना पत्र पाठवून त्यांची ओळख करून घे. पुण्यास माहेरीं जातेस तेव्हां त्यांच्या घरीं जायला यायला ठीक पडेल. पण ऐकतेस कुठें ? हेंच तर मला आवडत नाहीं."

" बरं आतां मला एक दहा बारा पाकिटं पत्ता घालून देऊन ठेवायचीं. मी अगदीं नेमानं पत्र घालीत जाईन आं ? अगदीं अगदीं विसरणार नाहीं. पाहूं बरं होतं का नाहीं तें. कांहीं मी कांहीं माणूस नाहीं वाटतं ?"

" म्हटलं कोणीं आहे म्हणून !"

" इश्श मेलं, असं काय तें बोलावं ?"

" माणूस आहांत असं सिद्ध करून दाखवा, मग नाहीं आह्मी असं बोलणार."

" बरें. मग आत्तांच कशाला बोलूं ? अग बाई, पण तें पाहिलं का खिडकीकडे ? किती तरी उजाडलं हें ! आज कीं नई आतां जाण्याचं

कसें होईल तें होवो. साऱ्या रात्रभर जागरण आणखी आतां अहोरात्र गाडींत बसायचं. कशी पण आजची रात्र गेली ! जातें आतां मी. ”

“ काय इतक्यांत जाऊन करायचं ? माझ्या या ब्यागेंत कपडे बिपडे भरायचे आहेत ते कोण भरील ? ”

“ कोण म्हणजे मी भरीन. असं काय तें विचारावं ? पण अजून घरांत जाऊन मामंजींना, सासूबाईंना, आईंना विचारायचं आहेना ? तें होईपर्यंत मी सतरांदां तयारी करीन. अगदीं इकडे बघायला दिखील नको आपल्याला. पण गडे माझीं जशीं पत्रं जातील, तशीं मला नकोत का यायला ! ”

“ दम धर त्याची देखील तजवीज करीन. प्रसंगीं लाजबीज गुंडाळून ठेवून तुझ्या नांवावर देखील पत्र पाठवीन. ”

“ इश्श. असं नको गडे, उगीच घरांतल्या माणसांना वाईट वाटेल. मला आपलं पत्र नाहीं आलं तरी चालेल. मी आपली पाठवीत जाईन. आणखी मामंजींना येतील त्याच्यावरून मला आपला समाचार कळत जाईल. ”

“ पाहूं तें. त्याचं काय ? ”

“ बरं मग जाऊंना आतां ? ”

“ उजाडलंच का अगदीं ? ”

“ पहा मी सांगतें तें खरं का खोटं. मला का हौस का आहे लवकर जायची ? या दिवसांत मेल्या रात्री कशा तेव्हांच निघून जातात ”

“ धरून ठेवाव्या अशा म्हणजे कशा जातील ! ”

“ हें काय हें ! सासूबाई काय म्हणतील इतक्या उशीरानं गेलं म्हणजे ? जाऊं द्या गडे आतां. ”

याप्रमाणें बोलणें होऊन **गणपतराव** व त्याची बायको दोघेंही उठलीं. **गणपतरावानें** वडिलांस, आजीस व आईस सर्वांस आपला जाण्याचा बेत सांगितला. हा एकाएकीं झालेला बेत ऐकून त्यांस थोडेंसें आश्चर्य वाटलें परंतु सुटीचे दिवस अगदीं संपत आले आहेत हें पाहून व **गणपतरावाची** उत्कट इच्छा पाहून कोणी त्याला जाऊं देण्यास फारसे आढेवेढे घेतले नाहींत. म्हटल्याप्रमाणें **गणपतरावाच्या** बायकोनें त्याची जाण्याची सर्व तयारी करून दिली व तयारी करीत असतां **गणपतराव** एकटाच आहे

असें पाहून किंचित् अश्रूंनीं भरलेल्या नेत्रांनीं त्याजकडे पाहून हंसत हंसत म्हटलें: "मला आशा होती कीं मामंजी एक दिवस तरी ठेवून घेतील म्हणून."

**गणपतराव**:–हं हं ! तर मग कितीही मोठं काम असलं तरी आम्ही एक दिवस आणखी रहावं असं मनांतून वाटत होतं आं ?

" असं नाहीं कांहीं. पण आपलं उगीच. "

मग तयारी वगैर होऊन जेवणखाण करून इतर सर्वांचा शब्दांनीं व शब्दांपेक्षांही ज्यांत अत्यंत अर्थ भरला होता अशा नेत्रांनीं आपल्या प्रिय-पत्नीचा निरोप घेऊन **गणपतराव** स्टेशनावर गेला.

---

# प्रकरण ११ वें.

## नानाची त्रेधा.

कवि काय, किंवा कादंबरीकार काय, त्यांना कांहीं विषय अनादिसिद्ध व अखंड असे मिळालेले आहेत. त्यांवर कितिही कसेंही ल्याहा. ते विषय अपुरेच राहणार. रमणीयतेचें जें खरें स्वरूप कीं, क्षणोक्षणीं नवेपणा भासला पाहिजे, तें स्वरूप त्या विषयांत पूर्णपणें दिसून येतें. 'प्रेमा' वर आजपर्यंत लहानमोठ्या लाखों कवींनीं व कादंबरीकारांनीं हवें तितकें लिहिलें आहे; पण त्याचा कोणास वीट म्हणून आला नाहीं. जो तो अजून काय किंवा पुढेंही काय, त्यावरच लिहिणार. मग तें प्रेम पतिपत्नीचें असो, मित्रामित्रांचें असो, वस्तुवस्तूंचें असो किंवा आणखी कोठलेंही असो. **नाना गणपतरावास** आणण्यासाठीं स्टेशनावर गेला होता. गाडी आल्यावर त्या दोघांची गांठ पडण्याबरोबर दोघांच्या मनांत प्रेमाचे उमाळे येऊन एक क्षणमात्र त्यांची दोघांची स्थिति कशी झाली असेल याचें शब्दचित्र काढण्यास शेक्सपिअर व वर्णचित्र काढण्यास होगर्थ हेच पाहिजे होते. क्षणमात्र परंतु तेवढ्यांत त्या दोघांच्या मनांत किती तरी विचार आले असतील. एकमेकांस विचारण्यासाठीं किती तरी प्रश्न तोंडाशीं आले असतील ! पण शेवटीं एकही बाहेर न येतां एकमेकांकडे किंचित् हंसतमुख होऊन दोघांनीं अगदीं एकाच वेळीं 'कसं काय ?' हा प्रश्न कसा

विचारला असेल, याचें वर्णन माझ्यानें मुळींच करवत नाहीं. ज्यांस तसा अनुभव असेल त्यांनींच जाणावें. इतरांस त्याची कल्पना आणून देण्यासाठीं खटपट करणें म्हणजे व्यर्थ खटपट करण्यासारखें आहे.

स्टेशनावरून बाहेर येऊन घोडयाच्या गाडींत बसेपर्यंत दोघांच्या तोंडून एकही शब्द निघाला नाहीं. संधि साधेल तेव्हां ते दोघे एकमेकांकडे पहात मात्र. गाडींत बसल्यानंतरही पांच चार मिनिटें अशाच रीतीनें गेलीं. त्यांतील प्रश्न इतर कांहीं बाहेर येईना म्हणून कांहीं तरी होते; पण थोडयाच वेळांत **गणपतरावानें**, "कां ? आमची तार केव्हाशी पोहोंचली, कांहीं उपयोग झाला का तिचा ?" असा प्रश्न केला.

**नाना**:—उपयोग म्हणजे ? उपयोग किती तरी झाला ! मी निघणार होतों अगदी जायला. पण तुझी तार जेव्हां आली तेव्हां मग म्हटलं हा जेव्हां इतका येतो आहे आणखी यानं तार पाठवली आहे, तेव्हां आपण याची गांठ घेतल्याखेरीज कांहींएक करूं नये.

**गणपतराव**:—मला तें वाटलंच होतं. अन् म्हणूनच मीं तावडतोब मधें त्या स्टेशनावर उतरून तार ठोकली. कसं काय, काकांचं पत्र काय म्हणतं ?

**नाना**:—काय म्हणायचंय् ! आमचं लग्न करणार ते त्या पोरीशीं आणखी काय ? नसली आमच्या नशिबी चांगली बायको तर काय करायचं ?

**गणपतराव**:—हं. अस्सं. मला वाटलंच कीं तें पत्र वाचून ही स्वारी असं करणार म्हणून. पण **नाना**, काय पाहिजे तसं जरी काकांनीं लिहिलं तरी तूं म्हणून कांहीं त्यांच्या म्हणण्याला कबूल होऊं नको. माझं एवढं ऐकच. अरे, तुझी वहिनी दिखील म्हणाली कीं भाऊजींनी अगदीं ऐकूं नये या कामांत कोणाचं म्हणून.

**नाना**:— अरे, तूं म्हणतोस ही सारी गोष्ट खरी. पण मीं जर असं केलं तर लोक मला पाजी नाहीं का म्हणणार ? ते म्हणतील काय हो हा पोरगा ! आजपर्यंत काकाच्या इथें वाढला संवरला, पण आतां त्यांचंच ऐकेनासा झाला. बी. ए. झाला मात्र तों फुटलीं त्याला शिंगं ! आधींच शिकलेले म्हणून आह्मांला शिव्या आहेतच, आणखी त्यांत हें असं, मग काय पाहिजे ?

**गणपतराव**:— मी तुला आधीं एवढं विचारतों कीं, या क्षणभरच्या भिडेनं तूं आपल्या जन्माचं का मातेरं करून घेणार ? तुझ्यावर तर आमची सारी भिस्त. तूंच जर असं करूं लागलास; तर कसं व्हावं ?

या **गणपतरावा**च्या प्रश्नावर **नाना**कडून कांहीच उत्तर आलें नाहीं. तो आपला समोर रस्त्याकडे पाहून विचार करूं लागला. त्याला थोडाबहुत तसाच विचार करूं द्यावें म्हणजे बरें होईल असें वाटून **गणपतरावानें**ही कांहीं वेळ स्तब्ध बसण्याचाच विचार केला. **नाना**च्या मनांत आदले दिवशीं पत्र आल्यापासून अनर्थापात विचार घोळत होते. आपला व दुसऱ्या दोघांचाही संतोष रहाण्याजोगी वर्तणूक असावी ही गोष्ट खरी, परंतु जी गोष्ट आज त्याच्यापुढें होती त्या गोष्टींत हें कसें साधावें, हें त्याला मोठें गूढ पडलें होतें. जर आपला संतोष पहावा तर काका व काकू यांची मर्जी जाते आणि व्यर्थ लोकनिंदाही अंगावर येते. जर आपला विचार एकीकडे ठेवून वडील माणसांचीच मर्जी राखावयाची असा निश्चय केला, तर आपल्या पुढील आयुष्यक्रमाकडे जाणूनबुजून डोळेझांक करून सुखांत माती काल-वल्याप्रमाणें होतें. हे विचार नाना स्वरूपांनीं त्याच्या दृष्टीसमोर येत; परंतु निकाल म्हणून होईना. एकदां वाटे इतकी काकांची व काकूंची इतराजी करून घेण्यापेक्षां मुकाट्यानें जाऊन होईल तसें होऊं द्यावें हें बरें; व असा विचार येण्याबरोबरच रात्रीस निघून जाण्याचा त्यानें निश्चय केला होता, पण **गणपतरावा**ची तार आली तेव्हांपासून विचार करण्यास अवधि मिळाल्यामुळें त्याच्या मनाचा अगदीं गोंधळ उडून गेला. जसा एखादा मनुष्य पोंहत पोंहत जाऊन विस्तीर्ण पात्राच्या नदींत अगदीं मध्यावर गेला असतां बुडण्याच्या भीतीनें घाबरून जावा आणखी मग त्याला इकडे जाऊं कीं तिकडे जाऊं असें होऊन जातें, तद्वत् त्याची स्थिति झाली होती. त्यास त्या वेळीं कोणी हात देऊन कोणत्या तरी बाजूस ओढावयास पाहिजे होतें. **गणपतरावा**चें येणें त्याला थोडेंबहुत उपयोगीं पडलें, व त्याचा वरील प्रश्न तर त्यास प्रश्न करणाऱ्यांच्या बाजूकडे वळवूं लागला. तो विचारांत गढून गेला आहे असें पाहून **गणपतराव**ही कांहीं वेळ मुद्दाम उगीच बसला हें आतां सांगितलेंच आहे. परंतु हा बराच वेळ उगीच बसला आहे असें पाहून **गणपतरावानें** त्याला पुन्हां प्रश्न केला.

" काय रे बोआ, उगीच कां बसलास ? मी तुला आपला एक प्रश्न विचारतों त्याचं मला योग्य उत्तर दे म्हणजे मग माझं कांहीं एक राहिलं नाहीं. हें बघ, मनुष्यानं दुसऱ्याला सुखी राखण्याकरितां आपलं नुकसान किती आणखी कुठपर्यंत तरी सोसावं ? लोकांना एक क्षणभर समाधान देण्याकरितां आपण आपल्या जन्माच्या सुखाचं मातेरं करावं कीं काय ?"

एवढा प्रश्न विचारून **गणपतराव** पुनः उगीच बसला. **नाना** कांहीं

बोललाच नाहीं. त्यानें **गणपतरावा**चा प्रश्न सगळा ऐकला, पण त्याच्यावर त्याला उत्तर कांहींच सुचेना. तोच प्रश्न तर त्याला आज जवळ जवळ आठ दिवस आणि विशेषतः आज दोन दिवस घोंटाळ्यांत घालीत होता. त्याचें उत्तर क्षणार्धांत त्या बापड्यानें कसें द्यावें ?

नीतिशास्त्रदृष्ट्या पहातां अजून हा प्रश्न जेथल्या तेथेंच आहे आणि अजून किती दिवस असाच राहील कोणास कळे ? आधीं स्वसंतोष कीं आधीं परसंतोष ? एकदम दोन्ही ठेवणें म्हणजे मोठें दुरापास्त किंबहुना कित्येक गोष्टींत अगदी अशक्य. मग एकाकरितां दुसऱ्यानें किती गम खावी आणि दुसऱ्यानें एकाकरितां किती नुकसान सोसावें ? हा प्रश्न मोठा बिकट आहे. स्वपरसंतोषाची सांगड ज्या दिवशीं बरोबर बसेल तो दिवस जगाच्या पूर्ण स्थितीचा पहिला होय.

पण जाऊं द्या. या नीतितत्त्वांच्या बिकट चक्रव्यूहांत न सांपडतां आपण आपल्या प्रस्तुताकडे वळूं.

आणखी कांहीं वेळ गेला. तों गाडीही कॉलिजांत आली. गाडी कॉलेजांत येण्याबरोबर स्नेही मंडळी वगैरे जवळ जमल्याकारणानें या दोघांचें बोलणें तितकेंच राहिलें. **गणपतरावा**च्या तर मनांतूनही ती गोष्ट गेली. स्नेह्यासोबत्यांशीं बोलत व इकडल्या तिकडल्या गोष्टी सांगत त्यांचें जेवणखाण झालें. जेवणखाण झाल्यानंतरही बराच वेळ गप्पा मारण्यांत व 'वाचनालयांत' वर्तमानपत्रें, मासिक पुस्तकें वगैरे चाळण्यांत गेला. इतकें चाललें होतें खरें व नाना या सर्व वेळीं **गणपतरावा**बरोबर व आपल्या इतर मित्रांबरोबर मधून मधून बोलत होता खरा, परंतु त्याचें चित्त मुळींच ठिकाणीं नव्हतें. बरें तो म्हणजे आपल्या लग्नाच्या गोष्टीबद्दलच विचार करीत होता अशांतलीही गोष्ट नाहीं. त्याचें मन कशांतच नव्हते. तो उगीच एखादें पत्र इकडलें तिकडे करी. मधेंच वाचल्यासारखें करी. कोणीही विचारलें तर कांहीं तरी उत्तर देई. सारांश, येथून केव्हां आपण जाऊं असें त्याला झालें होतें, असें दिसलें. **गणपतरावा**च्या नेहमींच्या स्वभावाप्रमाणें त्याच्या ही गोष्ट मुळींच लक्षांत आली नाहीं. तो नादी ज्यांत रमेल त्यांतच रमे. त्यांतून वाचनालयांत असला म्हणजे मग तर काय बोलायची सोयच नाहीं. एकदां स्वारी रमली कीं रमली. मग मागचा पुढचा विचार त्याच्या स्वप्नींही नसे; आणि या वेळीं विशेष गोष्ट ही होती कीं त्याच्या हातांत जें एक मासिक पुस्तक होतें, त्याची अनुक्रमणिका पहात असतां त्याला एक फारच चम-

त्कारिक गोष्ट आढळली ती ‘ सिंडेरेला अथवा सुखकर लग्न ’ या मथळ्या-खालीं होती. ती पहाण्याबरोबर त्यानें त्या मासिकपुस्तकाचें तें पान उघडून पाहिलें व पांच सात पानें चाळून एकदम **नाना**स हंसतहंसत तो म्हणाला, “ **नाना, नाना**, हीं पाहिलीस का यांत गोष्ट आहे ही. सुखकर लग्नाची **गोष्ट** आपल्याला तर अवश्य वाचली पाहिजे या वेळीं. इतर लोकांना त्यांच्या बोलण्याचा व हंसण्याचा अर्थ बिलकूल कळून आला नाहीं. **गणपतरावा**चें तें बोलणें ऐकून **नाना**ला मात्र चमत्कारिक वाटलें. त्या त्याच्या, मनाची उदासीनता प्रगट करणाऱ्या चेहेऱ्यावर किंचित् हास्यही दिसलें. परंतु तें दिसतें न दिसतें तोंच तें नाहींसेंही झालें व तो **गणपत-रावा**स म्हणालाः—

“ पुरे बोआ आतां. नऊ वाजून गेले. आज तूं थकून आला आहेस, आणखी तुला वाचन कसं बोआ सुचतं. चला आतां आपण आपल्या—”

**गणपतराव** त्याला मधेंच म्हणालाः— “एः आगगाडीच्या प्रवासानं मनुष्य कधीं थकत असतो काय ? हें बघ सारीं दहाच पानं गोष्ट आहे. फार झालं तर एक तासाच्या वर कांहीं वेळ लागायचा नाहीं. पण पाहूं या तर खरं बरं काय काय एवढं लिहिलं आहे तींत तें. या **सिंडेरेले**चं लग्न तिला सुखकर झालं कसं ?”

**नानाः**—उद्यां वाचलं तर नाहीं चालायचं ? आतां आपण आलां आहांत इथें. तो अंकही कुठें जायचा नाहीं. उद्यांच आतां—

**गणपतरावः**—छे बोवा, आपल्याच्यानं कांहीं हें वाचून टाकल्याखेरीज राहावायचं नाहीं. मी वाचून येतो. जा तूं.

**गणपतरावा**चें हें थोडेसें चमत्कारिक बोलणें ऐकून **नाना**लाही आपला आग्रह कमी करावा लागला. तो शेवटीं त्याला म्हणाला, “ तूं वाचणारच असलास तर वाच. मीही ऐकेन, मला तरी जाऊन काय करायचं आहे खोलींत ? पण ”—

कसलें आहे ‘पण ’ आणि काय ! **गणपतरावानें** वाचण्यास प्रारंभ केलाच.

## सिंडेरेला अथवा सुखकर लग्न.

“ आपण म्हणतां ह्या गोष्टी मला कळत नाहींत, असा का आपला समज आहे ? मला सारं कळतं आहे. पण माझं मनच कांहीं चमत्कारिक झालं आहे. इकडे आड, आणखी तिकडे विहीर असं झालं, म्हणजे मग

माणसांनी काय करावं ? मी दारिद्र्याला भितें, असं जर आपल्याला वाटत असेल तर मग माझं हृदय आपल्याला मुळींच कळलं नाहीं असंच मला म्हटलं पाहिजे. मी भितें आपल्यासाठीं. एकदां आपलं लग्न झालं म्हणजे मग आपल्याला दोन प्राण्यांकरितां मिळवावं लागेल. तितका व्याप वाढला नाहीं का बरं ?"

प्रिये, अशा व्यापाला भिऊन जर मी मागें घ्यायला लागलों तर मग माझं प्रेम तें काय ? इतका का मला तूं भित्रा समजतेस ? छे, छे, तुझ्या-करितां मला अहोरात्र श्रम करावे लागले, तरी मी ते मोठ्या आनंदानं करीन. समजलीस ? पण इकडे पहा, एकदां तूं मला आपला असा देवळांत ह्मण. "

" इतकंच ना ? तें मी—आतां आणखी काय बोलून दाखवूं ? पण एकदां बाबांना निक्षून विचारलं तर काय होईल ? ते जरी आता नाहीं म्हणताहेत तरी मी जर त्यांच्याजवळ जाऊन गुडघे टेंकून आणखी डोळ्यांत आंसवं आणून त्यांच्याजवळ गोष्ट काढली तर ते ' नाहीं ' नाहीं ह्मणणार. "

" छे, छे, छे, त्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं. माझं ऐक तूं. मीं त्यांची थोडी का विनवणी केली ? पण नाहींच. त्यांनीं अगदी उत्तर दिलं कीं तुझ्यासारख्या भिकाऱ्याला माझी मुलगी कधीं देणार नाहीं. माझी मुलगी **लॉर्ड टामफूल**ला द्यायची ही अगदीं पक्की खूणगांठ मारून ठेव. (तिच्या-कडे नीट न्याहाळून पाहून ) प्रिये खरंच सांग. तुला अजून बाबांचं ह्मणणं कसं मोडावं, लोक काय ह्मणतील, आई काय ह्मणेल याचं भय वाटतं आहे कीं नाहीं ? तें जर भय वाटत असेल तर मग माझा तुला बिलकूल आग्रह नाहीं. तुझं वचन मी तुला खुशाल परत देतों. माझ्या अंतःकरणाचं जें होईल तें होईल. "

हें बोलणें बोलून **रॉजर द्रुलव्ह** आपले हात कोटाच्या खिशांत घालून स्तब्ध राहिला, व तटस्थपणें तिच्याकडे पाहूं लागला. त्या त्याच्या नेत्रांत या वेळीं अनेक विकारांचें मिश्रण बनून प्रत्येक विकार स्पष्टपणानें दिसत होता. दुःख, भय, आशा, आनंद, प्रेम हे विविध विकार इकडून तिकडे तिकडून इकडे असे केवळ नाचतच होते असें दिसलें.

बिचारी **सिंडेरेला** आपल्या दोनी हातांचीं बोटें एकमेकांत घालून व ते हात पालथे करून त्यांजकडे खालीं दृष्टी लावून पहात होती. ते

आपल्या प्रियकराचे शेवटले शब्द ऐकून तिच्या मनाची कांहीं फारच चमत्कारिक स्थिति झाली. तिचें **रॉजर**वर जें प्रेम होतें, तें अगदीं अकृत्रिम व निर्मल होतें. आपण याच्याशीं बापाच्या मर्जीविरुद्ध लग्न लावलें तर आपल्याला बाप अगर लोक काय म्हणतील, हा प्रश्न स्वप्नांतही तिला आला नाही, आजपर्यंत एका **रॉजर**च्या प्रेमाखेरीज तिला दुसरी कोणचीही गोष्ट दिसली नाही. कांहीं दिवसांपूर्वीं **रॉजर**नें प्रथमच जेव्हां तिच्याजवळ लग्नाची गोष्ट काढली तेव्हां तर तिला इतका आनंद झाला कीं, ती आपलें देहभान देखील विसरून गेली व तिनें त्याला घट्ट मिठी मारून भीत भीत सप्रेम, सानंद, सस्मित अशा दृष्टीनें त्याच्या त्या " आतां काय ही बोलते आणि काय नाहीं. " असें झाल्यामुळें चमत्कारिक दिसणाऱ्या चेहऱ्याकडे पाहून "होय मी आजपासून आपली आहें" असें एकदम उत्तर दिलें. त्या वेळी तिला बापाच्या मनांत काय आहे आणि काय नाहीं याचें स्मरणदेखील राहिलें नाहीं; व त्यानंतरही कधी तो प्रश्न निघाला असतां ती तिकडे अगदीं दुर्लक्ष्य करीत असे; परंतु आज या ऐन आणीबाणीच्या प्रसंगीं आपल्या प्रियकरानें निक्षून जेव्हां तो प्रश्न विचारला, तेव्हां तिच्या मनांत काय झालें असेल आणि काय नाहीं, याचा विचार वाचकांनींच करावा. ती वर सांगितल्याप्रमाणें तशीच कांहीं वेळ अगदी तटस्थ उभी राहिली; एक मिनीट दोन मिनिटें वेळ गेला. तिच्या त्या बर्फासारख्या शुभ्र हातावर ते ऊन ऊन अश्रुबिंदू पडले. अंगावर शहारे येतील असा **रॉजर**ला एक हुंदका ऐकूं आला व " **रॉजर**, **रॉजर**, हे असे प्रश्न विचारून कां उगीच मला दुःख देतोस ?" असें म्हणत व स्फुंदत स्फुंदत तिनें त्याच्या गळ्याला मिठी मारली. या वेळीं रॉजरच्या मनाची स्थिति काय झाली असेल ती कल्पनेनेंच जाणावी. त्यानें तिला घट्ट पोटाशीं धरलें; व तिच्या कानाजवळ आपलें तोंड नेऊन मोठ्या प्रेमानें हळूच तो तिला म्हणाला, " मीं विचारलं यापासून तुला दुःख होत असेल तर नाहीं मी विचारीत, पण प्रिये, याचा विचार नको का व्हायला ? "

हे शब्द ऐकल्याबरोबर काय तिच्या मनाला वाटलें असेल तें असो. **सिंडेरेलेनें** एकदम आपल्या प्रियकराच्या करपाशांतून आपल्यास सोडविलें; ती दूर झाली. तिनें हातरुमालानें अश्रू पुसले व आपले ते सुंदर नील नेत्र आपल्या प्रियकराकडे लावून मोठ्या गंभीरपणानें ती त्याला म्हणाली, " **रॉजर**, तूं ज्याअर्थीं विचारतोस त्याअर्थीं आतां मी सांगतेंच. "

इतके शब्द उच्चारून ती एकदम थांबली. पण **रॉजर**च्या मनांत त्या तितक्या वेळांत जें काय झालें तें झालें. त्याला आतां ही काय बोलते आणि काय नाही याची मोठी भीति पडली. तो अगदीं भयभीत व आशायुक्त मुद्रेनें तिच्याकडे पाहूं लागला. आतां तिनें आपले डोळे एक क्षणभरही ढळवले नाहीत. उलट शांतपणानें म्हणाली, " काल तूं इथून गेल्यानंतर तूं कां आला होतास, कां नाहीं, वगैरे गोष्टी बाबांनीं मला सांगितल्या. त्यांनीं तुला काय उत्तर दिलें तेंही मला सांगितलें; व शेवटीं ते म्हणाले ' पोरी **सिंडेरेले**, तूं अगदीं मूर्ख आहेस. **रॉजर** किती झाला तरी आपला चाकर. त्याला इतका धीटपणा यायला तूंच कारण. तुला अगदींच अक्कल नाहीं. हें तुमचं दोघांचं जर मला पहिल्यापासून ठाऊक असतं तर मीं त्याला कधींच हांकून लावला असता. कारकून तो कारकून. आणखी त्यानं भिकारड्यानं अशी इतक्या वर नजर लावावी ? या साऱ्याला कारण तूं. ' इतकं ते बोलेपर्यंत मी कांहींएक बोललें नाहीं. मुकाट्यानं खालीं पाहून ऐकत होतें. पण पुढें जेव्हां ते म्हणाले कीं, ' पोरी, तूं पक्कं लक्ष्यांत ठेव. तुझं त्या **लॉर्ड टामफूल**शींच लग्न करायचं. ' तेव्हां माझ्यानं राहवेना. मी एकदम रडायला लागलें. हें पाहून बाबा फारच रागावले आणखी आईकडे वळून म्हणाले, ' पाहिले का हे ढंग ! पहा किती निलाजरी करून ठेवली आहेस हिला ती ! ' आई कांहींच बोलली नाहीं. तिनें माझ्याकडे रागानें पाहून ओंठ मात्र चावले. मीं तिकडे लक्ष्यच दिलं नाहीं. बाबांचं एकसारखं बोलणं चाललं होतं. ' ही पोरगी कुलनाशक होईल, ही पळून जाईल, हिला लाज नाहीं. ' एक ना दोन हजारों शब्द चालले होते. तरी मीं कांहीं बोललें नाहीं. शेवटीं ते माझ्याजवळ आले. माझ्या हातांत पंखा होता तो घेऊन त्यांनीं माझ्या दंडावर मारला. मीं वर पाहिलंच नाहीं. त्यांनीं माझी हनुवटी धरून खसूकन् माझं तोंड वर केलं, आणखी ते मला म्हणाले, ' तुला माझं म्हणणं ऐकायचं आहे कीं नाहीं ? बोल. जर आमचं म्हणणं ऐकायचं असेल आणखी आज जी आमची पेढीवर अब्रू जाते आहे ही जर संभाळायची असेल तर तुला **लॉर्ड टॉमफूल**शीं लग्न लाविलें पाहिजे. तो लग्न लागल्याबरोबर मला वीस हजार पौंड देणार आहे, त्यानं मी दिवाळ्यांतून वांचेन, नाहीं तर धडगत नाहीं. जर ऐकायचं नसेल तर पुन्हां आपलं तोंड दाखवूं नकोस. तूं मला मेलीस आणखी मी तुला मेलों असं समज. ' इतकं बोलून बाबा तिथून चालते झाले. ते गेल्यावर आईनंही त्याचप्रमाणें सांगितलं. मी तें मुकाट्यानं ऐकलं आणखी आपल्या

खोलींत चालती झालें. तिथें जाऊन जी खुर्चीवर बसलें ती सारी रात्र खुर्चीवर होतें. पोषाख उतरला नाहीं. पलंगाला शिवलें देखील नाहीं. सात आठ तास माझ्या मनांत ते बाबांचे शब्द घोळत होते. ' पुढें काय करावं ' हा प्रश्न जणूं काय विस्तवाच्या अक्षरांनीं लिहून माझ्या डोळ्यांपुढें कोणी नाचवीतच होता. तुझ्याखेरीज मला कोणाशीं लग्न लावायचं नाहीं हा तर कृतनिश्चय. बाबांचं म्हणणं **लॉर्ड टॉमफूल**शीं लग्न करावं. स्पष्ट नाहीं म्हणावं तर पेढीचं दिवाळं निघण्याची भीति ! अशा स्थितींत असतांना माझं मन किती विलक्षण झालं असेल याची कल्पना कोणाला तरी करतां येईल का ? **रॉजर**, मला तीन वेळां आत्महत्या करून घ्यावी असं वाटलं, पण तिन्ही वेळां तुझी मूर्ति पुढें येऊन तिनं मला मागें ओढलं. एक वेळां तर लायब्ररींतल्या औषधाच्या कपाटाजवळ जाऊन आईला पायाला चोळण्याकरितां एक विषारी औषधं आणलं तें काढलंही होतं. पण तें तसंच पुन्हां ठेवून आपल्या खोलींत आलें. थोडा वेळ स्तब्ध बसलें. आणखी शेवटीं एकदांचा निश्चय केला. " इतकेंच म्हणून ती क्षणमात्र थांबली:—

**सिंडेरेले**च्या तोंडचीं " निश्चय केला " हीं अक्षरे ऐकण्याबरोबर तो काय असावा असें वाटून किंचित् भयभीत झालेला **रॉजर** थोडा पुढें सरकला आणि तिच्याकडे रोंखून पाहूं लागला. तिनें आपले ते विशाल नीलाक्ष एक रतिभरही ढळवले नाहींत. उलट ती जास्तच धीटपणानें म्हणाली,

" मीं जो निश्चय केला, तो एवढाच कीं कोणाचं केवढंही नुकसान होवो मी त्या **लॉर्ड टॉमफूल**ला किंवा तुझ्याखेरीज दुसऱ्या कोणाला कधींही वरणार नाहीं. मन दुसरीकडे असतांना **टॉमफूल**शीं लग्न लावणं म्हणजे बाबांना पैसे पाहिजेत म्हणून बाजारच्या बायकांसारखा देह विकणंच आहे. इतकें बोलली तों तिच्या अंगांत कांहीं विलक्षण स्फुरण चढल्यासारखें झालें. ती किंचित् उंच झालीशी दिसली आणि एकदम मोठ्यानें म्हणाली " नाहीं **रॉजर**, अशी नीच गोष्ट करून मी आपल्या सर्व आयुष्याच्या सुखाची कधींही माती करून घेणार नाहीं. बेहेत्तर आहे बाबांचं दिवाळं निघून आमची अन्नान्नगत झाली तरी ! बाबा जुलूमच करूं लागले, तर मी घर सोडीन, दार सोडीन, पण त्या अजागळ मनुष्याशीं पैशासाठीं कधीं लग्न लावणार नाहीं. **रॉजर, रॉजर,** तुझ्याखेरीज या पृथ्वीवरले

सारे पुरुष बापासारखे आणि भावांसारखे. या माझ्या निश्चयानं माझ्यावर दुःखाचे डोंगर जरी कोसळले तरी मी डगमगणार नाहीं. बाबांनी मला घराबाहेर घालवून दिली हरकत नाहीं, पण मी त्यांच्या म्हणण्याप्रमाणें तें नीच लग्न कधीं करून घेणार नाहीं. **रॉजर,** तूं मात्र मला आतां अंतर देऊं नकोस. पक्का विचार कर. मी आपलं वचन पाळण्यासाठीं मरेपर्यंत लग्न केल्यावांचून राहीन यांत अगदी तिळमात्र संशय नको. ”

इतके शब्द बोलून संपल्यावर तिनें आतांपर्यंत दाखविलेलें धैर्य उसनें होतें, हें स्पष्टपणें दिसण्याकरितांच जणूं काय, ती पुन्हां स्फुंदून स्फुंदून रडायला लागली; व पहिल्याप्रमाणें त्यास तिनें घट्ट मिठी मारली. तो मोठा धीराचा पण या वेळीं त्यालाही गहिंवर आला व एकदम “ प्रिये, प्रिये, मीं तुला अंतर देणार नाही, अशाबद्दल कशी आतां तुझी खात्री करून देऊं ? याला एकच उपाय. ” असें म्हणून तो किंचित् हंसला. तिच्या कमरेला त्यानें विळखा घालून त्यानें तिला जवळ ओढलें. तिचें खालीं केलेलें मुख त्यानें वर केलें, व ज्याच्यावर अश्रुबिंदू पडले आहेत अशा त्या सुकुमार अधराचें “ आतां तर शंका नाहींना ? ” असें म्हणत त्यानें चुंबन घेतलें !

**गणपतरावा**चें हृदय अत्यंत कोमल असल्यामुळें त्यास ही गोष्ट तितकी हृदयद्रावक नसतांनाही गहिंवर आला. त्याच्यानें पुढें वाचवेना. त्यानें पुस्तक अंमळ खालीं ठेवलें व तो **नाना**कडे पाहूं लागला. **नानाला** त्या गोष्टीपासून गहिंवर वगैरे कांहीं दाटला नाहीं, पण त्याचें मन विशेष उद्विग्न झालें. आपल्या सध्यांच्या व **सिंडेरेले**च्या स्थितींत फार साम्य आहे असें त्याला वाटलें. तिच्याप्रमाणेंच आपल्याला अडचणी आहेत हें त्यास दिसलें; व त्याबरोबरच तिच्याप्रमाणें आपल्याला निश्चय नाहीं असेंही त्याच्या मनांत आलें. तीं स्त्री होऊन तिनें जितका निश्चय दाखविला, तितका आपल्या अंगीं नाहीं हें फार चमत्कारिक, असें असूं नये. **सिंडेरेलेचा** बाप पैशाच्या आशेनें किंवा आत्मसंरक्षणाकरितां म्हणा, पण एका मूर्ख अजागळ सरदाराशीं तिचें लग्न लावून देणार होता, आपलाही चुलता त्याच हेतूनें एका अगदीं कुरूप पोरीशीं आपलें लग्न लावूं पहातो आहे. तर हें आपण काय म्हणून मुकाट्यानें सोसून घ्यावें ? **सिंडेरेले**चा बाप दिवाळें निघून आपली बेअब्रू होईल ती न व्हावी म्हणून तरी पोरीचें असें लग्न करणार होता. आपला चुलता तर निवळ पैशाच्या लोभानें आपलें लग्न अशा

तऱ्हेनें करणार, तेव्हां आपण तर विशेषच **सिंडेरेले**प्रमाणें निश्चय केला पाहिजे. असो. एक नाहीं दोन नाहीं, कितीक गोष्टी आपल्या व **सिंडेरेले**-च्या स्थितींत सारख्या आहेत असें त्याला दिसून आलें. एका दुःखी मनुष्यानें दुसऱ्या दुःखी मनुष्याची गोष्ट ऐकिली म्हणजे एकमेकांना नसत्या गोष्टींतही सारखेपणा दिसून एकमेक समाधान मानून घेतात. मग इथें तर काय ओतप्रोत सारखेपणा भरलेला ! तो **नाना**ला दिसून त्याच्या मनांत त्याबद्दल क्षणमात्र तरी खल व्हावा यांत नवल काय ?

**गणपतरावा**ला तर तो सारखेपणा इतका वाटला कीं, **नाना**चीच गोष्ट नांवें बदलून तिकडे लिहिली आहे, किंबहुना तिच्या आधारानें, इंग्लिश रीतीला अनुसरून ती लिहिली आहे असें वाटूं लागलेंसें दिसलें. तो पुस्तक खालीं ठेवून कांहीं वेळ स्तब्ध बसला; व मग एकदम **नाना**स म्हणालाः—

" **नाना**, गोष्ट म्हणून वाचायला गेलें तिथें देखील मीं म्हणतों तसाच उपदेश तुला मिळतो आहे. तेव्हां आतां शंका कसली धरतोस ? **सिंडेरेला** बायको होऊन तिनं किती निश्चयी स्वभाव दाखवला आहे पहा. जिथें जाशील तिथें मी सांगतों तेंच. आतां उगीच नको आपल्या जिवाला त्रास करून घेऊं. "

तें त्याचें बोलणें ऐकून **नाना** त्याला म्हणाला, " अरे, पण इथेंच काय अगदीं ? आपल्या खोलींत जाऊन मग काय जें बोलायचं तें बोलूं. तूं बाबा अगदी "—

" बरं तर एवढी गोष्ट पुरी करून जाऊंच. "

" काय दहा वाजून गेले. आणखी अजून तुझ्या मनांत इथेंच बसून गोष्ट पुरी करायची आहे. नको बोआ. त्यांतून ती गोष्ट तर नकोच आतां. ती गोष्ट ऐकतांना माझं मन कसंसंच झालं बाबा ! "

" खरंच बोआ, मलाही कांहीं चमत्कारिक वाटलं; बरं तर ठेवूनच देऊं. आतां मी उद्यां वाचीन. "

असें म्हणून ते दोघे उठून आपल्या खोलींत गेले. इतर मंडळी **गणपतरावानें** गोष्ट वाचण्यास सुरुवात केली तेव्हांच तेथून गेली होती.

हे दोघे खोलींत गेल्यावर, **गणपतरावानें नाना**स आपल्या व त्याच्या घरच्या सर्व हकीकतीच सांगितल्या; कॉलेजांतील व **गोदी**कडील हकीकत विचारली; आपल्या बायकोनें तिला फार विचारलें असून ' तिला एक खण दिला आहे तो पोंचवावयाचा आहे, ' वगैरे बोलून त्यानें आणखी चांगले

एक दोन तास घालवले. त्या दोघांना झोंप म्हणून कांहीं येईना. तेव्हां शेवटीं पुन्हां एकदां **गणपतरावानें** **नाना**च्या लग्नाची गोष्ट काढली ती अशी:—

" कां ? आतां तर कांहीं शंका उरली नाहींना ? आतां मी तरी वेड्या-सारखा विचारतों आहें काय ? तुझा निश्चय झालाच असेल "

" काय बोआ, मी आज दोन दिवस एकसारखा तळमळतों आहें. आतां मीं आपला असा विचार केला आहे कीं, सकाळ झाली म्हणजे तूंन् मी **विष्णुपंता**कडे जाऊं, आणखी त्याला विचारूं; अन् तिथे मिळून काय तें ठरवूं म्हणजे झालं. अन् तें जें ठरेल त्याच्याप्रमाणें अगदीं कायम करूं. "

" हेंच तें. त्यांत ठरवायचं तें काय ? मी अगदीं निश्चय करून आलों आहें बोआ, की कांहीं झालं तरी तुला जाऊं म्हणून द्यायचं नाहीं. त्यांतून मघा वाचलेल्या गोष्टीनं तर तो निश्चय कायमच झाला; आपण जाऊं सकाळीं, **विष्णुपंता**चा विचार विचारूं; पण माझं मत अगदीं ठरलेलं आहे त्यांत अणुमात्र तफावत व्हायची नाहीं. एवढा धांवत आलों मी, तो उगाच का आलों ? "

" खासं बाबा, तुझ्यासारखी माझी स्थिति असती, म्हणजे मग काय पाहिजे होतं ? मीं तेव्हांच तुझ्या म्हणण्याप्रमाण केलं असतं. "

" झाल काय तुझ्या स्थितीला ? येऊन जाऊन **काशीनाथपंत** तुला पैसे देणार नाहीत एवढंच ना ? सध्यां स्कॉलर्शिप मिळतेच आहे; पुढें फेलो झालास तर बरंच, नाही तर मुंबईस कसंय करून मी चाकरी देववीन. मी आमच्या घरून पैसे देईन तुला, त्याची एवढी फिकीर नको. त्यांतूनही **कृष्णराव** मुनसफाची—"

" वा ! वा ! हें चांगलं. लोकांच्या निंदेला मग तर कांहीं धरबंध राहणार नाही !

" अरे, लोकांच्या निंदेला कांहीं भिण्याचं कारण नाहीं. ती दोन दिवसांची. पुढें कोणाला स्मरण देखील रहाणार नाहीं. "

" हा विचार चांगला बोआ ? तो तुझा तुलाच योग्य ! "

" नाहीं. आतां आपण आपला विचार करा, आणखी या जन्माच्या सुखावर पाणी सांडून म्हणजे सुटलांत. काय तर मघांपासून सांगतों आहें तें कांहींच नाहीं. "

" अरे, असा रागावूं नको बाबा. आपण सकाळीं काय तें ठरवूं. रात्रीं तूंय् आणखी विचार कर. म्हणजे ठीक पडेल. **विष्णुपंत** फार विचारी आहे. तो कांहींना कांही तरी आपल्याला युक्ति सुचवील. माझी खात्री आहे, परवां तर मला चांगला अनुभव आला. "

" हो, अनुभव आला खरा. काय पण पत्र लिहिलं होतं ! वाचल्याबरोबर माणसाला सगळं उघड उघड दिसावं ! "

" अरे बाबा, आमच्या **सीताकाकू** त्या ! काकांच्या तर नाहींना लक्ष्यांत आलं ? "

" काकांच्या येवो न येवो. ज्यांच्या यायचं त्यांच्या लक्ष्यांत आल्यावर आणखी काय पाहिजे ? त्यांत कांही अर्थ नाहीं. तूं आपल्या मनाचा पक्का विचार कर आणखी ठरवून टाक. एक आपला बाऊच करून ठेवला आहेस तूं मोठा थोरला. त्या **सिंडेरेले**पासून तरी कांहीं नैतिकधैर्य (moral courage) शीक. "

**नाना** किंचित् हंसत म्हणालाः– " मी तुझ्यासारखा नुसता रोम्यान्टिक नाहीं. कादंबऱ्या वाचून त्यांतल्या नायकनायिकांप्रमाणें भराऱ्या मारण्यांत कांहीं तरी शहाणपणा आहे का ? अरे, त्या किती झालं तरी गोष्टीच त्या. "

हें **नाना** म्हणाला खरें, परंतु त्याच्या मनाला जें वाटत होतें तेंच निव्वळ तो या वेळीं बोलला असें नाहीं. थोडीबहुत **गणपतरावाची** थट्टा करण्याचाही उद्देश त्यांत होता. कारण, एक तर त्या गोष्टीच्या वाचनापासून त्याच्या आधींच संशयांत असलेल्या मनाला अधिक उद्विग्नता आली होती; आणि सिंडेरेलेसारख्या स्त्रिया फक्त कादंबऱ्यांत सापडतील असेंच त्याला वाटत होतें, असें नाहीं.

कित्येक वेळां—किंबहुना बहुतेक वेळां लहान मोठ्या गोष्टींत आपणांस असें दिसून येतें कीं, त्या घडून येण्यास नेहमीं कारणेंही त्या मानानेंच लागतात असें नाहीं. अगदीं क्षुल्लक गोष्टींपासून केवढाले प्रचंड प्रसंग झाले आहेत ! कोठें कोठें अगदीं वांध्यांत पडलेल्या गोष्टी एखाद्या यःकश्चित् गोष्टीच्या घडण्यानें निश्चित झाल्या आहेत. प्रत्येक वस्तूच्या काय किंवा मनुष्याच्या काय आयुष्यक्रमांत असा एक वेळ असतो, कीं त्या वेळीं जी दिशा लागेल त्या दिशेला सर्व आयुष्यक्रमाचें गाडें फिरावयाचें किंवा त्या आणीबाणीचे वेळीं घडलेल्या यःकश्चित् गोष्टीमुळें पुढील क्रमाचा बरेवाईट-

पणा व्हावयाचा. **नाना**च्या आयुष्यक्रमांत ही वेळ तशीच होती. **गणपतरावानें** केलेल्या अनेक खटपटी व विनवण्या यांनीं त्याच्या मनाची जी संशयात्मक स्थिति केली होती तिला त्या इंग्रजी मासिकांतल्या यःकश्चित् गोष्टीच्या वाचनानें असा सपाट्याचा झोंका दिला कीं, त्यासरसें त्याचें मन **गणपतरावा**च्या म्हणण्यास अगदीं अनुकूल व त्याच्या स्वतःच्या एकंदर पुढील आयुष्यक्रमासही अनुकूल असेंच झालें. जर तें वाचन न होतां त्याच्या जागीं दुसरी कांहीं गोष्ट घडली असती, तर न जाणों **नाना**चा पुढला आयुष्यक्रम फारच निराळ्या झोंकावर गेला असता.

**नाना**चा स्वभाव **गणपतरावा**प्रमाणें भराऱ्या मारणारा नव्हता, हें आतां नव्यानें येथें सांगावयास पाहिजे असें नाहीं. पण सध्यांची त्याच्या मनची स्थितिच अशी होती कीं त्याचे हेलकावे खात राहिलेलें मन, जिकडून अतिशय जोराचा वारा येईल त्या बाजूला झोंका खाई; आणि त्याप्रमाणें तें घडलेंही. पहांटे तीन वाजण्याच्या सुमाराला **गणपतरावा**स झोंप लागली. **नाना**स लागली नाहीं. तो त्या **सिंडेरेले**च्या गोष्टीवर व आपल्या भावी स्थितीवर विचार करूं लागला. अंथरुणावरून उठला व खोलीच्या बाहेर येऊन पुढील पडवींत ( Veranda ) इकडून तिकडे हिंडूं लागला. कित्येक वेळां त्या **सिंडेरेले**च्या गोष्टीचें आपल्या मनावर एवढें कां वजन पडावें याचाच तो विचार करी. तो आपल्या मनांत म्हणे, बोलूनचालून ती गोष्टच. तिचा काय खरेपणा धरायचा आहे ? पण पुन्हां असें म्हणे, गोष्ट असो की कांहीं असो; तीपासून आपण खचित एवढा धीटपणा शिकला पाहिजे. पाहिजे तर वर्ष दोन वर्ष मुळींच लग्न करूं नये. पण निव्वळ चुल· त्याच्या व चुलनीच्या मर्जीकरतां हवें तसें लग्न करणे हें अगदीं गैरशिस्त !

अशा तऱ्हेनें तेच तेच विचार त्याच्या मनांत अनेक वेळां घोळले. एकदां हा विचार, मग तो विचार, मग तिसराच. पण लग्नाला जायचें नाहीं हा कायमचा. तो निश्चय आतां एक क्षणभरही एकीकडे होईना. पहांटेचे चार वाजले. बागेंतून येणारा गार वारा त्याच्या मस्तकावर व तोंडावर वाहूं लागला. मस्तक विचारांनीं अगदीं तापलें होतें तें जरा थंड झालें. आतां किंचित् निद्रा आली तर घ्यावी असें वाटून तो बागेंत गेला. नळीचें पाणी त्यानें डोक्यावर व कानाशिलांवर घातलें. खोलींत गेला व अंथरुणावर पडल्यापासून थोड्या वेळांतच त्याचा डोळा लागला.

दुसरे दिवशीं त्यानें आपल्या मनाची स्थिति **गणपतरावा**स व **विष्णुपंता**स कळवून त्या दोघांच्या विचारानें **काशिनाथपंता**स आपल्याला

यंदा लग्न करावयाचें नाहीं म्हणून निक्षून पत्र लिहिलें. तें पत्र लिहिलें, नव्हे आपला पुढला आयुष्यक्रम आपण पक्का आपल्या हातांत आणला असें त्याला वाटलें. आणि तसेंच होतेंही. बोलून चालून अग्नीवर पाय टाकला तर काय होईल, नागाला चिडविला असतां तो काय करील, बल-वानाचा उपमर्द केला असतां तो आपल्यास साधारणपणें कसा वागवील, या गोष्टींचीं उत्तरें जसा कोणी केव्हांही न चाचरतां देईल, त्याप्रमाणें **नाना**-च्या पत्राचा परिणाम काय होईल हें त्यानें किंवा कोणींही सहज सांगितलें असतें व त्याप्रमाणें झालेंही.

**नानाचें** पत्र जाऊन पोंचल्याच्या परत डांकेस त्याला खरपूस पत्र आलें त्यांत काय असेल हें कांहीं सांगावयाला पाहिजे असें नाहीं. जितकें म्हणून कांहीं वाईट असेल तेवढें त्यांत होतें. त्यांत स्पष्ट यापुढें तुझी आम्ही एकमेकांचे कोणी नव्हों. तुम्ही इतःपर आमचे घरीं येऊं नये. आम्ही यापुढें आपल्यास एक छदामही पाठविणार नाहीं. आपली आपली सोय पहावी. आपल्या आईस आपलेकडे पाठवावी किंवा आपले आजोळीं पाठवून द्यावी, हें आपण लवकर कळवावें. आपण फार शहाणे झालां, वगैरे सर्व गोष्टी होत्या. अमुक गोष्ट म्हणजे नव्हती असें कांहीं नाहीं. तें पत्र म्हणजे वाईट शब्दांचें व कुत्सित विचारांचें एक चऱ्हाटचें चऱ्हाट वळलें होतें. तें पत्र येथें आल्यानंतर **नाना, विष्णुपंत** व **गणपतराव** या तिघांनीं वाचलें सर्व गोष्टी पूर्वदृष्ट असल्यामुळें त्याचें **गणपतरावास** मुळींच कांहीं वाटलें नाहीं. तो उलटा मोठमोठ्यानें हंसला. **विष्णुपंतास** थोडेंबहुत चमत्कारिक वाटलें. जो आपण सल्ला दिला त्याचा परिणाम आतां भासूं लागला. हा जर नुसता प्रारंभ असेल, याच्यापुढें जर याच्याहीपेक्षां कांहीं विलक्षण गोष्टी होणार असतील, तर आपण दूरवर विचार केला नाहीं असें वाटेल कीं काय असें त्याच्या मनांत आलें. त्याला हसूं आलें तें फक्त **काशीनाथपंता**च्या पोर-कट स्वभावाचें.

**नानाला** अत्यंत वाईट वाटलें. ‘ लोकदृष्टीनें आपण आज अत्यंत कृतघ्नपणा केला आहे. सर्व लोक आतां आपल्याला अगदीं नादान ठरव-तील ’ असें मनांत येऊन त्याच्या मनाची अगदीं चलबिचल झाली. काकांच्याकडे जाऊन त्यांच्यापुढें नाक घांसून क्षमा मागावी असेंही एकवार त्याच्या मनांत आलें. पुन्हां त्याला या आपल्या विचाराबद्दल हंसूं आलें. तो अगदीं स्तब्ध बसला. कांहीं एक बोलला नाहीं. **गणपतराव** व

**विष्णुपंत** त्याचें समाधान करीत होते. जें झालें तें झालें. आतां काय त्याचें ? ही अशी गोष्ट होणार हें आपण काय जाणून नव्हतों? आतां फक्त एवढेंच करायचें कीं, त्यांना एक पत्र पाठवायचें. त्यांत " आपण वडील आहां जें इच्छेस वाटेल तें करावें " असें ल्याहावयाचें, म्हणजे झालें. **गोपिका**काकूंना ते कांहीं पाठवीत नाहींत. त्यांतून पाठवलेंच तर मामाच्या इकडे पाठवतील. आपण इथून पांच दहा रुपये मामाच्या तिकडे पाठवूं पांच चार महिने, त्याची कशाला काळजी पाहिजे ? अशा अनेक गोष्टी बोलून त्यांनीं आपलेकडून **नाना**चें समाधान केलें. परंतु **नाना**चें मन स्वस्थ कसें होतें ? त्याच्या जिवाची हुरहुर जाईना. एक वेळां हें, एक वेळां तें, असे नाना विचार त्याच्या मनांत येऊं लागले. आपले सर्व विचार त्यानें आपल्या मित्रांस सांगितले नाहींत. एक वेळां त्याला वाटे ते हंसतील. एक वेळां वाटे ते आपल्याला अगदींच मोडून काढतील. पुन्हां वाटे आपल्या मनाला वाटतें आहे तें कळवावें तर खरें. आणि त्याप्रमाणें त्यानें काकांची क्षमा मागण्याचा विचार त्यांस कळवलाही. त्या दोघांनीं तो त्याचा विचार ऐकून त्याची थोडीबहुत फजिती केली. **गणपतरावा**नें तर त्याबद्दल त्याची टर उडविण्याची कमालच केली. त्याच्या नेहमींच्या रीतीप्रमाणें त्यानें अगदीं अतिरेकास गोष्ट नेली. त्याचा उपयोग एवढाच झाला कीं, **नाना**च्या मनांतून क्षमा मागण्याचा विचार अगदी ताबडतोब गेला. **गणपतरावा**नें त्याला असा प्रश्न विचारला की, जर तुझ्या मनांत असा विचार येतो आहे तर प्रथमपासून इतक्या पल्लयाला गोष्ट आणलीस कशाला ? मग पहिल्या प्रथम काकांच्या सांगण्याप्रमाणें वागणूक ठेवायची होती. इतका उपद्व्याप केला कशाला ? याप्रमाणेंच **विष्णुपंता**चेंही मत पडलें. मग काय विचारावयाचें आहे. तो दिवस तसाच गेला. दुसरे दिवशीं दुसरा खलिता आला. त्यांत स्पष्टपणानें असें लिहिलें होतें कीं आपण पहिल्या गाडीस निघून इथें येऊन जर क्षमा मागितली नाहीं, तर कालच्या पत्रांतील मजकूर अक्षरशः खरा होईल.

**नाना**च्या मनाची स्थिति आदल्या दिवसाप्रमाणेंच झाली. **गणपतरावा**ची वागणूक त्याचप्रमाणें. सायंकाळीं **विष्णुपंत** सहज आला. त्यानेंही एक निश्चय कायम करण्याविषयीं सल्ला दिला. **गणपतराव** आदले दिवशीं म्हटल्याप्रमाणें पत्र पाठवावें म्हणून आग्रह करूं लागला. **नाना** नको म्हणत होता. तो म्हणत होताः ' मुकाट्यानें बसावें यासारखें सुख नाहीं. ' **विष्णु-**

**पतां**चें मत असें पडलें कीं, 'कांहीं दिवस वाट पहावी. **काशीनाथपंतां**चीं आणखी अशींच पत्रें आलीं तर मग त्याहावें एक वेळां; नाही तर स्वस्थ बसावें यासारखें सुख नाहीं हीच गोष्ट खरी.'

तिसरे दिवशीं कांहीं पत्र आलें नाहीं. चवथे दिवशीं नाही. पांचवे दिवशी नाही. सहावे दिवशीं पत्र आलें. त्यांत आमचा विचार कायम झाला; आपले मातोश्रीस उदईक मामाकडे पाठवून देणार. इतकाच मजकूर होता.

वर सांगितलेल्या गोष्टीला बरोबर पंधरा दिवस होउन गेले. **काशीनाथपंता**कडून पत्र आलें नाही. नंतर दोन तीन दिवसांनीं एक पत्र आलें, त्यांतलें अक्षर त्याच्या ओळखीचें नव्हतें. पत्र फोडून वाचलें, तेव्हां त्यास समजलें की, तें पत्र आपल्या आईनें दुसऱ्या कोणामार्फत लिहिलें आहे. त्या पत्रांत मजकूर फार थोडा होता: " **काशीनाथ** भावजीनीं दादास पत्र लिहिलें होतें, त्याचें कालच पत्र आलें. त्यांत मजला पाठवावी असा मजकूर असल्यामुळें माझी उदईक रवानगी होणार. माझ्या मनांतून एकदां तुला भेटावें असें होतें. तुला वेळ असल्यास दादाच्या तिकडे ये. मी परस्वाधीन. तेव्हां मला पुण्यास येतां येत नाहीं." इत्यादि इत्यादि.

**नाना**नें आपल्या मामास पत्र पाठविलें त्यांत सविस्तर मजकूर कळविला व आई तिकडे येणार वगैरे मजकूर लिहिला. त्याला अशा स्थितीत आईला भेटावें असें वाटेना; म्हणून त्यानें थोडीबहुत तिची समजूत होईल असेंही पत्र लिहिलें. त्याचप्रमाणें **काशीनाथ**काकांसही विनयानें भरलेलें असें ते दिवशीं **नाना**नें **गणपतरावा**च्या व **विष्णुपंता**च्या सल्ल्यानें थोडक्यांत पण मोठें खुबीदार पत्र लिहिलें व आपणांस मोकळें करून घेऊन, आपल्या आयुष्यक्रमरूप पुस्तकाचा एक भाग संपूर्ण केला.

---

*

# प्रकरण १२ वें.

## दोन पुस्तकें.

रात्रीचे बारा वाजून गेले होते. वद्य द्वितीया किंवा तृतीया असल्या कारणानें बाहेर पिठासारखें चांदणें पडलें होतें. वाराही वहात होता. कॉलेजांत जिकडे तिकडे निजानिज झाल्यामुळें, व त्यांतून ते दिवशीं शनिवार असल्याकारणानें पुष्कळ विद्यार्थी शहरांत गेले होते, यामुळें शांत होतें. एखादद्दुसऱ्या खोलींतच काय तो दिवा चमकत होता. थोडया थोडया वेळानें टॉवरच्या बाजूस वळचणींत राहिलेल्या पिंगळ्यांच्या किल्मिल् चिल्बिल् शब्दाखेरीज, एखाद्या इकडून तिकडे जाणाऱ्या वडवाघळाच्या पंखांच्या झप्झप् अशा आवाजाखेरीज, अगर उगीच वेडयाप्रमाणें घिरटया घालणाऱ्या पाकोळीच्या चमत्कारिक शब्दाशिवाय ती मध्यरात्रीची शांतता मोडणारा ध्वनि सहसा निघत नव्हता. यदाकदाचित् शांतता मोडलीच तर या शब्दांनीं अगर लांबची चाहूल ऐकिली तरी उगीच भोकूं लागणाऱ्या भ्याड कुत्र्यांच्या भोंकण्यानें अगर शेजारींच राहणाऱ्या गवळ्याचे गुरांच्या गळ्यांतील घांटांनीं मोडत असे. वारा मोठा मजेदार व गार सुटला होता. अशा वेळीं **गणपतराव** एकटाच आपल्या खोलींत खिडकीजवळ खुर्ची घेऊन खिडकीच्या पुढल्या जागेवर तो मेणबत्तीचा दिवा घेऊन एक पुस्तक वाचीत बसला होता. आसपास कोणी नव्हतें. **नाना**च्या मामाकडून गांवांत जाऊन कांहीं काम करण्याबद्दल पत्र आल्याकारणानें तो काम झाल्याचरोबर संध्याकाळीं परत येण्याच्या उद्देशानें गांवांत गेला होता; तो कांहीं परत आला नव्हता. **गणपतरावा**च्या सध्यांच्या बसण्याच्या स्थितीवरून व चर्येवरून निदान कांहीं नाहीं तरी तीन साडेतीन तास तो तसाच वाचीत बसला असावा असें वाटे. पुस्तकाचीं पानेंही त्या मानानेंच उलटलेलीं होतीं. पुस्तक लहानसें म्हणजे सुमारें अडीचशेंपासून तीनशें पानांच्या वर नसावें. तो त्या पुस्तकांत अतिशय गढून गेला होता; त्याच्या चेहेऱ्यावर बऱ्याच विकारांची छाया दिसत होती. डोळ्यांचे कोंपरे पाण्यानें भरून आले होते तरी तो तसाच पुढें वाचीत चालला होता. शेवटीं मधेंच एकदम त्यानें तें पुस्तक मिटलें, आणि तो एकदम आपल्याशींच मोठ्यानें

म्हणाला: " वा ! फार छान ! शाबास. मी जर त्याच्या स्थितींत असतों तर निःसंशय याच तऱ्हेनं वागलों असतों. दुसरा मार्गच नव्हता. " इतकें मोठ्यानें बोलून त्यानें तें पुस्तक आपल्या मांडीवर टाकलें व तो आपल्याशींच विचार करीत स्तब्ध पडला. त्याची विचारसरणी नेहमींप्रमाणेंच लांबलचक, आमच्या सद्यःस्थितीला मुळींही उपयोगी पडणारी नव्हे अशी, परंतु आज नाहीं कांहीं शतकांनीं तरी खास सर्वसाधारण होणार अशा उदात्त कल्पनांनीं भरलेली, अशी होती.

" छे ! छे ! छे ! तिकडे जर ही स्थिति तर आमच्या इकडे कशाला आम्ही हंसावं ? **गोदावरी**ची स्थितिही अशी नाहीं का ? असाच तिचा नवरा पाजी. अस्साच हा छळ. आणखी मनुष्य म्हणतो गोष्टींच्या पुस्तकांचा काय खरेपणा धरावयाचा आहे ? कांहीं गोष्टी नसतील अनुभवावरून लिहिलेल्या; पण अशी ही सुंदर गोष्ट, प्रत्यक्ष एखाद्या बाईची अशी दुर्दशा झालेली पाहिल्याखेरीज का लिहिली असेल ? शंका हवी कशाला ? प्रत्यक्ष माझ्यापुढें हें उदाहरण आहेच. काय त्या बिचारीला दुःखं सोसावीं लागताहेत ! शिव ! शिव ! मी जर तिचा भाऊ असतों तर सगळ्या गोष्टी एकीकडे ठेवून चार पोटं चालतील इतकी कुठें तरी चाकरी करून तिला सदोदित जवळ बाळगली असती. त्या चांडाळ नवऱ्याला तिच्या नखाचें देखील दर्शन दिलं नसतं. बेहेत्तर आहे त्यानं फिर्याद करून जिकडे तिकडे बेअब्रू झाली असती तरी. अगदीं निःसंशय गोदावरीसारख्या गरीब गाईचं उदाहरण प्रत्यक्ष पाहिल्याखेरीज या गृहस्थानं ही हृदयद्रावक गोष्ट लिहिली नाहीं. प्रत्यक्ष अनुभवानं हृदयांतून भडभडून आल्याखेरीज इतकं सुरेख चित्र वठायचंच नाहीं. आमच्या या देशांत अशा किती बरं गाया नाडल्या असतील. पुष्कळ पुष्कळ असतील. यांत शंका नाहीं. बाहेर स्वतः जोडे खात असले तरी घरांत बायकोशीं तिरशिंगरावपणा करणारे लोक आमच्या इकडे कमी नाहींत. हजारों आहेत ? काय ? व्हावं कसं आतां हें ? स्थिति सुधारावी कशी ? काळ तर असा ज्या त्या गोष्टीची थट्टा करणाऱ्या लोकांचा पडला. कोणी म्हणून पुढार घेऊन हिंमतीनं कांहीं सुधारणेचं काम करील तर शपथ. बरं कोणी एखादा कळकळीनं निघालाच तर त्याला हाणून पाडायला नखं काढून तयारच. आम्ही कोण तर आम्ही म्हणे उतावळ्या सुधारकांचे प्रतिस्पर्धी ( Reactionists ) त्यांना उगीच बहकूं देणें बाजवी नाहीं. त्या दुर्धर-

कांना ताळ्यावर आणले पाहिजेत. केवढे हे लोकांना ताळ्यावर आणणार! एक उठतो म्हणतो, अहो, हे दुर्धारक (सुधारक) आपल्या समाजाची नासाडी करायला पाहताहेत यांचं ऐकूं नका. यांना आमच्या समाजाची खरो-खर सुधारणा कशी करायची तें मुळींच समजत नाहीं. जणूं काय आमच्या समाजाच्या खऱ्या स्थितीच्या ज्ञानाचा गड्डा यांच्याच हातीं ईश्वरानं आणून दिला आहे. खऱ्या सुधारणेची अक्कल काय ती यांना. बाकी जो सत्य धरून चालेल आणखी कांहीं सुधारणेचा उपाय दाखवील तो बेअकली. कसले हे रिॲक्शनिस्ट, यांना इनॅक्शनिस्टच ( Inactionists ) म्हणावं. कांहीं यांना स्वतांला करायला नको. दुसरा करील तें पहायला नको. अरे, सुधारकांनीं मनांत आणलेल्या गोष्टी तुम्हांला दुर्धारणेच्या वाटतात, तर तुम्ही कांहीं तरी रडा. सुधारणा अमक्यांनींच केली पाहिजे असें कांहीं नाहीं. कोणीकडून कांहीं तरी करा. स्वस्थ बसूं नका. ऐकतो कोण? आम्ही ह्मणे "चाललंय् असंच चालूं द्या" असें म्हणणारे ( Let-alonists ). सावकाश पण खात्रीची अशी जी सुधारणा होते आहे तीच चांगली. आपण त्या कामांत बिलकुल हात घालूं नये. अशा या लोकांचे लेख वाचले म्हणजे असा संताप येतो कीं कांहीं पुसूं नये. अरे एक, एक तरी खऱ्या कळकळीनें काम करणारा? हीच पुनर्विवाहाची गोष्ट पहाना? मारे सभा करून न् शपथा वाहून न् आतां त्या गोष्टीचें नांव तरी कोणी काढतो आहे. कशाला कोण काढील! बायका त्या! त्यांची कशाला कळकळ वाटते आहे? उद्यां असा सरकारनं कायदा करूं द्या कीं विधवांप्रमाणें विधुरांनीं देखील जन्मपर्यंत अविवाहित राहून दिवस काढले पाहिजेत म्हणजे पहा कसं आकाशपाताळ एक होऊन जातं तें!"

हे शेवटले विचार मनांत येण्याबरोबर **गणपतरावा**चा चेहरा अतिशय म्लान झाला; व त्याच्यावर किंचित् स्मितही दिसूं लागलें. त्यानें आपल्या हाताच्या तळव्यावर आपलें कानशील ठेविलें व मांडीवरील पुस्तकाच्या पु-ठ्यावरल्या चित्राकडे पहात तो सचिंत बसला; व कांहीं वेळानें मोठा थोरला उसासा टाकून तो आपल्याशींच म्हणतो: "छे. आशा नको. सुशिक्षित लोक जेव्हां 'होईल तसं होऊं द्या. आपण कांहीं करूं नये' असं म्हणून कोणी सुधारणेची कांहीं युक्ति काढली तर त्याचा अज्ञलोकांत उपहास करून व त्याला हाणून पाडून निवळ खोटा लौकिक मिळवायची हांव धरूं लागले, तेव्हां आतां कसली आम्हांला आमच्या सुधारणेची आशा आली आहे!

कोणीकडे तरी जाऊं आम्ही पांचजन्य वाजवीत झालं. असंच तें. देशाचं नष्टचर्यच ओढवलं. "

इतकें बोलून तो पुन्हां स्तब्ध बसला. कांहीं वेळानें उठला व खिडकीच्या बाहेर तोंड काढून पाहूं लागला. तों तो शांत व रम्य देखावा पाहून त्याच्या मनालाही अंमळ बरें वाटलें. इतक्यांत दोन वाजल्याचे टोले त्यानें ऐकिले. त्यानें मागें पाहिलें. तों त्याची दृष्टि त्या पुस्तकाकडे गेली. तें त्यानें घेतलें, पानें किती आहेत हें पाहिलें, ' वाचून टाकूंच. झोंप कांहीं येणार नाहीं कांहीं नाहीं. ' असें आपल्याशींच म्हटलें व पुस्तक उघडून तो पुनः पूर्ववत् बसला. दहा पंधरा मिनिटें झालीं नाहींत तोंच त्यानें पुस्तक मांडीवर टाकलें. गेल्या तासा—दीडतासांत ज्या विचारांनीं त्याच्या डोक्यांत काहूर केलें होतें ते विचार त्याला सोडीनातसे दिसलें. त्या पुस्तकावरूनच त्याच्या मनांत ते विचार आले, परंतु आतां तेच विचार त्याला तेंच पुस्तक वाचूं देतना. त्यानें चार पांच पानें वाचलीं तीं केवळ उलटलीं मात्र. त्यांत आपण वाचलें काय हें त्याचें त्यालाच ठाऊक नव्हतें. तें पुस्तक टाकल्यावर त्यानें पुन्हां आपल्या मनाशींच बोलण्यास सुरवात केली: " आपण तरी कां करूं नये कांहीं ? लोकांना जर आपण हंसतों, तर आपण स्वस्थ कां बसावं ? येऊन जाऊन लोक निंदा करतील, उपहास करतील, आपल्या गोष्टी मोडून काढायला पहातील. हरकत नाहीं. पण त्या सगळ्यांना पुरून उरण्याजोगी हिंमत कां आपण धरूं नये ? स्वस्थ कां बसावं ? आपल्या मनाला जें एवढं वाटतं आहे, त्याचा उपयोग काय तर मग ? कांहींना कांहीं तरी केलं पाहिजे. शेण पडल्यावर माती घेऊनच उठणार. उगीच उठायचं नाहीं. किती जरी या प्रतिस्पर्ध्यांनीं हाडांचीं काडं केलीं, तरी एवढं तेवढं तरी आपल्या हातून होईल ? त्याचा एकलक्षांश, एकपराधांश तरी परिणाम होईलना ? पुरे झाला, आणखी काय काय पाहिजे आपल्याला ? पण करावं काय ? आणखी कोणत्या मार्गानं करावं ? "

येथपर्यंत विचार झाल्यावर पुनः राजश्री गोंधळांत पडल्यासारखे झाले, व डोकें चोळीत, डोळे चोळीत इकडे तिकडे पाहूं लागले. मनांत विचारांचा गोंधळ चाललाच होता. मुख्य प्रश्न " आपल्या एकट्यादुकट्याच्या हातून होईल काय ? " हा मूर्तिमंत डोळ्यांपुढें दिसतच होता. इकडे तिकडे पहातां पहातां समोरच्या टेबलाकडे त्याची दृष्टी गेली. टेबलावरून जरा वरच्या बाजूस त्यानें पाहिलें तों शेल्फवर जवळ जवळ अशीं दोन पुस्तकें

त्याच्या दृष्टीस पडलीं एका पुस्तकाचें नांव त्याला दिसलें. दुसऱ्याचें नांव दिसलें नाहीं. पण दोनही पुस्तकें त्यानें नुकतींच विकत आणलीं असल्या-मुळें, त्याला तेव्हांच त्याचें नांव लक्ष्यांत आलें. पहिलें पुस्तक त्याचें अत्यंत आवडतें मिलचें ' सब्जेक्शन ऑफ वुइमेन ' ( स्त्रियांची परवशता ) हें होय. व शेजारचें पुस्तक हर्बर्टस्पेन्सरचा शिक्षणावरील निबंध. दोनही पुस्तकें पहाण्याबरोबर त्याचें मन एकदम कांहीं चमत्कारिक झालें. त्याच्या मांडीवरील पुस्तक खालीं पडलें. व तो एकदम मोठ्यानें आपल्याशीं म्हणाला: " आपल्या हातून कांहीं झालं तर यासंबंधात होईल. आणखी तें आपण करणारही. "

सरकारी नोकरी वगैरे कांहींएक धरावयाची नाहीं असा **गणपतरावाच्या** मनाचा निर्धार असून, कांहींना कांहीं तरी लोकसुधारणेचें काम करावयाचें असें नेहमीं तो आपल्या स्वतांशीं व दुसऱ्यांजवळही म्हणत असे हें वाच-कांस ठाऊकच आहे. आजपर्यंत त्याचे विचार होते ते सर्वसामान्य होते. परंतु आज त्यांना कांहींएक विशेष स्वरूप आलें, असें त्यास वाटूं लागलें. आणि तें पुष्कळ अंशीं खरेंही होतें. आजपर्यंत त्याला नेहमीं एवढें मात्र वाटत असे कीं, आपण कांहींना कांहीं तरी समाजसुधारणेचें काम करणार. कोठें एखादें वर्तमानपत्र काढावें, कोठें सामाजिक सभा स्थापन कराव्या, कोठें व्याख्यानें द्यावीं, पुस्तकें लिहून लोकांत ज्ञानाचा प्रसार करावा, कोठें आपण स्वतां व आपले कांहीं सोबती यांनीं अन्य देशांत जाऊन कांहीं कला शिकून घेऊन त्यांचा प्रसार येथें करावा अशा अनेक गोष्टी त्याच्या मनांत येत असत. त्यांपैकीं एकही चांगली रंगारूपास आलेली नव्हती; परंतु आज तें सर्व पारडें फिरलें. आज त्याच्या मनांत विशेष रंगारूपास आलेली अशी एक सुधारणा करण्याची कल्पना आली. आजपर्यंत नुसत्या धुक्याच्या स्थितींत असलेल्या कल्पनांत एका कल्पनेनें चांगलें घन-रूप धारण केलें. जर आपल्या हातून कांहीं होईल तर स्त्रीपुरुषशिक्षणमार्गाची सुधारणा होईल असें त्यास स्पष्ट दिसूं लागलें. ही शिक्षणाची गोष्ट पक्की मनांत धरून ती सुंदर तऱ्हेनें साध्य होईल ते ते उपाय आपणास साध्य केले पाहिजेत. हा विचार मनांत येण्याबरोबर त्याच्या चेहेऱ्यावर आनंदाची टवटवी दिसूं लागली. तो एकदम वेड्यासारखा उठला. त्या शेल्फजवळ गेला, त्यानें तीं दोनही पुस्तकें काढलीं व त्यांजकडे पाहूं लागला. पहिलें हातांत घेऊन तो एकदम इंग्रजींत म्हणाला: " मिलसाहेब, आपण माझ्या

मनाला जितकें उदात्तत्व दिलें तितकें दुसरें कोणीही दिलें नाहीं. तर मी आजपासून स्त्रियांच्या उन्नत्यर्थ झटेन. शपथपुरःसर झटेन!"

हे शब्द उच्चारते वेळच्या किंवा एकंदर त्या रात्रींच्या **गणपतरावा**च्या स्थितीचें अवलोकन जर एखद्या तिऱ्हाईतानें केलें असतें, तर **गणपतरावास** वेड लागलें असेंच त्यानें म्हटलें असतें. ज्यास त्याचा स्वभाव पक्का माहीत तो **नाना**ही त्यास प्रसंगविशेषीं वेडा म्हणत असे. मग इतरांची काय गोष्ट सांगावयाची आहे? गंभीरपणानें तें पुस्तक हातांत घेऊन व त्याच्या कर्त्यास हाक मारून तो निरीश्वरवादी असल्यामुळें नुसती साधी शपथ वाहून आपल्या मनाचा कृतनिश्चय करणें म्हणजे त्यास कांहींच वाटलें नाहीं. त्याला त्यांत उपहास्य कांहीं असेल, किंवा लोक आपल्यास अशा या कृतीबद्दल वेडा म्हणतील असें त्या वेळीं स्वप्नांतही आलें नाहीं. त्याचें मन अति गंभीरतेनें भरलें होतें. इकडे तिकडे म्हणून विचार गेलेच नाहीत. ही शपथक्रिया झाल्यानंतर तो बिछान्यावर जाऊन पडला. दिव्यांतील मेणबत्ती संपली हें त्याच्या ध्यानांतही आलें नाहीं.

तो आपल्या विचारांत निमग्नच होता. आतां विचार चालले होते हे फार निराळे होते. ते विचार मनांत येण्याबरोबर त्यास चांगलेंच हंसूं आलें; व तो एकदम आपल्याशींच मोठ्यानें म्हणाला, "वा! असं होईल तर मग काय पाहिजे! दोनहीकडून उत्कृष्ट व्यवस्था होईल. शाळा पण शाळा जमेल. अगदीं शेजारीं शेजारीं दोन इमारती. इकडे नवरा मुलांना शिकवितो आहे, तर तिकडे बायको मुलींना तोच विषय शिकविते आहे. इकडे नवऱ्याचा एक निबंध तर तिकडे बायकोचा दुसरा. ह्या गोष्टी कांहीं अशक्य नाहींत. माझ्यासारख्याच विचाराचे आणखी दोघे पाहिजेत म्हणजे जुळणार. **नाना** आणखी **विष्णुपंत** ही जोडी साधली पाहिजे म्हणजे काम फत्ते. **विष्णुपंता**ची बायको **यमुना**वहिनी हेडमास्तरणीचं काम करील. **नाना** अशीच छानदार बायको पाहून करील. आपली अशीच वेडीबागडी जेमतेम तयार करूं. आणखी—आणखी **नाना**कडून त्या बिचाऱ्या **गोदा**वरीला घरीं आणून तिलाही तयार करूं. ती फार लवकर तयार होईल. तिची बुद्धि फार विलक्षण आहे. काय त्या बिचारीची दशा. मी म्हणतों असं झालं तर तिला मरणापासून सुटल्यासारखं होईल. आणखी असं झालं, म्हणजे सगळ्याजणांनीं एका ठिकाणीं राहून सर्व काम सुरळित चालवावं. मग लोक काय पाहिजे तें म्हणेनात. त्याची पर्वा आपण करावी कशाला? मी तर त्या

लोकमताला लाथेनं तुडवीन. ' लोक काय म्हणतील ' हा बाऊ ! मी कधीं त्याला भिणार नाहीं. माझ्या मनाप्रमाणें हे दोघे बरीक वागले पाहिजेत, मग पहातों काय आहे तें. निदान **नाना**, मी, **नानाची** बायको, माझी बायको, आणखी **गोदावरी** इतकी मंडळी तरी एका ठिकाणीं असूं. **विष्णुपंत** आणि **यमुना**वहिनी आमच्या घरीं पडलेलीं असायचींच. मग वाचन काय, वादविवाद काय, सुधारणा काय, अगदीं रेलचेल उडणार. आपण तर अगदी जग हलवून सोडणार. ही सर्व गोष्ट **नानास** व **विष्णुपंतास** विचारून पाहिली पाहिजे. त्यांचे विचार काय आहेत हें तरी पाहूं या. "

इतका विचार करून तो पुन्हां गोंधळला. आपणाला ते काय म्हणतील आणि काय नाहीं असें त्यास वाटूं लागलें. आपण आतांपर्यंत जें काय विचारांनं अथवा उच्चारानें केलें तें सर्व इत्थंभूत कोणाला सांगितलें तर आपल्याला ते वेडगळ म्हणतील, आपला उपहास करतील, असें त्याला आतां वाटूं लागलें. **विष्णुपंत** जरी नाहीं तरी **नाना** खास हंसून आपण म्हणतों हें सारें स्वप्नवत् आहे असें प्रतिपादन करील. त्याला हे आपले विचार खरे वाटले तरी सुसंभाव्य वाटणार नाहींत. तो यास अगदीं ( Romantic ) निव्वळ कल्पनांतच ज्यांचा वास असावा असे आहेत असें म्हणेलच. पण आपण त्याला मोडून काढूं. **विष्णुपंताचें** साह्य मिळालें तर मग आपले हेतु पार पडण्याची कांहींच पंचाईत नाहीं. असे एक नाहीं अनंत विचार त्याचे मनांत येतां येतां त्याचा डोळा लागला. पण स्वप्नांतही त्यानें जागेपणीं कल्पनांनीं घातलेल्या शाळा, त्यास स्पष्टपणें दिसूं लागून जिकडे तिकडे स्त्रीशिक्षणाचा विजय झालेला त्यानें पाहिला.

वेडा बिचारा ! त्याला आपले विचार खरे होण्यास किती अडचणी आहेत आणि किती येतील याचा अंदाजही नव्हता. लोकरूढीसारखा महाप्रचंड डोंगर व त्यावर असणाऱ्या दुराग्रहाच्या, मात्सर्याच्या, आलस्याच्या प्रचंड शिला त्यास दिसल्या नाहींत. आपण उगीच हालचाल केली तरी आपल्यासारखेच शिकलेले परंतु लोकांचे दुराग्रह हे दुराग्रह नसून सुग्रहच आहेत असें दाखवून अज्ञ अशा जनसमूहाकडून वाहवा मिळविण्याच्या आशेचे आशाळभूत वीर, प्रवीर दंड थोपटून आपणांपुढें उभे राहातील; आपला उपहास करतील; आपल्या कार्यांत नसतीं विघ्नें आणतील; आणि खेडेगांवांत गेलेल्या विद्वान् ब्राह्मणाप्रमाणें आपली रिकामी फाजिती करतील; या गोष्टी त्याच्या गांवींही आल्या नाहींत.

दुसरे दिवशीं उठण्यास अर्थातच त्यास उशीर झाला. चांगले नऊ वाजले; तदनंतर मुखमार्जनादि विधि करून तो खोलींत आला तों त्यास एका गाडीवाल्यानें एक चिठ्ठि आणून दिली. ती चिठ्ठि **विष्णुपंता**कडून आलेली होती. त्या चिठ्ठींत मजकूर इतकाच होता कीं, " आज आमचे येथें कांहीं विशेष आहे. आपण जेवावयास आलें पाहिजे. **नाना**स आम्ही येथल्या येथेंच राहून घेतलें आहे. ऊन होईल म्हणून गाडी पाठविली आहे. आपण येतां तों पाटपानें मांडून बसतों. आपल्या येण्याचा अवकाश समजावा." ती चिठ्ठी पहाण्याबरोबर त्यानें गाडीवाल्यास थांबण्यास सांगितलें व आपण कोट वगैरे घालण्यासाठीं गेला. **विष्णुपंता**च्या येथें जेवावयास जावें कीं नाहीं असा प्रश्न त्याच्या मनांतही आला नाहीं. त्यांचा स्नेह बराच दाट होता. त्यांतून त्यानें ताबडतोब जाण्यास आणखीही दोन कारणें होतीं; एक तर आज आदितवार. कॉलेजांत रहाणाऱ्या मनुष्यास रविवारीं जेवावयास बोलाविल्यास तो कधींही अनमान करणार नाहीं. रोज दहांचा ठोका टळायचा नाहीं. परंतु रविवारीं दोन वाजेपर्यंत तांदूळही वैरले जात नाहींत. बिचारा आचारी भाज्या वगैरे आठ दिवसांच्या बेगमीचें सामान घेऊन येऊन भात पिठलें करून गड्याकडून बोलावणें पाठवील तेव्हां अन्नाची आणि प्राणांची भेट व्हावयाची. तेव्हां **गणपतराव** तरी असें चांगलें आमंत्रण आलें असतां उपासमार कां करून घेईल? दुसरें कारण आदल्या रात्रीपासून त्याच्या मनांत आलेले विचार. त्याला असें वाटलें कीं, जेवण झाल्यानंतर **नाना, विष्णुपंत** व आपण तिघे एका ठिकाणीं बसूं व आपले सर्व आदले दिवसाचे विचार त्या दोघांस सांगून त्यांचें काय मत पडतें तें पाहूं.

---

# प्रकरण १३ वें.

## तीन मित्र.

**असा** विचार करून तो पोषाख करून निघाला. गाडींत त्याचे अनेक विचार चाललेच होते. तरी ते सर्वथैव एकाच विषयावर होते असें नाहीं. त्यांत कांहीं इतर गोष्टींचेंही मिश्रण होतें.

**विष्णुपंता**च्या घरीं गेल्यावर यथास्थित जेवणखाण झालें. **नारोपंता**च्या आणि **राधाबाई**च्या मुलीचा बेत तो ! जेवणखाण वगैरे झाल्यानंतर **विष्णुपंता**च्या बसावयाच्या खोलींत ते तिघेही जाऊन बसले. विडा पानसुपारी खाल्ल्यावर **गणपतरावा**च्या मनांत आपला विषय काढावा असें आलें परंतु तो जरासा भीत होता. त्यानें प्रथम **नाना**, ज्या कामाकरितां गांवांत आला होता तें काम झालें न झालें वगैरे गोष्टींचा शोध केला. मग इतर बऱ्याच गोष्टी काढल्या. मनांतला आशय हा कीं, इकडल्या तिकडल्या गोष्टी चालतां चालतां सहज आपल्या विषयाची प्रस्तावना करावी. त्याच्या हेतूप्रमाणें बोलतां बोलतां सहज घडूनही आलें. **नाना**चा पुढील प्रश्न त्यास फायद्यावर पडला.

**नाना**:—आमचं सारं विचारून घेतलंत पण आपण काय केलं रात्रीं तें तर सांगा.

**गणपतराव**:—रात्रीं काय करायचं आहे ? रात्रीं वाचीत बसलों होतो झालं. एक फार मजेदार पुस्तक काल वाचलं बोवा. अँथनीट्रॊलोपचं डॉक्टर वर्टल्स् स्कूल. तुम्हीं वाचलंय् कांहो **विष्णुपंत** ? आमच्या **नानां**ना विचारायलाच नको. नॉव्हेल म्हटलं कीं त्यांना अगदीं शांतं पापम् होऊन जातं.

**विष्णुपंत**:—तें पुस्तक फार मजेचं आहे म्हणून मीं ऐकलं आहे खरं. वाचलं नाहीं अजून. वाचायला वेळच होत नाहीं काय करावं ? काय आहे हो त्यांत ?

**गणपतराव**:—आतां काय सांगूं त्यांत काय आहे तें ? फार मजेदार प्रश्न घेऊन त्यावर तें पुस्तक लिहिलेलं आहे. विवाहाच्या प्रश्नाची फार उत्तम तऱ्हेनं फोड केली आहे. तुम्हाला आमच्या या **नाना**च्या बहिणीची—**गोकूताई**ची हकीकत ठाऊक आहेना ? तिच्यासारखी स्थिति त्यांत वर्णन केलेली आहे. फार फार सुंदर पुस्तक. तुम्ही अवश्य वाचा. मी अजून शेवटपर्यंत गेलों नाहीं. पण अर्ध अधिक तीनचतुर्थांश वाचलं काल म्हणाना. **नाना**, तूं नेहमीं म्हणत असतोसना कादंबऱ्यांत, गोष्टींत खरेपणाचा भाग अगदीं थोडा असतो म्हणून ? तूं तर मग तें अगदीं अवश्य वाच. पुस्तक अगदीं लहान आहे. टाईप खूप मोठा आहे. निव्वळ जगांतल्या गोष्टी पाहून कांहीं गोष्टी लिहिलेल्या असतात अशी तुझी खात्री होऊन कादंबऱ्यांविषयीं तुझा जो वाईट ग्रह आहे तो अगदीं जाईल.

“ छे. छे. माझं असं नाहीं म्हणणं, कीं कादंबऱ्यांत आणखी नाटकांत मुळींच खरेपणा नसतो. मी म्हणतों इतकंच कीं, त्यांत थोडयाशा खरेपणांत पुष्कळसा खोटेपणा घालून सगळी सृष्टि बनवलेली असते. त्याखेरीज असा जो त्यांचा चटका लागून रहातो, तो लागून रहायचा नाहीं. ”

“ वा ! फार चांगला युक्तिवाद आहे बाबा हा तुझा ! मी आतां तुला एकच उघड उघड प्रश्न विचारतों. समज, तुझी ही बहीण **गोदूताई** आहे. हिच्या लहानपणापासून तिची आणखी तुझी, तुझ्या आईची, चुलतीची, चुलत्याची, आणखी माझी कां म्हणेनास त्यांतच ? इत्थंभूत हकीकत कोणीं लिहिली तर ती चटका लावण्यासारखी होईल कीं नाहीं ? अरे, तुला लहानपणापासून सर्व प्रकारांनीं झालेला त्रास, वेळोवेळीं आलेल्या अडचणी, तुझ्या बहिणीच्या लग्नाची हकीकत, तिला पुढें होत असलेला त्रास, नुकता नुकता तुझा होत असलेला छळ, इतक्या गोष्टी जर कोणी जशा घडल्या तशा लिहिल्या तर तुला काय वाटेल ? खऱ्या वाटतील कीं खोटया वाटतील ? ” इतका प्रश्न करून **गणपतराव,** “ यावर आतां कसचं तूं उत्तर देणार ? ” असें म्हणणारी मुद्रा करून उत्कंठित नेत्रांनीं **नाना**कडे पाहूं लागला.

“ जशाच्या तशाच लिहिल्या तर खऱ्या वाटतील हें उघडच आहे ! ” असें **नाना**कडून उत्तर आलें. त्याबरोबर “ ठीक. ठीक. आतां तुला अनुभवच आहे त्या गोष्टींचा, म्हणून तूं म्हणशील त्या खऱ्या. पण माझी खात्री आहे कीं, ज्यांनीं कधीं जन्मांत **गोदूताई**सारख्या हालअपेष्टांत वाढलेली, आणखी असलेली स्त्री पाहिली नाहीं, ते ती सारी अतिशयोक्ति म्हणून उठणार ! चालच ती ! मनुष्याला वाटतं, कीं जी गोष्ट आपण कधीं पाहिली किंवा ऐकली नाहीं, ती जगांत असूं शकेल कशी ? पण असा विचार करीत नाहींत हे लोक, कीं कल्पना तरी येणार कुठली, प्रत्यक्ष कांहींतरी त्यांत असल्याखेरीज ? तशीच आणखी एक मजा असते. माझ्यासारख्या एखाद्या माणसाला कांहीं एक करायची कल्पना सुचते, पण ती तो तुझ्यासारख्याजवळ सांगायला आला पुरे, कीं तूं लागलीच ‘ छे. कांहींतरी वेडगळ विचार आहे. त्यांत कांहीं तात्पर्य नाहीं ! तें अशक्यच आहे. ’ असं म्हणायला लागतोस हें कां ? मला तर वाटतं कादंबऱ्या खोटया म्हणायला जें कारण तेंच याही ठिकाणीं असतं. पुरतं ऐकून घ्यायचं नाहीं, त्याचा विचार करायचा नाहीं, वर वर ऐकण्याबरोबर एखादी गोष्ट त्यांत आपल्या अनुभवाच्या

बाहेर दिसली, कीं दे ठोकून खोटी, कुचकामाची म्हणून, अन् कर त्या माणसाची टर !........... ”

“ अरे वा ! आज कांहीं तरी स्वारी निराळंच डोक्यांत घेऊन आली आहे बरं का **विष्णुपंत** ? त्याच्याखेरीज कांहीं ही एवढी जोराची प्रस्तावना दिसत नाहीं. हा आमच्यावर जो एवढा वर्षाव चालला आहे, तो कांहींतरी हेतूखेरीज कांहीं दिसत नाहीं ! ”

“ हें पहा, **विष्णुपंत,** मी म्हणतों त्याला लागलींच हें उदाहरण पहा !” **गणपतराव** मोठ्या जोरानें म्हणाला. “ आम्ही जरी कांहीं आणलं असलं आपल्या डोक्यांत, तरी पण तुम्ही ऐकून घ्याल कीं नाही ? का नुसतं ‘आज यांनीं आणलं आहे बरं का कांहीं डोक्यांत ’ असं म्हणून टरच उडवणार ? ”

“ नाहीं रे बोआ, कोण तुझी टर उडवायला बसला आहे ? बोल काय तुझ्या मनांत आलं आहे तें. सारी रात्र झोंप लागली नसावी, त्याच्यामुळें असा रंग दिसतो आहे ! ” **नाना** त्यावर म्हणतो.

कांहीं नाहीं ! मी तुम्हांला आधीं असं विचारतों कीं, हें असं किती दिवस चालायचं ? नुसतं बाष्कळपणाचं बोलणं, आणखी कृति कांहींच नाहीं. हें चालायचं किती दिवस ? अहो, एक जर कांहीं मनोभावानं करील तर शपथ; ज्यानं उठावं त्यानं अद्वातद्वा बोलावं, करूं नये कोणींच कांहीं. आणखी आतां तिसरा एक पंथ निघाला आहे, त्याची तर कांहीं कमालच आहे. त्यांनीं आपण स्वतः कांहीं करूं नये. ‘करा’ म्हणतील त्यांनाही शिव्या द्याव्या आणखी ‘ न करा ’ म्हणतील त्यांनाही पुष्पांजलि करावी. छे ! सभोंवार पहावं तर कुठेंच आशेला जागा दिसत नाहीं. ही स्थिति तुह्मांला बरी वाटते का ? मी म्हणतों कांहीं तरी हातानं करण्याची वेळ अजून आली नाहीं का ? अरे, आहे काय ? कांहीं तरी विचार ? एक म्हणतां एक गोष्ट आमच्या हातून होऊं नये ? ”

हें **गणपतरावा**चें बोलणें कोणास तरी उद्देशून होतें असें म्हणण्यापेक्षां तो आपल्याशींच मोठ्यानें बोलत होता असें म्हटलें तरी चालेल. त्याची चर्या या वेळीं आतुरतेनें फारच पाणीदार दिसत होती; ते आधींच मोठाले डोळे, तो जसजसा अधिकाधिक आवेशांत येऊं लागला तसतसे अधिकाधिक मोठाले दिसूं लागले. ओंठ बोलतांना थरथर कांपूं लागले. तो जें काय बोलत होता, त्यांत त्याचें अंतःकरणसर्वस्व गढून गेलें आहे असें दिसलें. वर सांगितलेलें बोलणें झाल्याबरोबर, कोणी कांहीं आपल्या बोलण्यावर

उत्तर करतें आहे कीं काय हें पहाण्यासाठीं म्हणण्यापेक्षां, तो किंचित् विसांवा घेण्यासाठींच थांबला म्हटलें तरी शोभेल; कारण, एक लवमात्र त्यानें थांबून उसासा टाकला नाहीं तोंच तो पुनः आवेशानें म्हणतोः—

"**नाना, विष्णुपंत,** मी म्हणतों यांत तिळमात्र तरी खोटं आहे का ? तुह्मीच पहा, डेक्कन कॉलेज म्हणजे शिक्षित लोकांचं आगर ना ? इतके शिकलेले लोक, अगदीं तरुण, नेहमीं एकमेकांच्या सहवासांत असणारे, असे दुसऱ्या कोठें तरी सांपडतील काय ? पण एकजण तरी त्यांत खरोखर कळकळीनं विचार करणारा ? एकजण तरी आपल्यावर पुढे जबाबदारी केवढी आहे हें जाणून असणारा ? तुह्मांला आठवतं आहेना ? यूनिअन क्लबाला सजीव करण्याचा मीं यत्न केला, तेव्हां काय मारामाऱ्या झाल्या त्या ? ते दिवशीं मला तर असं वाटलं कीं, हा मीं आपला बालविवाहावरला पेपर गाढवांच्या पुढें नेऊन वाचला असता, तर त्यांनींदिखील जास्त रसिकता दाखविली असती ! झालं ! ते दिवसापासून पुढें कधीं कोणी कशाला यूनिअन क्लबाचं नांव काढलं आहे ? तसेंच आमचे हे शुक्रवारचे ' डिबेटिंग क्लब ' दोन दिवस टुरटुर झाली कीं, तिसरे दिवशीं बंद, अन् जी टुरटुर होईल ती कधीं नीट व्हायची आहे का ? तींतही नुसते शब्दाचे वाद. छे ! या कॉलेजांत येण्यापूर्वीं काय मला त्याचं महत्त्व वाटत होतं ! वाटे कीं, केवढं हें विद्यापीठ ! काय विचारी व विद्वान् लोक असतील इथें ! आपण किती यःकश्चित् ! तिथें जाऊन निभावणार कसं ? आठवतंयना तुला, **नाना,** आपण या कॉलेजाविषयीं काय काय बोलत असूं तें ? आ-णखी आपल्या काय काय कल्पना होत्या त्या ? एक, एक तरी खरी व्हायची होती ? तें कांहीं नाही. हे साहेब लोक आमच्यावर राज्य करताहेत. तर आम्ही त्यालाच योग्य आहोंत. काय हो **विष्णुपंत,** बोलत नाहीं तुम्ही मुळींच ? सांगा. मी म्हणतों हें खरं का खोटं तें ! "

" धडधडीत ज्या गोष्टी दिसताहेत, त्यांना खोटं म्हणेल कोण ? " **विष्णुपंत** सखेद शांतपणानें म्हणाले.

" मग ? याला कांहीं उपाय ?—याला उपाय काढायचा कोणीं ? हा सगळा मठ्ठपणा घालवायला पाहिजे कीं नको ? काय **नानासाहेब ? नाना-साहेब** काय ? आम्हांला मूर्ख समजून मनांतल्या मनांत नेहमीं हंसत असलात झालं ! "

यावर **नाना** हंसत हंसत म्हणतो, " अरे, मूर्ख समजून कांहीं हंसत नाहीं, पण उतावळा—धायकुत्या कां म्हणेनास ?—समजून बरीक हंसायला येतं मला. अरे, तूं असा विचार करीत नाहींस, कीं कोणतीही गोष्ट म्हटल्याबरोबर,— म्हटल्याबरोबर दिखील नव्हे, मनांत आणल्या. बरोबर— झाली पाहिजे म्हटलं तर होणार कशी ? याला किनई, **विष्णुपंत**, आज बालविवाह बंद झाला पाहिजे आहे. लागलीच पूर्वींच्यासारखें स्वयंवर सुरू झालें पाहिजे आहे. पुनर्विवाह एकदम रूढ झाला पाहिजे. केशवपनाचं नांव निघालं म्हणजे तर याचें जें काय होतं तें कांहीं विचारूंच नका. स्त्रीशिक्षण म्हणजे तर किती पाहिजे, आणखी किती नाहीं ! जिकडे तिकडे मिस् फॅासेटसारख्या........."

" चल ! " **गणपतराव** एकदम त्रासून म्हणतो: " अशी विनाकारण टर कां उडवतोस ? बोलल्या घटकेला झालं पाहिजे असं मीं एकदां तरी म्हटलं ? तूं तरी मोठा इरसालच दिसतोस मला !"

" यांत इरसालपणा काय झाला बाबा ? " **नाना** पुनः हंसत हंसत म्हणतो.

" नाहीं तर काय ? मला जें जें खरोखर वाटतं, तें तें मी तुझ्याजवळ बोलतों, याचा हा असा परिणाम वाटतं ? वा !—अन् मी म्हणतों, हो मला अगदीं आज या वेळी वाटतं आहे, कीं बालविवाह बंद होऊन मुली मोठ्या झाल्यावर आपल्या मनाप्रमाणें त्यांनीं लग्नं करावीं, पुनर्विवाह झाला तर त्याबद्दल कोणाला आश्चर्य म्हणून वाटूं नये. पुरुषांप्रमाणेंच बायकांचीं कॅालेजं होऊन त्या बी. ए, एम्. ए. व्हाव्या. मग काय ह्मणतोस ?"

" म्हणायचंय् काय ! तूं आकाशांत भराऱ्या मारून व्यर्थ आपल्या जीवाला त्रास करून घेतो आहेस एवढंच म्हणायचं. दुसरं कांहीं नाहीं. "

" बरं, आह्मी आकाशांत भराऱ्या मारतों, पण तुम्ही जमिनीवर राहून काय करतां तें सांगा कीं ? तुम्ही तर पाताळांतच चाललां आहां. "

" आम्ही कांहीं पाताळांत चाललों नाहीं. जमिनीवर राहून डोकं नीट ताळ्यावर ठेवून हळू हळू सारं होत आहे एवढंच म्हणतों, " **नाना** शांतपणानें ह्मणाला.

" हळू हळू सारं होतं आहे, मग तुम्ही काय करणार ? होतं आहे हें होतंच आहे. त्यांत तुमची काय प्रतिष्ठा राहिली ? तुम्ही काय करतां आहां

तें सांगा. इंग्रज लोक आहेतच उरावर. त्यांचं वजनच जास्त तेव्हां ते तुम्हांला दडपणारच. मरायचं नसलं तर थोडीबहुत चळवळ केलीच पाहिजे. त्याप्रमाणें करतां आहां यांत नवल काय ? नाहीं केलंत तर नायनाट होईल. उद्यां तुम्ही म्हणाल ' पहा, आम्ही आगगाडींत बसून जातों, आगगाडींत बसल्यावर महारपोरांचादेखील विटाळ मानीत नाहीं. ' लेको, मानून करतां काय ? तेव्हां या अशा गोष्टी कांहीं उपयोगाच्या नाहींत. तुम्ही स्वतः आपल्या इच्छेनं काय गोष्टी करतां आहां त्या सांगा. तें पाणीच नाहीं. आणखी, तें पाणी नाहीं, सगळा नेभळेपणा भरला आहे, तेव्हां मग म्हणायचं, आम्हांला हें नको आहे आणखी तें नको आहे. लोकांवर असा जुलूम नको, आणखी तसा नको. छट् ! या अशल्या बोलण्यांत कांहीं तात्पर्य नाहीं ! ''

" मग आपल्या मनांतून काय करावं आपण असं आहे ? ''

" अमुक करावं असं कांहीं माझं म्हणणं नाहीं. पण कांहीं तरी केलं पाहिजे. दिवसानुदिवस हा निष्काळजीपणा, ही बेबंदशाही किती माजूं द्यायची ? त्याला बंधारा घालायला तुमच्या आमच्यासारख्या शिकलेल्या लोकांनीं कांहीं तरी तजवीज करायला नको का ? हे कित्येक लोक नुसते सुधारणेला शिव्या देतात ते तरी बरे मी म्हणतों; कारण, ते आपल्या मताप्रमाणें योग्य तें करून कांहीं चळवळ तरी करतात; पण हे जे दुसरे— सुधारणा तर पाहिजे, अमुक चाल नवीन आली पाहिजे, तमुक चाल तर नाहींशी केली पाहिजे, असं म्हणतात, पण कोणीं कांहीं मार्ग काढला कीं त्याची टर उडविण्याची तजवीज करूं लागतात, त्याची तजवीज काय ? त्यांना ताळ्यावर आणायला काय करतां ? बोला. ''

" होय. कांहीं तरी तजवीज केली पाहिजे खरी. पण आपल्या सध्यांच्या स्थितीला काय करणार आपण ? '' **विष्णुपंत** शांतपणानें विचारतो.

" सध्यांची एक स्थिति असो हो ! '' **गणपतराव** झट्कन् आतुरतेनें म्हणतोः " तुमची आमची काय नेहमीं तीच स्थिति रहाणार आहे कीं काय ? उद्यां परीक्षाबिरीक्षा संपल्यावर कांहीं तरी मार्गाला लागणारच कीं नाहीं ? तेव्हां त्याचा विचार आजपासून करून ठेवायला नको का ? ''

" करूं ! करूं ! '' **नाना** स्वस्थपणें म्हणतोः " अशा गोष्टींत अशी उतावळी करून कसं चालणार ! तुम्ही आम्ही एका ठिकाणीं राहूं, कांहीं

तरी एक धंदा काढूं. आणखी मग आपल्या मनांत जें जें कांहीं आहे तें तें होईल तसं तसं करूं. थोडं धीरानं घे. तूं म्हणशील त्या सगळ्या गोष्टी घडवण्यासाठीं आपण स्वत: झटूं. तूं असा उतावळा होऊं नको. "

"पुरे." नानानें, स्वस्थपणानें कां होईना परंतु वर लिहिलेले हे धीराचे व उत्तेजनाचे शब्द उच्चारले, एवढ्यानेंच गणपतरावाची तब्यत खुष झाली व तो आनंदानें नानाच्या पाठीवर हात मारून म्हणतो, "अस्सं कांहीं तरी बोलत जा, म्हणजे ठीक. नाहीं तर तें आपल्या हातून कसं होईल ? सध्यांची ती वेळच नव्हे, सध्यांचा तो काळच नव्हे, अशा रड-गाण्याच्या गोष्टी नाहीं बाबा आपल्याला उपयोगी ! विष्णुपंत, इकडे पहा, मी आतां माझ्या मनांत काल रात्रीं काय काय गोष्टी आल्या आणखी पुढें कसं कसं करावंसं मला वाटतं तें सांगतों; मारून फडशा उडवून दिला पाहिजे हो या आचरट चालींचान् फाजील बंधनांचा ! "

असें म्हणून बिचारा गणपतराव जीव तोडतोडून आदले दिवशीं रात्रीं त्याच्या डोक्यांत ज्या ज्या विचारांनीं प्रळय करून सोडला होता, ते ते सारे विचार त्या आपल्या दोघां मित्रांजवळ सांगू लागला. ते सांगत अस-तांना, त्याची ती आतुरता, त्याचा तो आवेश, त्याचे ते हातवारे, त्याची ती कळकळ, त्याची प्रचंड आशा, आपल्या हातून काय होणार नाहीं ? मनांत आणल्यास सर्व कांहीं करूं असें पक्कें वाटत असल्यामुळें एकंदर बोलण्यांत दिसणारी उमेद इत्यादि गोष्टींचें यथायोग्य वर्णन होणें अशक्य !

त्या त्याच्या दोघां स्नेह्यांनीं त्याचें तें सर्व बोलणें स्वस्थपणें ऐकून घेतलें. त्यावर नाना तऱ्हेचीं बोलणीं निघून अगदीं संध्याकाळ झाली तरीही त्यांची भवतिनभवति चाललीच होती; त्यांत मनोराज्याचा भाग किती होता, सद्य:स्थितीला धरून किती होता, वगैरे गोष्टी सांगून कांहीं उपयोग नाहीं. इंग्रजी शिक्षणानें ज्यांचीं मनें विकासित झालीं आहेत, आहे या स्थितींत यत्किंचितही दोष नाहीं असें वाटण्याजोगा वृथा देशाभिमान ज्यांच्या अंगांत शिरला नाहीं, ज्यांना खरोखर आपल्या हातून कांहीं तरी व्हावें असें वाटत आहे, व जगाचा आणि सद्य:स्थितीचा अनुभव नसल्यामुळें लवकर म्हणा, उशीरां म्हणा, पण आपल्या हातून आपल्या इच्छेप्रमाणें कांहीं तरी होईल अशी खात्री वाटत असते, असे चार तरुण होतकरू उमेद-वार, एका मनाचे, अत्यंत स्नेही, जमले व त्यांत गणपतरावासारखा विशेष आतुर, विशेष उतावळा एखादा असला, म्हणजे जें काय गोष्टीसुख

होत असतें तें कांहीं अनुपम आहे. त्याचें वर्णन करूं येणें अशक्य. त्यांतून आणखी त्यांत जिला सर्व कांहीं समजतें आहे, जी पुढेंमागें आपल्या सर्व कृत्यांत खात्रीनें मदत करील, अशी एखादी तरुण मित्रपत्नी दुरून ऐकत असली म्हणजे तर त्या आनंदास कांहीं मर्यादाच नाहीं.

**गणपतराव, नाना** व **विष्णुपंत** आणि थोडीशी पलीकडे बसून यांचें सर्व बोलणें चित्त लावून ऐकत असलेली **लक्ष्मीबाई** इतकी मंडळी त्या ठिकाणीं होती. पहिली तिघें बोलत होतीं, **लक्ष्मीबाई** पूर्ण मन लावून ऐकत होती. मला वाटतें, आपण मधें बोलावें असेंही पुष्कळदां तिच्या मनांत आलें, परंतु **गणपतराव** व **नाना** यांच्या समक्ष ती अजूनपर्यंत कधींच बोलली नसल्यामुळें तिला संकोच वाटला असावा.

बोलतां बोलतां किती तरी उशीर झाला. अगदीं संध्याकाळ झाली. **लक्ष्मीबाई** नाइलाजास्तव उठून घरांत गेली. पुनः जेवणाची वेळ झाली तेव्हां त्यांच्या गोष्टी संपल्या-नव्हे, त्यांना संपवाव्या लागल्या. **विष्णुपंता**नें पुनः त्यांस जेऊन सकाळीं जाण्याविषयीं आग्रह केला. परंतु दुसरे दिवसाचे अभ्यास सगळेच राहिले. सकाळीं जाण्यास उशीर झाल्यानें नुकसान होईल हें जाणून **नाना**च्या सूचनेवरून सर्वच मंडळींनीं जेऊन रातोरात कॉलेजांत जावें असा विचार केला. इतक्यांत **गणपतराव नाना**च्या पाठीवर हात मारून हंसत हंसत व आनंदानें डोळे मिचकावीत म्हणतो: " अरे; आपण एक दोघे कॉलेजांत दुःखांत पडणार तर पडणार, पण बिचाऱ्या **विष्णुपंता**ला रे कां सुखांतून नेतोस ? आपण आज आतां बोललों त्या सर्व गोष्टी **लक्ष्मी**वहिनींनीं ऐकल्याच आहेत. त्यांच्याशीं कांहीं तरी त्यासंबंधानं बोलूं दे. **नानाला** किनई, **विष्णुपंत**, अजून कांहीं रसिकताच आली नाहीं. " **गणपतराव** आज फार खुष झाला होता. आपल्या मनांतल्या सर्व गोष्टी आपण यथास्थितपणें ओकून टाकल्या आणि त्या त्याचें महत्व जाणणाऱ्या स्नेह्यांनीं ऐकून त्याबद्दल धीराचे उद्गार काढले यामुळें त्या सर्व गोष्टी आपल्या मनाप्रमाणें घडून आज सर्वथैव जिंकली असें वाटल्यासारखेंच त्यास झालें होतें.

**गणपतरावा**चे ते विनोदपर शब्द ऐकून **विष्णुपंत नाना**कडे पाहून म्हणतो, " येईल, त्यांना आतां लवकरच तो रसिकपणा येईल. आतां फार अवधि नाहीं लागायची. आमचं काय आतां जुनं झालं, अन् असल्या गोष्टी आम्ही कितीकदां बोललों आहोंत म्हणतां ! काय करावं मीं तिला

दोनचारदां म्हटलं तूं कांहीं संकोचूं नकोस; खुशाल येऊन बसत जा आमच्या गोष्टी ऐकायला म्हणून; पण ती कांहीं ऐकत नाहीं. ”

“ कां बरं ? त्यांना सगळ्या गोष्टी समजताहेत मग काय ? बोआ, आमच्यासारखा अगदीं गांवढळपणा असता, तर असो तरी. ”

“ कां ? तुमचा कशानं झाला गांवढळपणा ? ”

“ अहो ! गांवढळपणाच तर काय ? कांहीं येत नाहीं, कांहीं समजत नाहीं. ”

“ कां ? असं कां ? ”

“ अहो असंच आहे. यांच्या तेवढ्या तोंडाच्याच बाता. अगदीं सब्बाहात लांब. ” **नाना** डोळे मिचकावीत व हंसत **गणपतरावा**कडे पाहून म्हणतो.

**गणपतराव** तें ऐकून किंचित् ओशाळला, परंतु लागलीच म्हणतोः— “ तुम्हीच सांगा, **विष्णुपंत**, माझी तिची ओळख झाल्यापासून मी इकडे कॉलेजांत आहें. मग कसं शिकवायचं ? आणखी कोणी शिकवायचं ? त्यांतल्या त्यांत साधेल तेवढं करून मीं तिला शिकवलं आहे. तुमची एक गोष्टच निराळी आहे. **नाना**ची तर बोलूंच नका.—अन् दम धरा अं ? मी एक तुम्हांला प्रश्न विचारतों. आम्ही नुसत्या गप्पा मारतों. कबूल आहे; पण आमच्या गप्पांचा आणखी आतुरतेचा केवढा उपयोग कधीं कधीं होत असतो ठाऊक आहे ? ”

“ हो ! ” **नाना** तावडतोब म्हणतो.

“ काय ? ” **गणपतराव** विचारतो.

“ घटकाभर मौज ! ” **नाना** हंसत हंसत म्हणतो.

“ बरं. बरं. अरे, वा रे वा ! तुझी मौज ! ” **गणपतराव** लागलींच त्याला म्हणतो, “ **विष्णुपंत**, आमच्या गप्पांनीं आणखी आतुरतेनं घटकाभर मौज होते ही तर गोष्ट खरीच; पण त्या घटकाभर मौजेनं कित्येकांच्यावरलं जन्माचं संकट जात असतं बरं का ? अरे गृहस्था, मीं जर तुझ्या कपाळाशीं किटकिट लाविली नसती, माझ्या गप्पांनीं तुला “ घटकाभर मौज ” केली नसती, तर आतां तूं “ जन्मभर मौज ” मारशील ती तुला कशी मिळाली असती ! ती सांजोरीची डुचकी, लंगडी, खडबडीत तोंडाची अशी घोरपड गळ्यांत घेत होतासना बांधून !—अगदीं लग्नासाठीं जायला

दृढ असा होता. पण ज्या ठिकाणीं सर्वच गोष्टी चिंतेला कारण, तेथें काय करणार ? विनोबासारख्या पाजी मेहुण्याच्या पाजीपणाच्या कृति नेहमीं कानावर आल्यावर आपल्या बहिणीच्यासंबंधानें त्याला किती काळजी वाटत असेल याची कल्पना कोणाला होणार आहे ? **गणपतरावा**प्रमाणें त्यानें कधीं मोठमोठ्यानें आपल्या मेहुण्यास शिव्या दिल्या नाहींत, परंतु त्याच्या मनांत फार फार वाईट वाटत असे. इलाज काय होता ? बहिणीला कोठें नेऊन ठेवीन ह्मणेल, तर कोठें तरी जागा ? आईला ठेवलें, तेथेंच तिला ठेवावयाचें, तर मामावर एक ओझें घातलें होतें, तेथेंच आणखी एक घालायचें असा अर्थ. बरें इतकेंही करून नेऊन ठेवल्यावर जर का तिच्या नवऱ्यानें तेथें जाऊन सगळ्याच माणसांचा छळ चालविला तर काय करायचें ? धर्म करतां कर्म उभें राहिलें असें मामाला होऊन जायचें. तेव्हां आपण बी. ए. होऊन कांहीं तरी करूं लागेपर्यंत जें आहे तेंच ठीक असें म्हणून तो आपल्या चिंतातुर मनाला समाधान देत असे.

तथापि असे कधीं कधीं दिवस येत असत, कीं ते दिवशीं, त्याला आपला अभ्यास वगैरे कांहीं न सुचून, मन अतोनात उद्विग्न होऊन जाई. **गणपतरावा**ची अशी गोष्ट होती कीं, आशा उपजून अत्यंत आनंद होण्यालाही त्याला यत्किंचित् कारण झालेलें पुरे, आणि निराशा होऊन अत्यंत खिन्नता येण्यालाही फार थोडें कारण पुरत असे, तशी **नाना**ची गोष्ट नसे. त्याला कोणत्याही गोष्टीपासून बरें वाटण्याला जितकीं सबळ कारणें लागत, तितकीच खिन्नता उपजविण्यालाही लागत. सध्यांच्या काळीं खिन्नता उपजण्याला जितकीं म्हणून सबळ कारणें असावयाचीं तितकीं होतीं—नव्हे, पाहिजेत त्याच्यापेक्षांही जास्त सबळ होतीं म्हणण्यास हरकत नाहीं. असें असतांही तो धीरानें पुढें पाऊल टाकीतच होता, ही मोठी आश्चर्याची गोष्ट. असो. आतां वर सांगितलेंच आहे कीं, तो इतका धीम्मा व शांत होता, तरी कधीं कधीं असा दिवस उगवे, कीं ते दिवशीं त्याला कांहीं सुचत नसे, आणि त्याला आपल्या भावि स्थितीवरच विचार करीत बसावें असें वाटे. आजचा दिवस त्यांतला होता.

सकाळीं सहासात वाजले नाहींत तोंच त्याला कोणी येऊन सांगितलें कीं, तुमचा मेहुणा कांहीं चोरीच्या ठपक्यांत सांपडला आहे. अजून पोलिसांत प्रकरण गेलें नाहीं, तुम्ही जाऊन कांहीं तडजोड काढाल, तर मिटण्याचा संभव आहे, नाहीं तर चारसहा महिने तुरुंगांत खास पडणार. त्यानें

दोनचारदां म्हटलं तूं कांहीं संकोचूं नकोस; खुशाल येऊन बसत जा आमच्या गोष्टी ऐकायला म्हणून; पण ती कांहीं ऐकत नाहीं. "

" कां बरं ? त्यांना सगळ्या गोष्टी समजताहेत मग काय ? बोआ, आमच्यासारखा अगदीं गांवढळपणा असता, तर असो तरी. "

" कां ? तुमचा कशानं झाला गांवढळपणा ? "

" अहो! गांवढळपणाच तर काय ? कांहीं येत नाहीं, कांहीं समजत नाहीं. "

" कां ? असं कां ? "

" अहो असंच आहे. यांच्या तेवढ्या तोंडाच्याच वाता. अगदीं सव्वाहात लांब. " **नाना** डोळे मिचकावीत व हंसत **गणपतरावा**कडे पाहून म्हणतो.

**गणपतराव** तें ऐकून किंचित् ओशाळला, परंतु लागलीच म्हणतोः—

" तुम्हीच सांगा, **विष्णुपंत**, माझी तिची ओळख झाल्यापासून मी इकडे कॉलेजांत आहें. मग कसं शिकवायचं ? आणखी कोणी शिकवायचं ? त्यांतल्या त्यांत साधेल तेवढं करून मीं तिला शिकवलं आहे. तुमची एक गोष्टच निराळी आहे. **नाना**ची तर बोलूंच नका.—अन् दम धरा अं ? मी एक तुम्हांला प्रश्न विचारतों. आम्ही नुसत्या गप्पा मारतों. कबूल आहे; पण आमच्या गप्पांचा आणखी आतुरतेचा केवढा उपयोग कधीं कधीं होत असतो ठाऊक आहे ? "

" हो ! " **नाना** तावडतोब म्हणतो.

" काय ? " **गणपतराव** विचारतो.

" घटकाभर मौज ! " **नाना** हंसत हंसत म्हणतो.

" बरं. बरं. अरे, वा रे वा ! तुझी मौज ! " **गणपतराव** लागलींच त्याला म्हणतो, " **विष्णुपंत**, आमच्या गप्पांनीं आणखी आतुरतेनं घटकाभर मौज होते ही तर गोष्ट खरीच; पण त्या घटकाभर मौजेनं कित्येकांच्यावरलं जन्माचं संकट जात असतं बरं का ? अरे गृहस्था, मीं जर तुझ्या कपाळाशीं किटकिट लाविली नसती, माझ्या गप्पांनीं तुला " घटकाभर मौज " केली नसती, तर आतां तूं " जन्मभर मौज " मारशील ती तुला कशी मिळाली असती ! ती सांजोरीची डुचकी, लंगडी, खडबडीत तोंडाची अशी घोरपड गळ्यांत घेत होतासना बांधून !—अगदीं लग्नासाठीं जायला

दृढ असा होता. पण ज्या ठिकाणीं सर्वच गोष्टी चिंतेला कारण, तेथें काय करणार ? विनोबासारख्या पाजी मेहुण्याच्या पाजीपणाच्या कृति नेहमीं कानावर आल्यावर आपल्या बहिणीच्यासंबंधानें त्याला किती काळजी वाटत असेल याची कल्पना कोणाला होणार आहे ? **गणपतरावा**प्रमाणें त्यानें कधीं मोठमोठ्यानें आपल्या मेहुण्यास शिव्या दिल्या नाहींत, परंतु त्याच्या मनांत फार फार वाईट वाटत असे. इलाज काय होता ? बहिणीला कोठें नेऊन ठेवीन ह्मणेल, तर कोठें तरी जागा ? आईला ठेवलें, तेथेंच तिला ठेवावयाचें, तर मामावर एक ओझें घातलें होतें, तेथेंच आणखी एक घालायचें असा अर्थ. बरें इतकेंही करून नेऊन ठेवल्यावर जर का तिच्या नवऱ्यानें तेथें जाऊन सगळ्याच माणसांचा छळ चालविला तर काय करायचें ? धर्म करतां कर्म उभें राहिलें असें मामाला होऊन जायचें. तेव्हां आपण बी. ए. होऊन कांहीं तरी करूं लागेपर्यंत जें आहे तेंच ठीक असें म्हणून तो आपल्या चिंतातुर मनाला समाधान देत असे.

तथापि असे कधीं कधीं दिवस येत असत, कीं ते दिवशीं, त्याला आपला अभ्यास वगैरे कांहीं न सुचून, मन अतोनात उद्विग्न होऊन जाई. **गणपतरावा**ची अशी गोष्ट होती कीं, आशा उपजून अत्यंत आनंद होण्यालाही त्याला यत्किंचित् कारण झालेलें पुरे, आणि निराशा होऊन अत्यंत खिन्नता येण्यालाही फार थोडें कारण पुरत असे, तशी **नाना**ची गोष्ट नसे. त्याला कोणत्याही गोष्टीपासून बरें वाटण्याला जितकीं सबळ कारणें लागत, तितकीच खिन्नता उपजविण्यालाही लागत. सध्यांच्या काळीं खिन्नता उपजण्याला जितकीं म्हणून सबळ कारणें असावयाचीं तितकीं होतीं—नव्हे, पाहिजेत त्याच्यापेक्षांही जास्त सबळ होतीं म्हणण्यास हरकत नाहीं. असें असतांही तो धीरानें पुढें पाऊल टाकीतच होता, ही मोठी आश्चर्याची गोष्ट. असो. आतां वर सांगितलेंच आहे कीं, तो इतका धीम्मा व शांत होता, तरी कधीं कधीं असा दिवस उगवे, कीं ते दिवशीं त्याला कांहीं सुचत नसे, आणि त्याला आपल्या भावि स्थितीवरच विचार करीत बसावें असें वाटे. आजचा दिवस त्यांतला होता.

सकाळीं सहासात वाजले नाहींत तोंच त्याला कोणी येऊन सांगितलें कीं, तुमचा मेहुणा कांहीं चोरीच्या ठपक्यांत सांपडला आहे. अजून पोलिसांत प्रकरण गेलें नाहीं, तुम्ही जाऊन कांहीं तडजोड काढाल, तर मिटण्याचा संभव आहे, नाहीं तर चारसहा महिने तुरुंगांत खास पडणार. त्यानें

तें ऐकतांक्षणींच त्याच्या जीवाला काय वाटलें असेल पहा ! **गणपतरावाला** तें कळतांच त्याच्या स्वभावाला अनुसरून त्यानें तावडतोब, " जाऊं दे हरामखोराला तुरुंगांत ! कांहीं आपण जाऊं नयेन् कांहीं करूं नये ! त्याला एकदां तसंच झालं पाहिजे " असें म्हटलें; परंतु नानाच्यानें तसें म्हणवलें नाहीं; इतकेंच नाहीं, तर आपण या वेळीं निष्काळजीपणा दाखविल्यास आपली बहीण काय म्हणेल ? आई काय म्हणेल ? जग तरी काय म्हणेल? शिवाय लोकांनीं म्हणण्याच एक असो, पण आपल्या बहिणीच्या नवऱ्यानें तुरुंगांत जावें, आणि आपण स्वस्थ बसून तें पहावें, हें आपलें आपल्याला तरी बरें वाटतें काय ? असा त्यानें आपल्याशीं विचार करून तो **गणपतरावाला** एकदम म्हणालाः " **गणपतराव**, हें तूं बोलतो आहेस तरी काय ? अरे, आपण या वेळीं जाऊन जर कांहीं करून त्याला सोडवलं नाहीं, तर गोदी काय करील ? तिच्या नवऱ्यानं तुरुंगांत जाऊन......"

बस् ! गोदावरीचें नांव निघण्याचाच अवकाश होता. क्षणापूर्वी, कठोरपणानें " जाऊं दे हरामखोराला तुरुंगांत ! " असे शब्द उच्चारणारा **गणपतराव** लोण्यापेक्षांही मऊ झाला, आणि तावडतोब म्हणतो, " तेंच. तेंच. त्याच्याचमुळें तर त्या हरामखोराची कींव येते. नाना, नाना, तिला त्याच्या तावडींतून काढून तूं आपल्याजवळ जर ठेवलं नाहींस, जर त्या चांडाळाच्या तडाक्यांतून तिला सोडवून आपल्याजवळ सुखांत राहूं दिलं नाहींस, तर मी तुलासुद्धां त्याच्याच वर्गात घालीन. अशा सद्गुणी मुलीची अशी धूळधाण व्हावीना ? चल, चल तर आपण झट्कन् जाऊं न् काय आहे काय नाहीं त्याचा शोध करूं. "

असें म्हणून तो उठलाच. नानानेंही आपला अंगरखा व रुमाल चढविला आणि दोघेही मुकाट्यानें गांवाकडे चालले. किती वेळपर्यंत तरी एकमेक एकमेकांशीं बोललेच नाहींत. जो तो आपापल्या विचारांत अतोनात गर्क होऊन गेला होता, असें दिसलें. त्यांच्या चेहऱ्याकडे दृष्टी जाण्याबरोबर कोणीही त्यांच्या मनांत दुःखाचे विचार चालले आहेत हें ताडलें असतें!

**गणपतराव** आपल्या नेहमींच्या रीतीप्रमाणें प्रस्तुत सोडून अप्रस्तुताचाच विचार करीत होता. **गोदावरी**च्या आतांच्या या संकटावर विचार करतां करतां त्याला तिच्यासारख्याच अनाथ अशा इतर स्त्रियांविषयीं विचार मनांत येऊन त्याचें मन त्यांच्या विषयीं कळकळीनें अगदीं मृदु होऊन गेलें ! गोदावरीसारख्या जितक्या म्हणून बायका त्याच्या प्रत्यक्ष

कुठें गहाण ठेवीन. पाऊणशें ऐशीं रुपये दोनींवर वाटचा चोर दिखील देईल. तुला पैशाची का काळजी पडली आहे ? गोदुताई तुझी बहीण आणखी माझी नाहीं का ? अगदीं चमत्कारिक बोआ तूं. अरे, पाहिजे तितके रुपये तयार करीन. मीं म्हटलं तुला काय काळजी पडली आहे ? खूप महाराज !' अशा वेळीं तुझ्या आणखी **गोदूताई**च्या उपयोगी हे जिन्नस पडायचे नाहींत तर पडायचे केव्हां आणि कोणाच्या ?

ते धीराचे शब्द ऐकल्यावर **नाना**च्यानें पुढें एक अक्षरसुद्धां उच्चारवलें नाहीं. त्याचा ऊर भरून आला आणि कंठ सद्गदित झाला. संकटाच्या वेळीं आपला **गणपतराव** आपल्यास हरएक प्रकारची मदत करील कीं नाहीं, याविषयीं आजपर्यंत त्याला कधीं शंका होती असें नाहीं; कारण आजपर्यंत **गणपतरावानें** त्याला अनेक वेळां अनेक प्रकारची मदत केलीच होती; पण आजच्यासारखा हा प्रसंग पहिलाच, आणि त्या वेळीं इतकें धीराचें बोलणें कानीं पडल्याबरोबर त्याला त्या आपल्या मित्राबद्दलचें अधिकच कौतुक वाटावें, आणि तितक्या त्या मनाच्या स्थितींतही त्याला त्याबद्दल गहिंवर यावा हें किती साहजिक आहे !

---

# प्रकरण १५ वें.

## मित्र.

**वर** सांगितल्याप्रमाणें बोलतां बोलतां ते दोघे सदाशिव पेठेंत जेथें विठ्ठलभटांचें म्हणजे गोदावरीच्या सासऱ्याचें घर होतें, तेथें आले. दाराशीं पांच चार असामी उभे होते. त्यांना विचारतां **विनोबा** आंत असून ज्याच्या चोरींत ते सांपडले होते, ते **गृहस्थही** आंत आहेत असें कळलें. दाराशीं पोलीसाचा शिपाई अजून आला नाहीं हें पहातांच दोघांचाही जीव खालीं पडल्यासारखा झाला. भीति मोठी काय ती एवढीच होती कीं, आपण जाऊन पोंचण्याच्या अगोदर पोलिसांत खटलें जातें कीं काय. गेलें असलें तर मग दावादावी होण्याचा संभव फार कमी. किंबहुना, असला तरी फार जोखमीचा. तेव्हां तसें कांहीं होण्याच्या आधींच आपण जाऊन पोंचलों म्हणजे ठीक. मग त्या गृहस्थाच्या कांहीं हातापायां पडून, कांहीं पैशाचेंही आमिष-

तें ऐकतांक्षणींच त्याच्या जीवाला काय वाटलें असेल पहा ! **गणपतरावाला** तें कळतांच त्याच्या स्वभावाला अनुसरून त्यानें तावडतोब, " जाऊं दे हरामखोराला तुरुंगांत ! कांहीं आपण जाऊं नयेन् कांहीं करूं नये ! त्याला एकदां तसंच झालं पाहिजे " असें म्हटलें; परंतु नानाच्यानें तसें म्हणवलें नाहीं; इतकेंच नाहीं, तर आपण या वेळीं निष्काळजीपणा दाखविल्यास आपली बहीण काय म्हणेल ? आई काय म्हणेल ? जग तरी काय म्हणेल? शिवाय लोकांनीं म्हणण्याच एक असो, पण आपल्या बहिणीच्या नवऱ्यानें तुरुंगांत जावें, आणि आपण स्वस्थ बसून तें पहावें, हें आपलें आपल्याला तरी बरें वाटतें काय ? असा त्यानें आपल्याशीं विचार करून तो **गणपतरावाला** एकदम म्हणालाः " **गणपतराव**, हें तूं बोलतो आहेस तरी काय ? अरे, आपण या वेळीं जाऊन जर कांहीं करून त्याला सोडवलं नाहीं, तर गोदी काय करील ? तिच्या नवऱ्यानं तुरुंगांत जाऊन......"

बस् ! गोदावरीचें नांव निघण्याचाच अवकाश होता. क्षणापूर्वीं, कठोरपणानें " जाऊं दे हरामखोराला तुरुंगांत ! " असे शब्द उच्चारणारा **गणपतराव** लोण्यापेक्षांही मऊ झाला, आणि तावडतोब म्हणतो, " तेंच. तेंच. त्याच्याचमुळें तर त्या हरामखोराची कींव येते. नाना, नाना, तिला त्याच्या तावडींतून काढून तूं आपल्याजवळ जर ठेवलं नाहींस, जर त्या चांडाळांच्या तडाक्यांतून तिला सोडवून आपल्याजवळ सुखांत राहूं दिलं नाहींस, तर मी तुलासुद्धां त्याच्याच वर्गांत घालीन. अशा सद्गुणी मुलीची अशी धूळधाण व्हावीना ? चल, चल तर आपण झट्कन् जाऊं न् काय आहे काय नाही त्याचा शोध करूं. "

असें म्हणून तो उठलाच. नानानेंही आपला अंगरखा व रुमाल चढविला आणि दोघेही मुकाट्यानें गांवाकडे चालले. किती वेळपर्यंत तरी एकमेक एकमेकांशीं बोललेच नाहींत. जो तो आपापल्या विचारांत अतोनात गर्क होऊन गेला होता, असें दिसलें. त्यांच्या चेहऱ्याकडे दृष्टी जाण्याबरोबर कोणीही त्यांच्या मनांत दुःखाचे विचार चालले आहेत हें ताडलें असतें!

**गणपतराव** आपल्या नेहमींच्या रीतीप्रमाणें प्रस्तुत सोडून अप्रस्तुताचाच विचार करीत होता. **गोदावरी**च्या आतांच्या या संकटावर विचार करतां करतां त्याला तिच्यासारख्याच अनाथ अशा इतर स्त्रियांविषयीं विचार मनांत येऊन त्याचें मन त्यांच्या विषयीं कळकळीनें अगदीं मृदु होऊन गेलें ! गोदावरीसारख्या जितक्या म्हणून बायका त्याच्या प्रत्यक्ष

कुठें गहाण ठेवीन. पाऊणशें ऐशीं रुपये दोनींवर वाटचा चोर दिखील देईल. तुला पैशाची का काळजी पडली आहे ? गोदुताई तुझी बहीण आणखी माझी नाहीं का ? अगदीं चमत्कारिक बोआ तूं. अरे, पाहिजे तितके रुपये तयार करीन. मीं म्हटलं तुला काय काळजी पडली आहे ? खूप महाराज ! अशा वेळीं तुझ्या आणखी **गोदूताई**च्या उपयोगी हे जिन्नस पडायचे नाहींत तर पडायचे केव्हां आणि कोणाच्या ?

ते धीराचे शब्द ऐकल्यावर **नाना**च्यानें पुढें एक अक्षरसुद्धां उच्चारवलें नाहीं. त्याचा ऊर भरून आला आणि कंठ सद्गदित झाला. संकटाच्या वेळीं आपला **गणपतराव** आपल्यास हरएक प्रकारची मदत करील कीं नाहीं, याविषयीं आजपर्यंत त्याला कधीं शंका होती असें नाहीं; कारण आजपर्यंत **गणपतरावानें** त्याला अनेक वेळां अनेक प्रकारची मदत केलीच होती; पण आजच्यासारखा हा प्रसंग पहिलाच, आणि त्या वेळीं इतकें धीराचें बोलणें कानीं पडल्याबरोबर त्याला त्या आपल्या मित्राबद्दलचें अधिकच कौतुक वाटावें, आणि तितक्या त्या मनाच्या स्थितींतही त्याला त्याबद्दल गहिंवर यावा हें किती साहजिक आहे !

---

# प्रकरण १५ वें.

## मित्र.

**वर** सांगितल्याप्रमाणें बोलतां बोलतां ते दोघे सदाशिव पेठेंत जेथें विठ्ठलभटांचें म्हणजे गोदावरीच्या सासऱ्याचें घर होतें, तेथें आले. दाराशीं पांच चार असामी उभे होते. त्यांना विचारतां **विनोबा** आंत असून ज्याच्या चोरींत ते सांपडले होते, ते गृहस्थही आंत आहेत असें कळलें. दाराशीं पोलीसाचा शिपाई अजून आला नाहीं हें पहातांच दोघांचाही जीव खालीं पडल्यासारखा झाला. भीति मोठी काय ती एवढीच होती कीं, आपण जाऊन पोंचण्याच्या अगोदर पोलिसांत खटलें जातें कीं काय. गेलें असलें तर मग दावादावी होण्याचा संभव फार कमी. किंबहुना, असला तरी फार जोखमीचा. तेव्हां तसें कांहीं होण्याच्या आधींच आपण जाऊन पोंचलों म्हणजे ठीक. मग त्या गृहस्थाच्या कांहीं हातापायां पडून, कांहीं पैशाचेंही आमिष

लावून कसें तरी करून स्थिरस्थावर करतां येईल. या विचाराप्रमाणें सर्व गोष्टी होण्याचा संभव आहे हें दिसतांच दोघांनाही बरें वाटून दोघे आंत गेले, तों विठ्ठलभटाच्या घरांत एकच हलकल्लोळ! विठ्ठलभट एकसारखा, " गाढवाच्या लेकानं आमच्या तोंडाला काळोखी लावलीन यापेक्षां उपजला नसता तर बरं झालं असतं! आतां यजमानाच्या घरीं कुठें तोंड काढायला तरी जागा! आमच्या घरांत दांतावर मारायला नाहीं पैसा, आणखीं तूं एकदम पन्नास रुपयांची नोट चोरलीस आणखी उधळून टाकलीस, आतां काय करावं? बरें हे **अनंतरावच** आहेत. दुसरा एखादा असता, तर एव्हांना तुरुंगच ... ..." असे कांहीं शब्द उच्चारीत होता. इतक्यांत हे दोघे एकदम आंत गेलें त्याबरोबर आपण कबूल झाल्याबद्दल, आणि तें आपल्या मेहुण्याला व त्याच्या स्नेह्याला कळल्याबद्दल लाज वाटूनच काय **विनोबा**, " ते काय नेतात तुरुंगांत? मीं मुळीं चोरलीच नाहीं. कां उगीच घेतां माझं नांव?" असे उद्धटपणाचे शब्द बोलत तट्कन उठून उभा राहिला. आणखी **नाना** व **गणपतराव** यांच्याकडे पाहून संतापून जाऊन त्यांच्यावर डोळे वटारून म्हणतो: " वा! काय आमच्या घरांत कांहीं तमाशा आहे म्हणून आलांत कीं काय धांवत धांवत इथें? का तुमच्या बहिणीचा नवरा मेला म्हणून त्याला......"

परंतु **विठ्ठलभटानें** मोठ्यानें ओरडून त्याला दाबण्याचा यत्न केला. **विनोबाचें** तें पाजीपणाचें बोलणें ऐकण्याबरोबर **गणपतरावाच्या** व **नानाच्याही** तळपायाची आग मस्तकाला गेली. पण करतात काय? त्यांस ते शब्द तस्से गिळावे लागले. **विनोबा** इतके निगर्गट झाले असतील असें त्या दोघांसही वाटलें नव्हतें. परंतु आतांचा प्रकार पाहिला तो अगदीं बिलंद चोराचा! जणूं काय कित्येक चोऱ्या करून त्या पचवून हजार वेळां तुरुंगांत जाऊन येऊन अगदीं बिलंद बनूनच राहिला आहे. कोण तो निर्लज्जपणा! पण निर्लज्जपणा ह्मणावा तर निर्लज्जपणाही नव्हे, कारण आपण अशा आरोपांत सांपडलो असतां इतक्यांत यांना ही बातमी कळून हे आले आहेत. आणि आपण चोरी केल्याबद्दल कबूलजबाब तर देऊन चुकलों. या सर्व गोष्टी आतां यांना कळून आपली अब्रू जाईल या गोष्टीबद्दल केवळ लाज वाटूनच वरचा उद्धट निर्लज्जपणा त्यानें केला. सगळ्या जगानें खेटरें मारलीं तरी पत्करलीं, परंतु बायकोच्या भावानें अशा वेळीं येऊन आपली फजिती पहावी यासारखें दुसरें कोणतेंही मनाला लागणारें

कोणतीही गोष्ट करतां येईना. नाहीं तर काय हो ! याला एका चार मिनिटांत समोर फरासखान्यांत गुदरलं असतं ! काय खरं कीं नाहीं ? ”

बिचारा **नाना** याला काय उत्तर देणार ! तो मुकाट्यानें ऐकत होता. इतक्यांत **गणपतराव**ही तेथें आला. तेव्हां तो गृहस्थ पुढें म्हणतो:— “ पण **विठ्ठलभटजी**च्यामुळें मला तसं करतां येईना. त्यांची गांठ घेऊन, त्यांना सांगून हा कबूल झाला तर पहावं. नाहींच झाला, आणखी पोलिसांत गेल्याखेरीज आपले रुपये नाहींच मिळत असं दिसलं तर मग काय तें करायचं असा विचार केला, आणखी ह्याला घेऊन **विठ्ठलभटजी**कडे आलों. त्यांनीं एक दिवसाची फुरसत मागितली, तुमची माझी कांहीं ओळख नाहीं, तेव्हां मीं तुमच्याकडे कसा येऊं ! पुन: मी इथें आलों, काल त्यानं आपली चोरी कबूल केली, नोट कुठें मोडली, किती रुपये कोणाला दिले, सगळं कांहीं कबूल केलंन्. आज आतां तुम्ही येण्यापूर्वीं कबूल केलंन् आणखी तुम्ही येण्याबरोबर उलटला. तेव्हां आतां काय करायचं ? ”

**गणपतराव**:— करायचं काय ! मला तर असा सं......

परंतु **नाना**नें त्याला मध्येंच दाबलें व तो त्या गृहस्थाला म्हणाला “ पण आतां पुढें कसं काय करायचं ! आपले रुपये तर गेले, आणखी आमच्याजवळ किंवा **विठ्ठलभटजी**जवळ...”

**गृहस्थ**:— तें कांहीं नाहीं मला माहित. माझे मला रुपये पाहिजेत, त्याखेरीज कांहीं मी स्वस्थ बसायचा नाहीं. हो, दुसऱ्याचे आलेले रुपये, ते आणखी कुठें भरीत बसूं ? यांनीं करावीं गाणीं आणखी आम्हीं त्यांचे भरावे पैसे ? काय मौज आहे पहा ! अहो, गुलामांनीं दोघां तिघांनीं दोन दिवसांत एक तमाशान् एक गाणं करवलं ! तो रुमाल पाहिलातना त्याच्या डोक्याला ! तो रुमाल त्या पैशानं घेतला. एकवीस रुपयांचा रुमाल ! पंधरा रुपये गाणारणीला ! आणखी बाकी रुपयांचा दौलतजादा !

**नाना**:— पण आतां तुम्ही त्याला फरासखान्यांत गुदरून तरी कांहीं रुपये परत येणार आहेत ? मग उगीच कां ?

हें वाक्य बोलतांना **नाना**च्या स्वत:च्या मनास किती तरी शरम वाटली! **गणपतराव** लागलीच **नाना**ला चिमटा घेऊन हळूच म्हणतो, “ हें तूं काय हें बोलतो आहेस ! तसं कांहीं नाहीं. ते रुपये दिल्याखेरीज आपल्याला गत्यंतर नाहीं. यांचे रुपये द्यायची तजवीज करायची. पण त्याला सांगायचं नाहीं. त्याला धाकदपटशाच दाखवायचा, आणखी तो चांगला

लावून करें तरी करून स्थिरस्थावर करतां येईल. या विचाराप्रमाणें सर्व गोष्टी होण्याचा संभव आहे हें दिसतांच दोघांनाही बरें वाटून दोघे आंत गेले, तों विठ्ठलभटाच्या घरांत एकच हलकल्लोळ! विठ्ठलभट एकसारखा, "गाढवाच्या लेकानं आमच्या तोंडाला काळोखी लावलीन यापेक्षां उपजला नसता तर बरं झालं असतं! आतां यजमानाच्या घरीं कुठें तोंड काढायला तरी जागा! आमच्या घरांत दांतावर मारायला नाहीं पैसा, आणखीं तूं एकदम पन्नास रुपयांची नोट चोरलीस आणखी उधळून टाकलीस, आतां काय करावं? बरें हे **अनंतरावच** आहेत. दुसरा एखादा असता, तर एव्हांना तुरुंगच ... ..." असे कांहीं शब्द उच्चारीत होता. इतक्यांत हे दोघे एकदम आंत गेले त्याबरोबर आपण कबूल झाल्याबद्दल, आणि तें आपल्या मेहुण्याला व त्याच्या स्नेह्याला कळल्याबद्दल लाज वाटूनच काय **विनोबा**, "ते काय नेतात तुरुंगांत? मीं मुळीं चोरलीच नाहीं. कां उगीच घेतां माझं नांव?" असे उद्धटपणाचे शब्द बोलत तट्कन उठून उभा राहिला. आणखी **नाना** व **गणपतराव** यांच्याकडे पाहून संतापून जाऊन त्यांच्यावर डोळे वटारून म्हणतोः "वा! काय आमच्या घरांत कांही तमाशा आहे म्हणून आलांत कीं काय धांवत धांवत इथें? का तुमच्या बहिणीचा नवरा मेला म्हणून त्याला......"

परंतु **विठ्ठलभटा**नें मोठ्यानें ओरडून त्याला दाबण्याचा यत्न केला. **विनोबा**चें तें पाजीपणाचें बोलणें ऐकण्याबरोबर **गणपतरावा**च्या व **नाना**च्याही तळपायाची आग मस्तकाला गेली. पण करतात काय? त्यांस ते शब्द तस्से गिळावे लागले. **विनोबा** इतके निगर्गट झाले असतील असें त्या दोघांसही वाटलें नव्हतें. परंतु आतांचा प्रकार पाहिला तो अगदीं बिलंद चोराचा! जणूं काय कित्येक चोऱ्या करून त्या पचवून हजार वेळां तुरुंगांत जाऊन येऊन अगदीं बिलंद बनूनच राहिला आहे. कोण तो निर्लज्जपणा! पण निर्लज्जपणा ह्मणावा तर निर्लज्जपणाही नव्हे, कारण आपण अशा आरोपांत सांपडलो असतां इतक्यांत यांना ही बातमी कळून हे आले आहेत. आणि आपण चोरी केल्याबद्दल कबूलजबाब तर देऊन चुकलों. या सर्व गोष्टी आतां यांना कळून आपली अब्रू जाईल या गोष्टीबद्दल केवळ लाज वाटूनच वरचा उद्धट निर्लज्जपणा त्यानें केला. सगळ्या जगानें खेटरें मारलीं तरी पत्करलीं, परंतु बायकोच्या भावानें अशा वेळीं येऊन आपली फजिती पहावी यासारखें दुसरें कोणतेंही मनाला लागणारें

कोणतीही गोष्ट करतां येईना. नाहीं तर काय हो ! याला एका चार मिनिटांत समोर फरासखान्यांत गुदरलं असतं ! काय खरं कीं नाहीं ? ”

बिचारा **नाना** याला काय उत्तर देणार ! तो मुकाट्यानें ऐकत होता. इतक्यांत **गणपतराव**ही तेथें आला. तेव्हां तो गृहस्थ पुढें म्हणतोः— “ पण **विठ्ठलभटजी**च्यामुळें मला तसं करतां येईना. त्यांची गांठ घेऊन, त्यांना सांगून हा कबूल झाला तर पहावं. नाहींच झाला, आणखी पोलिसांत गेल्याखेरीज आपले रुपये नाहींच मिळत असं दिसलं तर मग काय तें करायचं असा विचार केला, आणखी ह्याला घेऊन **विठ्ठलभटजी**कडे आलों. त्यांनीं एक दिवसाची फुरसत मागितली, तुमची माझी कांहीं ओळख नाहीं, तेव्हां मीं तुमच्याकडे कसा येऊं ! पुनः मी इथें आलों, काल त्यानं आपली चोरी कबूल केली, नोट कुठें मोडली, किती रुपये कोणाला दिले, सगळं कांहीं कबूल केलंन्. आज आतां तुम्ही येण्यापूर्वीं कबूल केलंन् आणखी तुम्ही येण्याबरोबर उलटला. तेव्हां आतां काय करायचं ? ”

**गणपतरावः**— करायचं काय ! मला तर असा सं......

परंतु **नाना**नें त्याला मध्येंच दाबलें व तो त्या गृहस्थाला म्हणाला “ पण आतां पुढें कसं काय करायचं ! आपले रुपये तर गेले, आणखी आमच्याजवळ किंवा **विठ्ठलभटजी**जवळ...”

**गृहस्थः**— तें कांहीं नाहीं मला माहित. माझे मला रुपये पाहिजेत, त्याखेरीज कांहीं मी स्वस्थ बसायचा नाहीं. हो, दुसऱ्याचे आलेले रुपये, ते आणखी कुठें भरीत बसूं ? यांनीं करावीं गाणीं आणखी आम्हीं त्यांचे भरावे पैसे ? काय मौज आहे पहा ! अहो, गुलामांनीं दोघां तिघांनीं दोन दिवसांत एक तमाशान् एक गाणं करवलं ! तो रुमाल पाहिलातना त्याच्या डोक्याला ! तो रुमाल त्या पैशानं घेतला. एकवीस रुपयांचा रुमाल ! पंधरा रुपये गाणारणीला ! आणखी बाकी रुपयांचा दौलतजादा !

**नानाः**— पण आतां तुम्ही त्याला फरासखान्यांत गुदरून तरी कांहीं रुपये परत येणार आहेत ? मग उगीच कां ?

हें वाक्य बोलतांना **नाना**च्या स्वतःच्या मनास किती तरी शरम वाटली! **गणपतराव** लागलीच **नाना**ला चिमटा घेऊन हळूच म्हणतो, “ हें तूं काय हें बोलतो आहेस ! तसं कांहीं नाहीं. ते रुपये दिल्याखेरीज आपल्याला गत्यंतर नाहीं. यांचे रुपये द्यायची तजवीज करायची. पण त्याला सांगायचं नाहीं. त्याला धाकदपटशाच दाखवायचा, आणखी तो चांगला

घाबरला, आतां आपल्याला तुरुंगांत नेतात, सोडीत नाहींत, असं त्याला पक्कं वाटून चुकलें; तो गयावया करून पुन: असल्या वाईट फंदांत पडायचा नाहीं, असं काकळुतवाणीनं म्हणूं लागला म्हणजे मग आपण पैसे भरले असं त्याला सांगायचं. त्याला चांगलं वठणीला आगलं पाहिजे. त्याच्या-खेरीज कांहीं उपयोग नाहीं. यांचे जर खरोखर त्यानं रुपये चोरलेच आहेत; तर त्यांचे त्यांना कसेतरी पोंचवलेच पाहिजेत. ”

**नाना**ला ही गोष्ट समजत नव्हती असें नाहीं. परंतु काय करतो बिचारा! पैसे जितके कमी भरावे लागतील तितके पहाण्याच्या इच्छेनें तो आपला बोलत होता. शेवटीं त्या गृहस्थाशीं कांहीं मसलत करून त्यांनीं विठ्ठलभट-जीस बाहेर बोलाविलें. **गणपतरावा**नें त्याला धीर देऊन; आदले दिवशीं विनोबांनीं काय काय व कशा कशा गोष्टी कबूल केल्या तें विचारलें. विठ्ठलभटजी बिचारा अगदीं गरीब असे; पण आपल्या लेंकाची योग्यता जाणून होता. त्यानें विनोबानें आदले दिवशीं कबूल केलेल्या सर्व गोष्टी त्यांस सांगितल्या व **गणपतरावा**च्या आणि **नाना**च्याकडे केविलवाण्या दृष्टीनें पाहून “ कसंही करून मला एवढ्या या संकटांतून सोडवून माझी अब्रू राखा ” असें म्हटलें. त्या दोघांसही बिचाऱ्याची फार दया आली. असलें कार्टें पोटीं उपजल्याबद्दल त्या बिचाऱ्याला किती वाईट वाटत होतें ! त्याला घरांतून घालवून द्यावें, त्याचें पुनरपि तोंडसुद्धां पाहूं नये, असें एकदां नव्हे दोनदां नव्हे त्यानें हजारदां म्हटलें असेल, आणि संतापानें तसें करण्याचा घाटही घातला असेल, परंतु त्याचें घरांत चालत होतें काय ! आणि त्याला विचारीत होता कोण ? त्यानें त्याला त्याच्या तोंडावर किंवा पाठीमागें चार रागाचे शब्द बोलूं लागण्याचा अवकाश, कीं रखमाबाईनें वाघिणीप्रमाणें चवताळून याच्या अंगावर तुटून पडल्यासारखें करून त्याचे वाभाडे काढावे. “ त्याच्या बायकोच्या देखत हीं असलीं बोलणीं शोभ-तात का ? अगदीं गेली कुठें सारी अक्कल ! अशीं तुमचीं बोलणीं ऐकलीं म्हणजे मग चांगली ती मान ठेवील त्याचान् तुमचा. आधींच लागली आहे ती आतांशा थेरं थेरं करायला. आणखी त्यांत हीं आपली फूस देणारीं विलक्षण बोलणीं. अन् असं तो करतो आहे तरी काय ? म्हणे शाळेंत जात नाहींन् शिकत नाहीं. अहाहा ! गेले शाळेंत त्यांनीं काय दिवे लावले ? न जाऊं द्या आपला शाळेंत. त्याचं त्याला पोट भरण्याइतकं पुष्कळ येतं आहे. कालच तो मला सांगत होता कीं, मला पंधरा रुपयांची

करून देईन ' असें म्हणूं लागला. पाठोपाठ **रखमाबाई**ही आली. गृहस्थ समोर होता. तेव्हां त्याला हवें तितकें व हवें तें बोलण्यापुरता धीर जरी तिच्या अंगीं होता, तरी तो आतां खास पोलिसाचा शिपाई आणण्याला गेला असें मनांत येतांच त्या धीराचा लय झाला. बाहेर येऊन त्यानें शिपाई न आणण्याबद्दल युक्ति करण्याखेरीज दुसरा मार्ग नाहीं हें तिला समजत होतें. बाहेर आल्याबरोबर तिनें आपल्या हातांतल्या पाटल्या त्या गंधी गृहस्थाच्या देखत मोठ्या तावातावानें काढल्या " आणि या घे बाबा. पण विनाकारण आमची गरिबाची अब्रू घेऊं नको. माझा विनू कांहीं कधीं कुणाच्या जिनसाला हात लावायचा नाहीं, अगदीं माझी पक्की खात्री आहे. पण करायचं कसं ? तुझ्या तावडींत तो सांपडला आहे खरा. हो, तुझे रुपये केव्हां आले म्हणतोस, तेव्हां जर तो तिथें नसता, अन् तुझ्या हलकटाच्या दुकानांतच तो मुळीं न येता, तर तुझी काय ही होती त्याचं नांव घ्यायची तें पाहिलें असतं. पण तुझ्या तावडींतच सांपडलों आम्ही सारीं, तेव्हां तूं तरी कां सोडशील ? घे. ह्या पाटल्या घे. आणखी विकून आपले पन्नास रुपये घे. मीं नाहीं दिले, तरी हे शेखोजीराव आले आहेत मोठ्या डौलानं धांवत आपल्या कॉलेजांतून ते देणारच. मग त्यांचं तरी टेपर कशाला आमच्यावर कीं मेव्हणा तुरुंगांत चालला होता, अन् आम्हीं त्याला सोडवून आणला पन्नास रुपये देऊन ! जाऊं दे आमचे पन्नास रुपये? ते फुकटचे घेऊन तूं मोठा धनंतर कुबेर हो म्हणजे झालं. येऊन जाऊन सवाष्णीच्या हातच्या पाटल्या नाहींशा झाल्या एवढंचना ? माझ्या बाबानं विनाकारण तुरुंगांत जाण्यापेक्षां मला पाटल्या काय अधिक आहेत ? तरी मीं त्याला हज्जारदां सांगितलं बरं ' अरे बाबा, असल्या हलकटांच्या नादीं लागत जाऊं नको अं ? त्यांच्याकडे जाऊं नको कसा ? ते केव्हां काय घोरपड आणतील अंगावर त्याचा नेम नाहीं. ' नाहीं ऐकलन् त्याचीं फळं आलीं आतां त्याच्या अनुभवाला. आतां तरी ये म्हणावं भानावर. तरी बरं, पन्नासाच्या नोटीवरच गेलं ! नाहीं तर आणखी कांहीं तरी आळ यायचा. म्हणायचं होतंस कीं आमचा तीस तोळ्यांचा गोफ गेला म्हणून ? "

असें व याच प्रकारें आणखी कांहीं बडबडत त्या बाईनें आपल्या पाटल्या त्या गंधी गृहस्थाच्या पुढें टाकल्या; परंतु त्यानें त्या उचलल्या नाहींत. तोही आतां संतापलाच होता. तो तिला एकदम म्हणाला, " असं कशाला रखमाकाकू, आतां मी माजिस्ट्रेटापुढें खरी खरी शाबिती करून

घाबरला, आतां आपल्याला तुरुंगांत नेतात, सोडीत नाहींत, असं त्याला पक्कं वाटून चुकलें; तो गयावया करून पुन: असल्या वाईट फंदांत पडायचा नाहीं, असं काकळुतवाणीनं म्हणूं लागला म्हणजे मग आपण पैसे भरले असं त्याला सांगायचं. त्याला चांगलं वळणीला आणलं पाहिजे. त्याच्या-खेरीज कांहीं उपयोग नाहीं. यांचे जर खरोखर त्यानं रुपये चोरलेच आहेत; तर त्यांचे त्यांना कसेतरी पोंचवलेच पाहिजेत. ”

**नाना**ला ही गोष्ट समजत नव्हती असें नाहीं. परंतु काय करतो बिचारा! पैसे जितके कमी भरावे लागतील तितके पहाण्याच्या इच्छेनें तो आपला बोलत होता. शेवटीं त्या गृहस्थाशीं कांहीं मसलत करून त्यांनीं विठलभट-जीस बाहेर बोलाविलें. **गणपतरावा**नें त्याला धीर देऊन; आदले दिवशीं विनोबांनीं काय काय व कशा कशा गोष्टी कबूल केल्या तें विचारलें. विठलभटजी बिचारा अगदीं गरीब असे; पण आपल्या लेंकाची योग्यता जाणून होता. त्यानें विनोबानें आदले दिवशीं कबूल केलेल्या सर्व गोष्टी त्यांस सांगितल्या व **गणपतरावा**च्या आणि **नाना**च्याकडे केविलवाण्या दृष्टीनें पाहून “ कसंही करून मला एवढ्या या संकटांतून सोडवून माझी अब्रू राखा ” असें म्हटलें. त्या दोघांसही बिचाऱ्याची फार दया आली. असलें कार्टें पोटीं उपजल्याबद्दल त्या बिचाऱ्याला किती वाईट वाटत होतें ! त्याला घरांतून घालवून द्यावें, त्याचें पुनरपि तोंडसुद्धां पाहूं नये, असें एकदां नव्हे दोनदां नव्हे त्यानें हजारदां म्हटलें असेल, आणि संतापानें तसें करण्याचा घाटही घातला असेल, परंतु त्याचें घरांत चालत होतें काय ! आणि त्याला विचारीत होता कोण ? त्यानें त्याला त्याच्या तोंडावर किंवा पाठीमागें चार रागाचे शब्द बोलूं लागण्याचा अवकाश, कीं रखमाबाईनें वाघिणीप्रमाणें चवताळून याच्या अंगावर तुटून पडल्यासारखें करून त्याचे वाभाडे काढावे. “ त्याच्या बायकोच्या देखत हीं असलीं बोलणीं शोभ-तात का ? अगदीं गेली कुठें सारी अक्कल ! अशीं तुमचीं बोलणीं ऐकलीं म्हणजे मग चांगली ती मान ठेवील त्याचान् तुमचा. आधींच लागली आहे ती आतांशा थेरं थेरं करायला. आणखी त्यांत हीं आपली फूस देणारीं विलक्षण बोलणीं. अन् असं तो करतो आहे तरी काय ? म्हणे शाळेंत जात नाहींन् शिकत नाहीं. अहाहा ! गेले शाळेंत त्यांनीं काय दिवे लावले ? न जाऊं द्या आपला शाळेंत. त्याचं त्याला पोट भरण्याइतकं पुष्कळ येतं आहे. कालच तो मला सांगत होता कीं, मला पंधरा रुपयांची

करून देईन ' असें म्हणूं लागला. पाठोपाठ **रखमाबाई**ही आली. गृहस्थ समोर होता. तेव्हां त्याला हवें तितकें व हवें तें बोलण्यापुरता धीर जरी तिच्या अंगीं होता, तरी तो आतां खास पोलिसाचा शिपाई आणण्याला गेला असें मनांत येतांच त्या धीराचा लय झाला. बाहेर येऊन त्यानें शिपाई न आणण्याबद्दल युक्ति करण्याखेरीज दुसरा मार्ग नाहीं हें तिला समजत होतें. बाहेर आल्याबरोबर तिनें आपल्या हातांतल्या पाटल्या त्या गंधी गृहस्थाच्या देखत मोठ्या तावातावानें काढल्या " आणि या घे बाबा. पण विनाकारण आमची गरिबाची अब्रू घेऊं नको. माझा विनू कांहीं कधीं कुणाच्या जिनसाला हात लावायचा नाहीं, अगदीं माझी पक्की खात्री आहे. पण करायचं कसं ? तुझ्या तावडींत तो सांपडला आहे खरा. हो, तुझे रुपये केव्हां आले म्हणतोस, तेव्हां जर तो तिथें नसता, अन् तुझ्या हलकटाच्या दुकानांतच तो मुळीं न येता, तर तुझी काय ही होती त्याचं नांव घ्यायची तें पाहिलें असतं. पण तुझ्या तावडींतच सांपडलों आम्ही सारीं, तेव्हां तूं तरी कां सोडशील ? घे. ह्या पाटल्या घे. आणखी विकून आपले पन्नास रुपये घे. मीं नाहीं दिले, तरी हे शेखोजीराव आले आहेत मोठ्या डौलानं धांवत आपल्या कॉलेजांतून ते देणारच. मग त्यांचं तरी टेपर कशाला आमच्यावर कीं मेव्हणा तुरुंगांत चालला होता, अन् आम्हीं त्याला सोडवून आणला पन्नास रुपये देऊन! जाऊं दे आमचे पन्नास रुपये? ते फुकटचे घेऊन तूं मोठा धनंतर कुबेर हो म्हणजे झालं. येऊन जाऊन सवाष्णीच्या हातच्या पाटल्या नाहींशा झाल्या एवढंचना ? माझ्या बाबानं विनाकारण तुरुंगांत जाण्यापेक्षां मला पाटल्या काय अधिक आहेत ? तरी मीं त्याला हज्जारदां सांगितलं बरं ' अरे बाबा, असल्या हलकटांच्या नादीं लागत जाऊं नको अं ? त्यांच्याकडे जाऊं नको कसा ? ते केव्हां काय घोरपड आणतील अंगावर त्याचा नेम नाहीं. ' नाहीं ऐकलन् त्याचीं फळं आलीं आतां त्याच्या अनुभवाला. आतां तरी ये म्हणावं भानावर. तरी बरं, पन्नासाच्या नोटीवरच गेलं ! नाहीं तर आणखी कांहीं तरी आळ यायचा. म्हणायचं होतंस कीं आमचा तीस तोळ्यांचा गोफ गेला म्हणून ?"

असं व याच प्रकारें आणखी कांहीं बडबडत त्या बाईनें आपल्या पाटल्या त्या गंधी गृहस्थाच्या पुढें टाकल्या; परंतु त्यानें त्या उचलल्या नाहींत. तोही आतां संतापलाच होता. तो तिला एकदम म्हणाला, " असं कशाला रखमाकाकू, आतां मी माजिस्ट्रेटापुढें खरी खरी शाबिती करून

मगच ते रुपये, नाहीं तर त्या पाटल्या घेईन. उगीच खोटा आळ मी घेतला आहे, त्याची शहानिशा झाल्याखेरीज तुम्ही तरी कशाला मला ह्या पाटल्या देतां ?— **अन्** मला तुमच्या पाटल्या घेऊन काय करायचं आहे ? माझी नोट विन्यानं चोरली, त्यानं काल तुमच्या सगळ्यांच्या देखत कबुली दिखील दिली, पण आज तुम्ही असं म्हणायला लागलां मग काय करायचं आहे? मी कांहीं इतका श्रीमंत नाहीं की विनाकारण गेले पन्नास रुपये तर जाऊं देईन. वडिलांच्या पाठीमागें जेमतेम दुकान चालवून कसातरी गुजारा करतों आहें. तेव्हां जं आतां कोडतांत होईल तें होईल. एवढं बोलतां तरी कशाला ? आणखी पाटल्या तरी देतां कशाला ! अहो, त्याच्या डोक्याला धडधडीत पंचवीस तीस रुपयांचा कोरा रेशमी जरीकांठीं रुमाल दिसतो आहे, तर तुम्ही आपल्या म्हणतां त्यानं चोरी केली नाहीं, मी त्याच्यावर विनाकारण आळ घेतों आहे म्हणून, तेव्हां आतां काय म्हणायच आहे? तुम्ही आमच्या स्नेह्यासंबधांतल्या याच्यामुळं मीं आपली इतका वेळ गय केली. दुसरा कोणी असता, तर केव्हांच फरासखान्यांत जाऊन त्यानं एव्हांना निकाल लावला असता. द्या ! ठेवून द्या आपल्या पाटल्या ! दुसऱ्या कुणाकडून तरी मोडवा, आणखी तयार करून ठेवा रुपये वकिलाबिकिलांना द्यायला ! ”

असें टोंचून बोलून तो गृहस्थ जाऊं लागला. परंतु **नाना** व **विठ्ठलभट** त्याची विनवणी करीतच होते. तें पाहून रखमाबाईची खात्रीच झाली कीं, तें प्रकरण कांहीं विकोपाला जात नाहीं; मग आपण तरी कां उगीच घाई करा. ती आपल्या पाटल्या घेऊन ‘ जा कर तर मग तुला वाटेल त ’ असें पुटपुटत आंत गेली.

आंत या वेळीं निराळाच देखावा चालला होता. **विनोबा**राव **गणपत-रावा**वर तोंडसुख घेत होते. “ मोठे तुम्ही श्रीमंत झालां तर आपल्या घरचे. आम्हांला कशाला ऐट दाखवायला येतां ? मीं पाहून ठेविली आहे तुमची मजा आज कित्येक दिवस. आमचं कांहीं उणं दिसलं की तें तुम्हीं धरलंच हातीं. पण अशानं आमचं काय होणार आहे ? येऊन जाऊन आमची एका घरची भिक्षुकी बुडेल एवढंच ना ! सतरा घरं आणखी मिळ-तील. सतरा रावसाहेबांच्यान् अठरा रावबहादुरांच्या माझ्या आतां ओळखी झा-ल्या आहेत. हवी तेवढी भिक्षुकी मिळवीन. तुमची प्रतिष्ठा नको. काय चमत्कार आहे पहा. कोठून दहा कोसांवरून धांवत आले दोघेजण आमचा पाणउतारा करून मला तुरुंगांत पाठवायला ! पण मी असल्या दबकावण्यांना भिणारा गृहस्थ

नाहीं समजलांत, कोणाची माय व्याली आहे मला तुरुंगांत घालायला पाहूं या. पन्नास रुपड्या म्हणजे आहे काय? कस्पटासमान आहेत मला—अन् हा हरामखोर मला म्हणतो आहे पोलिसांत नेतों म्हणून. आपल्या बापाला ने म्हणावं पोलिसांत ! चोर ! डांबिस.—अन् तुम्ही कां आलांत इथें ! मोठ्या दिमाखानं आम्हाला सोडवायला आले. आपल्या वडिलांना आधीं तिकडे सस्पिंड केलं आहे, त्यांना सोडवा जा. मग या आम्हांला सोडवायला......"

शेवटले शब्द **गणपतरावा**ला अगदी वर्मीं लागले. पायांतले जोडे घेऊन दोनचार लगवावे या हरामखोराला, असें त्याला वाटून त्याचे हात स्फुरण पावूं लागले– आणि तो आतां त्या हातांच्या इच्छेचें शमन करावयाला पुढें धांवणार तों आंतून येणारा एक हृदयद्रावक हुंद्का त्याच्या कानीं पडला आणि तो दचकून मागें सरला. तो हुंद्का कोणाचा हें समजण्याला त्याला एक क्षणसुद्धां लागला नाहीं. त्या हुंद्क्याच्या मागोमाग विनोबांचे शब्दही त्याच्या कानावर जाऊन आदळले ते असे:— " रड रड. रांडे ! तुझ्या नवऱ्याचं प्रेतच बाहेर काढताहेत मग रडशील नाही तर करशील काय ? या अवदसेचं पाऊल घरांत पडल्या दिवसापासून मला नुसती साडेसाती लागली आहे. एकदांची मरतय् नाहीं म्हणजे सुटलों असतों. नाही तर कुठं निघून तरी जा एकदां. रोज शंभर खेटरांनी झोडपावी आणखी एक म्हणावं. कुठली अवलाद .." इतके शब्द म्हणून तो नीच चवताळून जाऊन आतां इतका वेळ झाल्या गोष्टींचा कोठें तरी संताप काढायला ही जागा ठीक आहे असें वाटूनच काय त्या बिचाऱ्या गोरीच्या अंगावर धांवण्यासाठी उठला......

परंतु संतापानें लाल झालेला **गणपतराव**ही आपण काय करतों आहोंत, कोठें आहोंत, याचें भान न राहून दुप्पट चवताळून दांतओंठ खाऊन गुद्दा उगारून आपल्या अंगावर धांवलेला पाहतांच त्याचे पुढले शब्द ओंठांतल्या ओंठांत जिरले आणि तो घाबरून मागें सरकला. इतक्यांत रखमाबाई बाहेरून आंत आली. तिनें तो प्रकार पाहण्याबरोबर मर्ध होऊन " आं ? हें आहे तरी काय बाई ! त्याचा जीव घेतां कीं काय ! हुश ! काय बाई तरी? आमच्या घरांत शिरून आणखी आम्हांला मारायला धांवतां ! अहो, हे आहे तरी काय ? कांहीं मोंगलाई आहे का काय ? छे. छ बाई. एक येतोन् म्हणतो तूं माझे पन्नास रुपये घेतलेस ? अन् दुसरे सोडवायला म्हणून येतात ते मारायला अंगावर धांवतात ! "

**गणपतरावा**चे कान, डोळे सर्व गेल्यासारखे झाले होते. त्याला त्या नीच माणसाचा इतका संताप आला होता, की कांही पुसूं नये. परंतु त्या बाईच्या आरडयाओरडयानें सर्व मंडळी आंत आल्याकारणानें तो जागा झाला; व किंचित् भानावर आला; परंतु आतां त्याला एक क्षणमात्र त्या घरांत उभें रहावेंसें वाटेना. तो एकदम **नाना**कडे वळून म्हणतो: " **नाना,** जर तुला कांहीं चाड असेल तर आतांच्या आतां इथून चल. या हरामखोराला तुरुंगांतच जाऊं दे. आतां आपल्या बहिणीला घे आणखी चल. हा दुष्ट चांडाळ त्या गरीब गाईचा खून करायला चुकायचा नाही. "

त्याचा तो संताप पाहून **नाना**ची विलक्षण स्थिति झाली. आपण आलों कोणत्या कामासाठी आणि हें होतें आहे काय ? असें वाटून तो स्तब्धपणें **गणपतरावाक**डे पाहूं लागला. त्याच्या तोंडांतून एकही शब्द निघेना. तिकडे विनोबा आणि **रखमाबाई** यांचे तर नुसतें गडगडणें सुरू झालें. " हो. हो. खून करूं तर काय ? गरीब गाय ! केवढी पण गरीब गाय ! जा घेऊन धिंडका. हवी आहे कुणाला इथें ! साखर वांटीन साखर!! ती गेली एकदां घरांतून तर. पण घरी नेऊन पोसायाची हवीना ताकद ! आई आजपर्यंत चुलतदिराच्या इथें तुकडे मोडीत होती ! तिथें गुण पाघळले तेव्हां दिली त्यानं घालवून ! आतां गेली भावाच्या इथें गिळायला ! अन् ह्मणे ' तूं हिला घेऊन चल. ' जा घेऊन. माझ्या पोराच्या पायाशीं पोरी लोळताहेत. अन् मी आतां त्याचं दुसरं लगीन करणार नाहीं का काय ह्मणतां ! जा—जा घेऊन—हं आतां कां थांबलां ? मग जाऊं द्या माझा बाबा तुरुंगांत समजलांत ? मोठी मोठी काळजी दाखवायला आले कालीजांतून धांवत ! ... "

**नाना**स असें झालें कीं, हा **गणपतराव** आतां जाईल तर बरा. त्याच्या म्हणण्याप्रमाणें जाणें शक्य नव्हतें. आपण गांवांत असून आपल्या मेहुण्याला सोडविण्याविषयीं कांहीं केलें नाहीं, उलट तेथें जाऊन भांडलों असें आईला कळलें, तर ती काय ह्मणेल ? हा विचार मनांत येऊन त्यानें **गणपतरावा**स " तूं आतां जा. मी काय तें करून येतों. आतां मुळींच इथें उभा राहूं नकोस. " असें हळूच म्हणून त्यानें एकट्यानें कॉलेजांत—निदान **विष्णुपंतां**च्या घरीं— जाण्याविषयीं आग्रह केला. **गणपतरावा**सही तें त्याचें ह्मणणें शेवटीं कबूल करावें लागलें. तो खरोखरच संतापला होता कीं, आपण येथें उभें राहणें म्हणजे गोष्टी भयंकर विकोपाला नेणें होय हें त्यानें

षके ध्यानांत आणलें आणि तेथून तो मुकाट्यानें **नानाच्या** सांगण्याप्रमाणें **विष्णुपंता**चे घरीं गेला.

**गणपतरावां**चें खरोखरीच त्या वेळी भान नाहींसें झालें होतें. आपण आलों कोणत्या उद्देशानें आणि केलें काय कांहीं सुद्धां त्याच्या ध्यानांत राहिलें नाही असें दिसलें. गोदावरीचा नवरा शुद्ध पशु आहे, हें त्याला यापूर्वीं केवळ ऐकून ठाऊक होतें, परंतु आज प्रत्यक्ष जेव्हां त्याची एकंदर कृति त्याच्या दृष्टीस पडली, तेव्हां त्या माणसाविषयीं—माणूस ! त्याला माणूस हा शब्द लावील कोण ?— त्या पशूविषयीं—पशू तरी बरे ! ते कधींही आपल्या स्त्रीजातीवर चाल करून जात नाहीत—त्याला विलक्षण तिरस्कार आला. खरोखर असा माणूस जर त्याला कोठें रस्त्यांत भेटता किंवा आणखी कोठें असें करतांना दृष्टीस पडता, तर आपण करतों आहोंत त्याच्यामुळें पुढे काय होईल, लोक काय म्हणतील याचा काडीमात्र विचार न करतां त्यानें पायांतला जोडा काढून त्याला शंभर लगावले असते; कधीं कमी केलें नसतें. पुढे काय होणार असेल तें पाहून घेतां येईल. या वेळेसही त्यानें त्या नरपशूलाही त्याची आई जर तितक्यांत न येती, तर हात दाखविला असता, कधीं सोडला नसता.

---

# प्रकरण १६ वें.

## विष्णुपंताचे घरीं.

**नानानें** ' जा ' असें म्हटल्याबरोबर त्याला असें झालें की, या महारवाड्यांत एक क्षणमात्र राहूं नये. चालतेंच व्हावें आणि तो तावडतोब बाहेर पडला. त्याचें मन या वेळीं किती विलक्षण झालें होतें ! डोळे असून त्याला कांहीं दिसत नव्हतें. रस्त्यांतून चालला असतांना आजूबाजूचे लोक काय बोलताहेत किंवा काय करताहेत-कांहीं सुद्धां त्याला ठाऊक नव्हतें. आपण रस्त्यानें चाललों आहोंत कीं कोठें बसलों आहोंत, याचें सुद्धां स्मरण त्याला नव्हतें. तो त्या नरपशूला शिव्याशाप देत होता. गोदावरीची ती करुणमूर्ति त्याच्या डोळ्यांपुढें उभी असून " पहा हो माझी स्थिति ! अशा अत्यंत वाईट स्थितींत मी असून तुम्हांला दोघांना कांहीं सुद्धां माझी दया येत

नाहींना ? मला यांतून तुझी सोडवीत नाहीना ? माझा जन्म यांच्याबरोबर असाच जायचाना ? " असें स्पष्टपणें म्हणते आहे व एकसारखी रडते आहे, असा त्याला भास होत होता. आणि तो भास एकसारखा कायम असून तो रस्त्यानें चालला होता. त्याला दिसत होतें, तें तें, ऐकूं येत होतें तें तेंच. संताप, खेद, दया, निराशा इत्यादि विकारांनी आळीपाळीनें त्याचा चेहरा आपल्या ताब्यांत घेण्याचें योजिलें होतें, एका आठीमागून एक त्या त्या विकारांची छाया त्याच्या चेहऱ्यावर दिसे, मध्येंच एक वेळां त्याच्या मनांत असा विचार आला कीं, लहानपणीं आपल्या लग्नाचे वेळी आपल्या वडि-लांनीं काशीनाथपंताजवळ गोष्ट काढल्याप्रमाणें जर त्यांनीं कबूल केलें असतें, तर आज हें गोदावरीसारखें रत्न आपल्याला मिळून आपण व ती किती सुखी झालो असतों ! परंतु आपण सुखी झालों असतों या विचारापेक्षां ती सुखी झाली असती, हाच विचार विशेष प्रबळ होता. कारण तो, विवाहा-संबंधानें आपण सुखी नाहीं असें कधींही समजत नसे. कधी तशी कल्प-नाही त्याच्या मनांत आली नव्हती. गोदावरी आपल्याला सून मिळाल्यावर ठीक होईल असें वाटून त्याच्या बापानें एकदां तसे उद्गार तिच्या चुलत्या-जवळ काढले होते, एवढ्यावरूनच त्याला तें आठवून— व त्याच्या आधीं अगदीं लहानपणीं बायकाबायकांत ही तुझी बायको, हा तुझा नवरा, ही आमची सून वगैरे उद्गार निघत तेही त्याच्या ध्यानांत या वेळीं येऊन वरील विचार त्याच्या मनांत अचानक आले. आणि तसे विचार एकदां मनांत आले म्हणजे मग त्याचें मन कोणत्या अवस्थेला जाईल आणि कोणत्या नाहीं, याचा नेम नसे. त्याप्रमाणें या वेळींही त्याचे विचार हवेतसे भकले. मग त्यांना शेंडाबुडखा कांहींएक राहिला नाहीं. या वेळी कित्येक विचार तर त्याच्या मनांत असे आले कीं, ते जर मनाच्या सुस्थितींत येते, तर त्यांच्या अद्वातद्वापणाबद्दल त्याचें त्यालाच हंसूं आल्याखेरीज रहातेंना. त्यानें **नाना**ला कुचकामाचा भाऊ असें तर किती-कदां म्हटलें असेल. आपण त्याच्याजागी असतों तर फार निराळ्या तऱ्हेनें वागलों असतों, बेहेत्तर आहे बहीण घरीं ठेवावी लागली असती तरी, पण याउपर तिला त्या चांडाळाच्या घरीं एक क्षणभरसुद्धां ठेविली नसती. **नाना**ला दयेमायेचें कांहीं नाहींच. तो फार थंड. त्याला सर्व गोष्टी तशाच असें वाटावयाचें—काय झालें तिला घरीं आणून ठेवायला असे विचार त्याच्या मनांत आले ! परंतु **नाना**चें घर आहे कोठें ! हा विचार त्याच्या मनांत उद्भवला नाहीं. बाकी तो उद्भवता, तरी त्यानें आपलें घर किंवा

विष्णुपंताचे घर तेच **नाना**चें घर असें म्हणून वेळ मारली असती यांत शंका नाही. पण आपण म्हणतों हें **नाना**च्या सध्यांच्या स्थितींत किती संभवनीय, आणि किती नाही, याचा विचार करतो कोण ! कांही चिंता नाहीं. आज नाहीं पण चार दिवसांनी असें केलेंच पाहिजे आणि तसें आपण **नाना**कडून करवूंही, असेंही त्यानें मनांत म्हटलें ! आतां त्याच्या मनांत एकंदर काय काय विचार आले, हें सांगणें मोठें कठीण आहे, तेव्हां वर थोडेसे निर्दिष्ट केले आहेत व **गणपतरावा**च्या कल्पनामय स्वभावाची आजपर्यंत वाचकांना पुष्कळ ओळखही झाली आहे, म्हणून तें काम त्यांजवरच सोंपवून पुढें चालूं.

**गणपतराव** त्याप्रमाणें विचार करतां करतां विष्णुपंताच्या घरापाशी आला. तो आला खरा, पण रस्त्यानें आपण न चुकतां आलों कसें, याचें त्यालाच पुढें आश्चर्य वाटलें. विष्णुपंत ते दिवशी घरींच होते. आदले दिवशीं नारोपंत व राधाबाई कुठल्याशा गांवाला जाणार होती, त्यासाठीं गांवांत आल्यामुळें, ते दहा वाजतां जेवून मग जाणार होते. त्याप्रमाणें ते जेवून खाऊन तयार झाले होते. चारपांच मिनिटांनीं **गणपतराव** येता, तर खास त्यांची दोघांची चुकामूक पडती. ते नुकतेच आपल्या खोलीत जाऊन विडा खाऊन बसावयाच्या खोलीत येत होते, इतक्यांत **गणपतराव** त्यांच्यापुढें उभा राहिला. त्याला पहाण्याबरोबर त्यांना फारच आश्चर्य वाटलें, आणि चेहरा असा सखेद, व विचारमग्न पहाण्याबरोबर ते फारच बुचकळ्यांत पडून त्यांनीं “ हें काय ? तुम्ही कुणीकडे यावेळीं ! ” असें विचारिलें. **गणपतरावा**नें बसा म्हणजे सांगतों असें म्हणून दोघेही बसल्यावर त्यानें त्यांना इत्थंभूत हकीकत सांगितली. त्याबरोबर विष्णुपंतानीं “ तर मग रुपये घेऊन जाऊं का मी ? ” असें एकदम विचारलें व ते पुढें म्हणाले, “ हें हो काय ? इतक्या भानगडींत कशाला पडलां ! जातांनाच इथून रुपये घेऊन नसतों गेलों आपण सारे ? इकडे कां नाहीं आलां आधीं ? ए: अशा माणसाची खोडकी मोडायचा हा प्रसंगच नव्हे. अहो ते काय राजश्री ! तुरुंगांत देखील जायला मागें घ्यायचे नाहींत अशा वेळीं. त्याला युक्ति एवढीच कीं, मुकाट्यानं रुपये देऊन त्या माणसाला गप्प करायचा आणखी मग याच्या पाठीमागें कांहीं तरी लकडा लावयाचा ...... पण तें जाऊं द्या. मग **नाना** काय करताहेत तिथें ? ”

**गणपतराव**:— **नाना** काय करताहेत ! बसले आहेत त्यांच्याशीं झगडा घालीत. दुसरं काय करताहेत ! अशा हरामखोराला तुरुंगच दाखविला पाहिजे

हो—तुम्हीं कांहीं म्हणा—काय निर्लज्ज! अहो, धडधडीत लेकानं चोरी केली, दोन तीन दिवसांत नाचबैठका करून पन्नास रुपयांचा फडशा उडविलान्. वसि पंचवीस रुपयांचा कोरा करकरीत रेशमी जरीचा रुमाल डोक्याला बांधून बसला आहे, आणखी नाकबूल जातो. इतकंच नाहीं, पण ज्याचे रुपये चोरलेन् त्याला, आम्हांला, बापाला शिव्या देतो. मला त्याचं दिखील इतकं वाईट वाटलं नाहीं. हो, पण बायको रडत होती तिच्या अंगावर, ' नवऱ्याचं मढं बाहेर काढताहेत म्हणून रडतेसका काय ? ' म्हणून दांत-ओंठ खाऊन मांग तिच्या अंगावर धांवत होता ! तें पाहण्याबरोबर धांवलोंच होतों मी त्याची हड्डी नरम करायला, पण ती अवदसा त्याची आई तितक्यांत आंत येऊन तिनं नुसती शिव्यांचीन् आरडण्याची कमाल केली. छे. छे. छे. असल्या लोकांना एकदम उचलावं आणखी सुळावर चढवावं. ती पोरगी फार दिवस जगत नाहीं मी तुम्हांला सांगतों.—माझा तर असा पक्का समज आहे कीं, एक तिला त्याच्यापासून दूर ठेवली तर ठीक होईल; की एक ती मेली तर सुटेल. पहिलं तर कांहीं लवकर होईलसं दिसत नाही. काय आतां त्या गरीब गाईनं करावं बरं ! एखाद दिवशी तो चांडाळ तिचा खून करणार ! मी सांगतों अगदीं पक्कं ध्यानांत ठेवा. त्या हरामखोराला एक दिवस एकीकडे गांठून खूप चोपावा तर आला वठणीला तर कुणाला ठाऊक ? बाकी तो माणूस आतां म्हणजे सुधारेल ही आशाच नको. ”

याप्रमाणें **गणपतरावाची** संतापलेली जीभ एकसारखी चाललेली होती. **विष्णुपंतांना** त्याचा स्वभाव ठाऊक कीं, अशासंबंधानें स्वारी बोलूं लागली म्हणजे मध्यें दुसऱ्या कोणी कांहीं न बोलतां त्याचें त्याला बोलूं द्यावें. कां, की हे असें कांही बोलण्याचें कारण असलें म्हणजे **गणपतराव** नुसता संतापानें वेडा होत असे. मधें कुणाला कांहीं बोलूं द्यावयाचाच नाहीं. वरील प्रकारानें बोलतां बोलतां तो पुढें म्हणतो: “ मी जें केव्हां केव्हां म्हणत असतों कीं नाहीं अशा बायकांची असल्या नवऱ्यापासून सुटका होण्याला कांही तरी मार्ग पाहिजे म्हणून तें एवढ्यासाठी, आज या गोदावरीला कांहीं म्हणतां कांही तरी गत्यंतर आहे का ? एक तो मेला तर ही सुटणार, नाहीं तर ही स्वतः मेली तर सुटणार. भावानं घरीं आणून ठेवली, तरी होणार काय त्याच्यापासून ? कोर्टांत फिर्याद आणली म्हणजे “ विवाहाचा हक्क ” बजावायला कोर्ट तयार आहेच. मी म्हणतों कांहीं होवो, पण त्याच्यापासून तिला दूर करावीच, कर फिर्यादी लेंका, मग पाहूं काय होतं आहे ते. काय हो ! तुम्हाला कसं वाटतं ? ”

हा प्रश्न त्यानें **विष्णुपंताला** उद्देशून केला व त्याचें ते कांहीं उत्तर देणार तोंच **नाना** तेथें आला. त्याला पाहण्याबरोबर दोघांनींही एकदम " काय हो ! काय झालं ? " असा मोठ्या उत्कंठेनें प्रश्न केला. तेव्हां व्हायचंय् काय ? "आम्हांला दोघां मायलेकरांनीं शिव्या देऊन घालवून लावलं तिथून— ही या स्वारींची कृति ! त्याला मारायला उठले ! " **नाना** आणखी कांहीं पुढे बोलणार तोंच **गणपतराव** आरडून म्हणतो, " अलबत् मारलं नाहीं हें त्याचं नशीब समज. नाहीं तर त्याला चांगलाच आज लोळवला असता. हरामखोर ! पाजी, काय ? तो गंधी त्याला तुरुंगांत नेतो आहेना ? नेऊं दे ! नेऊं दे ! त्याची खोडकी मोडायला दुसरा मार्गच नाहीं. त्याला एकदां तुरुंगांत जाऊन येऊं दे म्हणजे मग तो जागा झाला तर होईल. मी जाऊन त्या गंध्याला भर देतों फरासखान्यांत जाण्याची, म्हणजे तरी चार सहा महिने त्या बिचाऱ्या **गोदूताई**ला त्रास होणार नाही.

**नानाः**— मेहेरबानी करा, महाराज तिथें आमच्याबरोबर येऊन लावलीत आग तेवढी पुरे झाली. आणखी आतां त्या गंध्याकडे जायला नको.— अन् त्याच्याकडे आतां जाऊन काय उपयोग ! त्या आईनं आपल्या पाटल्या काढून त्याला गहाण टाकून रुपये द्यायला सांगितलं. मीं पुष्कळ त्यांना सांगितलं तुम्ही असं करूं नका, रुपये देण्याबद्दल काळजी नाही. पण ऐकतो कोण ? जी जी ती **बाई** माझ्या अंगावर आली आहे व खेंकसून म्हणतेः 'पुरे पुरे तुमचा मानभावीपणा. सोडवायला म्हणून आले आणखी मारायला उठले. जवळ नाही कवडी आणखी दिमाख लाख रुपयांचा. चालते व्हा तुम्ही इथून. पुनः माझ्या उंबऱ्यांत पाऊल घातलं, कीं, पहा काय करीन तें. माझ्या बाबावर नसतीं कुभांडं रचवून पुनः सोडवायला म्हणून येऊन वर त्याला मारायचा तुमचा बेत होता नाहीं का ! ' अरे बापरे ! त्या बाईनं नुसता तोफखाना सुरू केला होता. मीं शेवटीं आपलं विठ्ठलभटजींना विचारलं कीं रुपये आणून देऊं का— दागिना कशाला गहाण टाकतां ? तें तिनं ऐकलं आणखी मग फारच चवताळलीन् एकेरीवर आली. ' चालता हो म्हटलंना माझ्या घरांतून ? तुझ्या पैशानं मी आपल्या बाबाला सोडवायला मला अजून भीक नाहीं लागली समजलास ? अन् त्यानं काय केलं आहे ? त्याच्यावर या चांडाळानं खोटं बालंट आणलं आहेन् म्हणून ना ? पण त्याचं पाहून घेईन, असा एकसारखा तिचा भडिमार चालला होता.

शेवटीं मी तिथून निघालों. आतां त्या पोरीला काय करतील आणखी काय नाहीं याचा कांहीं सुमार नाही. काय आतां करावं अशा वेळीं ? नाहीं आपल्याला घर, नाही दार. करायचं कसं !

हे उद्गार **नाना**च्याच तोंडून निघाले काय ? असें **गणपतरावा**ला वाटून तो थोडासा चकित झाल्यासारखा दिसला. **नाना**ला आणि आपल्या बहिणीबद्दल असें कांहीं वाटत असेल असें **गणपतरावा**ला फारसें वाटतच नसे. त्याला स्वतःला त्याबद्दल कांहीं वाटलें म्हणजे तो तें सर्व जसें बोलून दाखवी, तसें **नाना** करीत नसे. यामुळें **नाना**चें अंतःकरण आपल्याइतकें कोंवळें नाहीं, त्याला आपल्या बहिणीच्या स्थितीबद्दल वाईट वाटत असेल, परंतु तें आपल्याइतकें नाहीं, असा त्याचा ग्रह होऊन चुकला होता. स्वतः अत्यंत विकारवश असा तो, त्याला **नाना**च्या विचारीपणाची परीक्षा नव्हती. परंतु मागें एकदां मीं सांगितलेंच आहे कीं, **नाना** कितीही विचारी, घिम्मा व शांत असला, तरी तो मनुष्यच असल्यामुळें अति झालें म्हणजे त्याचेंही मन केव्हां केव्हां फार दुःखित होऊन त्याला कांहीं सुचेनासें होत असे. आज तर कित्येक गोष्टी त्यानें प्रत्यक्ष पाहिल्या. आजपर्यंत फक्त दुसऱ्यानें येऊन सांगावयाचें, आणि यानें तें ऐकून त्याबद्दल हळहळत बसावयाचें असें होतें; परंतु आज सर्व गोष्टी अनुभवाला आल्यामुळें त्याला स्पष्ट असें दिसून आलें कीं, आजपर्यंतच्या ऐकीव गोष्टी वस्तुस्थितीपेक्षां कितीपट तरी कमी ! इतकी खात्री झाल्यावर मनुष्य कितीही धिमा असला तरी काय करणार ? तो जर प्रेमळ आहे, जर त्याच्या मनांतून दुःखोद्वेगादि विकारांचें समूळ निर्मूलन झालेलें नाहीं, तर क्षणमात्र तरी तो त्या विकाराच्या स्वाधीन होऊन ते विकार त्याला न जुमानतां एकदम उद्गारावाटे बाहेर पडणारच. या मानसिक नियमानुसार **नाना**च्या विवेकाला न जुमानतां त्याच्या मनांतील दुःखोद्वेगानें वरील शब्दांच्या द्वारें बाहेर उडी घेतली.

तें पाहण्याबरोबर **गणपतराव** थोडासा चकित झाला, हें वर सांगितलेंच आहे. तो नुसता चकित होऊनच राहिला नाहीं, तर **नाना**ला लागलीच टोंचणाऱ्या थट्टेच्या आवाजानें म्हणतो, " एकूण **नानासाहेब**, आपण आतां जागे झालां असं म्हणायचं. ठीक आहे. तरी बरं, लवकरच जागे झालां. मी म्हटलं कधीं होतां आहां का नाही. "

हें **गणपतरावा**चें बोलणें समयाला फार अनुचित होतें. परंतु तोंडाशीं आलें तें बोलावयाचें असा प्रकार पुष्कळदां त्याच्या ठिकाणीं अनुभवला

असल्यामुळे **नाना**ला तितकें वाईट वाटलें नाही. दुसरा एखादा असता, तर त्याला ते शब्द खास वाईट लागून परिणाम वेडावांकडा झाला असता. **गणपतरावा**चे ते शब्द **नाना**ला लागलेही. परंतु तो अगदी नेहमींच्या संथपणानें म्हणालाः " **गणपतराव**, तूं मला पशु का समजतोस, का राक्षस समजतोस, का समजतोस तरी कोण ? एकदां सांग. मला **गोदी**-विषयीं कांहीं वाटत नाहीं असं का तुला वाटतं ? असं जर खरोखर वाटत असेल तर मग तुला काय म्हणायचं आहे ? अरे, मला अतिशय वाईट वाटतं पण करायचं काय बोल ? मी असा अजून कॉलेजांत, आणखी आई मामाच्या घरीं; मग गोदीला आणून ठेवायची कुठें ? बोल. तूं म्हणशील मामाच्याच घरीं. तर तें कांही ठीक नाहीं. एक तर दोन माणसं पोसायची मामांची स्थिति नाहीं, आणखी कांहीं खटपट लटपट करून नेऊन ठेवलीच तर काय होणार ? हा नीच माणूस रोज बायकोला धाडा, धाडतां कीं नाहीं म्हणून त्यांच्या दारीं धरणं घेऊन बसून त्यांना साऱ्यांना छळायचा. आतां मामांनी आपला उद्योग पहावा, कीं त्याच्यापाठीमागें लागावं बरं ? असा छळ हे मांग जाऊन करतील कीं नाहीं याबद्दल तुला, मी म्हणजे कांहीं जास्त सांगायला पाहिजे असं नाहीं. "

**गणपतराव** मध्येंच कांहीं तरी बोलणार असा सुमार दिसला. त्यानें आपला हात पुढें करून ओंठ हालविले व " इकडे प..." इतकीं अक्षरें उच्चारलीं नाहीत तोंच **नाना** त्याला म्हणतो, " मी बोलतों तें ऐकून घे आधीं मग बोल तुला काय बोलायचं तें. तूं म्हणशील ' माझ्या इथें ठेव, नाहीं तर **विष्णुपंतां**च्या इथें ठेव. ' पण असं म्हणशील, तर मी तुला पुराच वेडा समजेन. कारण तू असं पहा, स्नेह तुझान् माझा खरा. पण तेवढ्यावरून तुझ्या माणसांना साऱ्यांना आवडेल का अशी वर्षं सहा महिने ती राहिलेली ? आणखी आईला तरी बरं वाटेल का अशी तिला ठेवलेली ? अन् पुनः तो तुमच्या तिथें येऊन तमाशा करायला सोडील की काय म्हणतां ! रोज येऊन तमाशा करायचा अन् मग **अण्णासाहेबां**नी त्याला पोलिसांत अडकावण्याच्या धमक्या घालायच्या, हेंच करीत बसायचंना ? यांच्या इथें ठेवायची तरी तेंच. अन् यांचा आमचा स्नेह आईला काय बरं ठाऊक ? ती कबूल व्हावी कशी आपल्या म्हणण्याला ? त्याला कांहीं आतां उपाय नाहीं. मी कॉलेज सोडून जेव्हां कांहीं उद्योग धरीन, तेव्हां तें सगळं कांही जुळेल. तोंपर्यंत हें असंच. आजपर्यंत लग्न

झाल्यापासून ती भोगतेच आहेना दुःख ? तशीच आणखी कांहीं दिवस भोगील. त्याला करणार काय ? तुला या गोष्टी समजत असून तूं हें असं कां बरं मला बोलत असतोस ? ”

याच्यापुढें **नाना**ला अगदीं बोलवेना. त्याला इतका गहिंवर दाटला कीं, तो खालीं पाहून आपल्या धोतरानें डोळे पुसूं लागला. **गोदावरी**च्या लहानपणापासून तिचे होत असलेले हाल, त्याबरोबर आपले हाल व सर्वांत आपल्या आईचे झालेले अतोनात हाल त्या वेळीं त्याच्या मनांत पूर्णपणें उभे राहून तो फारच खिन्न झाला. आंतून कड येऊं लागले. कदाचित् **नाना**ला इतका दुःखवेश झालेला आज कोणीही—**गणपतरावा**नें सुद्धां म्हटल्यास हरकत नाहीं—पहिल्या प्रथमच पाहिला असेल. **गणपतराव** तें पाहून अगदीं स्तब्ध बसला. सुस्कारा टाकण्याचें सुद्धां त्याला सुचेना. आपल्या या स्नेह्याविषयीं आपलें आजपर्यंतचें मत केवळ अन्याय्य होतें असा विचार त्याच्या मनांत आला आणि लागलीच त्यानें त्याप्रमाणें **नाना**ला बोलूनही दाखविलें.

“ **नाना**, मी चुकलों. तुझ्या मनाचा गंभीरपणा—खोलपणा आजपर्यंत मला समजला नाहीं. तुझी परीक्षाच मला झाली नाहीं. हें मी अगदीं स्पष्ट-पणें कबूल करतों. मला असं वाटत असे आजपर्यंत कीं, तूं म्हणजे आपला इतर लोकांप्रमाणें जरी नाहीं, तरी थोडाबहुत निष्प्रेम अंतःकरणाचाच असशील; परंतु आज मला सर्व समजून आलं. याउपर मी तुला कधीं दोष देणार नाहीं. एक वेळ मला क्षमा कर. मी माफी मागतों. ”

तुम्हीं **गोदावरी**च्या स्थितीबद्दल आतां जागे झालांतना ? हे शब्द जितके मनाला टोंचणाऱ्या अशा स्वरानें त्यानें उच्चारले होते तितकेच वरील शब्द, निंदेला अपात्र अशा मित्राची आपण व्यर्थ निंदा केली असें कळून आल्याबरोबर खरोखर वाईट वाटलें, पश्चात्ताप झाला, असें पूर्णपणें दाखविणारे होते. **गणपतराव** बोलेल त्यांत त्याचें खरें व पूर्ण अंतःकरण असावयाचेंच, यामुळें या वेळीं तोही सद्गदित कंठानेंच वरील शब्द बोलला; परंतु **नाना**नें त्याचे शेवटले शब्द ऐकतांच त्याला तितक्या त्या मनाच्या स्थितींतसुद्धां हंसूं आलें व तो लागलीच **विष्णुपंता**कडे वळून म्हणतोः— “ पोरांप्रमाणें खरोखर ज्याचं हृदय आहे असा पुरुष मला दाखवा, असं जर मला कोणी म्हणेल तर मी या आमच्या **गणपतरावा**-

कडे बोट दाखवीन. गृहस्थाला आंतबाहेर, मागेंपुढें कांहीं नाहींच. मन बद्-लल कीं लागलीच साफ सांगायचं. आतां पहाना ! मवाशी दोन शब्द बोलला काय, आणखी आतां म्हणतो माफी मागतों, क्षमा कर म्हणतो. आपण अशी कांहीं माफी कबूल करीत नाहीं बोआ. चांगली लेखी माफी मागावी आणखी तीही वर्तमानपत्रांतून—अन् मग पाहूं क्षमा करावी कीं नाहीं ती ! शुद्ध पोरासारखं मन आहे बाबा याचं. आणखी हा पुढें मोठ-मोठाल्या सुधारणेच्या गोष्टी करणार आहे ! धीर कसा तो गृहस्थाला काडी-इतका नाहीं.—कसं काय ? माफी मागतांना लेखी ? **विष्णुपंत**, द्याहो याला चार दस्ते कागद आणून ! ”

**विष्णुपंत** बिचारे इतका वेळ कांहींच बोलले नव्हते, ते आतां फक्त हंसले. **गणपतराव नाना**नें काढलेले ते थट्टेचे उद्गार ऐकून स्वस्थ बसला होता. इतक्यांत खालून भात होऊन तयारी झाल्याची वर्दी आली. त्या-बरोबर **गणपतराव** म्हणतो, “ म्हणजे आम्हाला जेवायचं आहे म्हणून कोणी सांगितलं तुम्हांला ? ”

**विष्णुपंत:**—मला तरी काय ठाऊक कोणीं सांगितलं तें ? मी तर हा तुमच्यापासून हाललोंसुद्धां नाहींना ?— पण तें कांहीं असो. तुम्हाला जेवायचं आहेना ? तयारी झाली आहे म्हणताहेत तर चला. तुमचं तरी काय जातं ?

**विष्णुपंत** आपण आल्यापासून येथून उठलेसुद्धां नाहींत. जेवणाखा-णाची गोष्ट निघाली नाहीं. असें असतांना तयारी झाली कशी ? याचें **नाना**स व **गणपतरावा**स—दोघांसही मोठें आश्चर्य वाटलें. त्यांतूनही खालीं जातात तों स्नानाबिनाला पाणीसुद्धां तयार केलेलें पाहून ते अचंब्यांत पडले. आणि “ तुम्हींच केव्हांतरी आम्हांला न कळत खालीं निरोप पाठ-विला ” असा आरोप त्यांनीं **विष्णुपंतावर** घातला. परंतु **विष्णुपंतां**नीं हंसत हंसत ‘ आपण खरोखर कांहींसुद्धां केलें नाहीं ’ असें म्हटलें. आणि तें त्यांचें म्हणणें अक्षरशः खरें होतें.

पुढें मंडळी जेवावयाला बसल्यावर जेवतां जेवतां त्याचसंबंधानें **गणपत-राव** म्हणतो, “ कोणी न सांगतां आमच्यासाठीं अशा सुंदर जेवणाची तयारी एकदम जेव्हां झाली तेव्हां कोणीतरी देवताच आमच्यावर प्रसन्न झाली असली पाहिजे !

त्याबरोबर, वाढण्यासाठीं पानाजवळ आलेल्या व तें **गणपतरावा**चें खुबीदार भाषण ऐकून गालांतल्या गालांत हंसणाऱ्या **लक्ष्मीबाईकडे** चोर-दृष्टीनें पहात **विष्णुपंत** हंसत म्हणतात, " असें दिसतें खरें बोआ. आणखी आमच्यावर तर तीच देवता अगदीं लहानपणापासूनच प्रसन्न आहे ! ती जर प्रसन्न नसती तर आज तुम्हाला उपासमार होतो. तुमच्या बोलण्याच्या भरांत, तुम्हीं जेवलां नसाल, याचें मला भानच नव्हतें. "

होय. **विष्णुपंत** जेऊन खाऊन कॉलेजांत जाण्यासाठी निघाले असतां त्यांना अमुक ठिकाणीं विडा करून ठेवला आहे तो घ्यावा असें सांगण्या-साठीं त्यांच्या खोलींत आलेल्या त्यांच्या गृहदेवतेनें, **गणपतरावां**नीं आपण कां आलों याची हकीकत **विष्णुपंता**स सांगितली ती ऐकली आणि तेवढ्यावरून तर्क बांधून तेथून लागलीच खालीं जाऊन तयारी केली.

परंतु हें कारण त्या वेळीं त्या तिघांपैकी एकासही तरकतां आलें नाहीं.

ते दिवशीं उशीर झाला असल्यामुळें दोनप्रहरीं मग मंडळीं कॉलेजांत गेली नाहीं. सकाळच्या घडलेल्या गोष्टीवरच नानातऱ्हेचीं बोलणीं निघून गप्पा मारण्यांत दोनप्रहरची वेळ गेली.

**नारोपंत व राधाबाई** येथें नसल्यामुळें **विष्णुपंता**सही आपल्या बायकोची व या आपल्या दोघां मित्रांची ओळख करून देण्यास ही संधी बरी आहे, असें वाटून त्यांनीं तिला आपण तिघे बसलों आहोंत तेथें येऊन बसण्या-विषयीं विचारलें. विचारानें जेवढी मनाची तयारी व्हावयाची तेवढी **लक्ष्मी-बाई**ची झाली असल्यामुळें, तिला **विष्णुपंता**च्या इच्छेप्रमाणें त्या विचा-राला आचाराचें स्वरूप देण्यास फारसें जड गेलें नाहीं. हे दोघे केव्हां केव्हां आले असतां आंतल्या खोलींत बसून यांच्या सर्व गोष्टी ऐकण्याचा व ते गेल्यानंतर, त्या गोष्टींविषयीं आपलें मत काय होतें तें **विष्णुपंता**पाशीं सांग-ण्याचा तिचा नेहमींचा क्रम असे. तिनें कांहीं मागून सांगितलें, व त्यांत कांहीं नवे-पणा असला म्हणजे **विष्णुपंत** तिला नेहमीं, " मघाशीं, त्यांच्या देखत कां नाहीं बोललां ? " असें म्हणे. यामुळें तिलाही पुष्कळ वाटे कीं आपण अशा बोललों तर कांहीं हरकत नाहीं. तिला वाटत असे इतकेंच नव्हे, परंतु ती त्याप्रमाणें म्हणे सुद्धां कीं, पुढल्या खेपेला ते आले म्हणजे मी अगदीं उघड बोलेन, आणखी बाहेर बसेन. परंतु ही पुढली खेप नेहमीं पुढलीच होई एवढेंच कायतें. त्यांतल्या त्यांत तिला थोडीशी आईबापांचीही लाज वाटे. वस्तुतः तीं दोघें त्यांना एक अवाक्षरसुद्धां बोलतींना.

परंतु **विष्णुपंतां**नीं आज संधि साधून तिला आग्रह केलाच. " पहा अं' मग म्हणतेस मला असं वाटतंन् तसं वाटतं. आतां खुशाल येऊन बसा इकडेन् काय वाटतं तें सांगा यांना. तुम्हांला ठाऊक आहे का, **गणपतराव**, आम्ही शनिवारीं इथें आलों म्हणजे, आठवड्यांतल्या सगळ्या वर्तमानपत्रांतल्या लेखांवर टीका होत असतात आमच्याजवळ ! आम्हांला मराठी वर्तमानपत्रं मुळींच वाचावीं लागत नाहींत. अशी प्रस्तावना केल्याबरोबर मग काय ! साहजिकच " उगीच आपली दुसऱ्यांच्या देखत अशी थट्टा करायची का ! " असे उद्गार लक्ष्मीबाईनीं काढले, आणि त्यावरून सुरुवात झालीच. पुढें गोदावरीच्या हकीकतीची व तिच्या नवऱ्याची गोष्ट निघाल्यावर तर स्त्रियांच्या स्वभावसिद्ध कळवळ्यानेंच लक्ष्मीबाई बोलूं लागल्या. होतां होतां पन्नास रुपयांचें कसें काय करावें ? रखमाबाईने आपल्या पाटल्या त्या वेळीं दिल्या तेव्हां आतां आपण स्वस्थ बसावें किंवा कसें करावें याबद्दल, **नाना**नें प्रश्न काढला. त्यावर **गणपतरावा**चें म्हणणें एक तऱ्हेचें, **विष्णुपंतां**चें म्हणणें निराळ्या तऱ्हेचें असें पडलें. शेवटीं **गणपतराव** हंसत हंसत म्हणतो, " हें पहा, असें नाहीं. लक्ष्मीवहिनी सांगतील तसें करावें, कारण अशा कामांत चतुर बायकांचीच मसलत मोठी उपयोगी पडते. "

त्याबरोबर **विष्णुपंत**ही " ठीक, ठीक बोललांत बोआ. मला देखील असंच वाटतं. मला कांहीं सुचेनासं झालं म्हणजे मी आपला इकडे सोंपवून देतों. खरंच कसं करावं हो ! "

हें बोलणें ऐकून व शेवटलें आपल्या नवऱ्याचें भाषण ऐकून लक्ष्मीबाई लाजून ' हें काय हें ! ' असें म्हणाली व त्यांनीं फारच आग्रह केला तेव्हां मग म्हणते: " तर मग मी म्हणतें असं कीं, रखमाबाई सकाळीं कांहीं जरी संतापांत म्हणाली असली, तरी ती भिक्षुकाची बायको, त्यांतल्या त्यांत ती जास्तच लोभी आहे; तेव्हां तिला प्रत्यक्ष पन्नास रुपये दिसले, म्हणजे आपल्या पाटल्या राखण्यासाठीं खास लोभ सुटेल. आणखी रुपये जर आज देऊन तिच्या पाटल्या राखल्या तर कांहीं दिवस तरी ती खुषींत राहील. नाहीं तर पाटल्या गेल्याचा संताप होऊन जास्तच प्रकरण चेतेल. तेवढ्याकरितां जाऊन रुपये तिच्यापुढें करावे. ती कांहीं टाकीत नाहीं खास ! आपले रुपये जातील खरे, पण थोडी तरी ती पुढें ओशाळली तर ओशाळेल. दुसरं काय ! "

हें म्हणणें साऱ्यांनाच मानवलें, आणि **नानानें** त्याप्रमाणें करावें असें ठरलें. नंतर आणखी अनेक गोष्टी होऊन संध्याकाळ होतांच **नाना एक-**

टाच ते रुपये घेऊन विठ्ठलभटजींच्या घरीं चालला. ‘ अडला नारायण गाढवाचे पाय धरी ’ या म्हणीचा अनुभव अक्षरशः आला.

विठ्ठलभटजींच्या दाराशीं जाऊन उंबऱ्यावर पाय ठेवतो तोंच कर्कशवाणीनें खेंकसून उच्चारलेले पुढील शब्द त्याच्या कानीं पडले व त्यामुळें तो तेथल्या तेथेंच थबकून उभा राहिला. गप्प बसाहो ! तुम्हींच सारे आमच्या संसाराचे भंडवडे मांडले आहेत. सारा चावटपणा आपलाच. तो पोर बिचारा— मी म्हणतें पोराची जात घेतले असतील रुपये. म्हणून त्याच्यावर पांघरूण घालायचं का आपणच शंख वाजवीत उठायचं. आज तो मेला नान्यान् तो गण्या आला होता, तेव्हां मला तुमचा असा संताप आला होता कीं वाटलं आतां काय करूं न् काय नाहीं. लागले त्यांच्याशीं हितगुज करायला ! कांहीं आहे का नाहीं अब्रू ! का गेली चुलीत ? आपण त्या पोराची बाजू नाहीं अशा वेळीं संभाळायची तर कुणीं संभाळायची ? कांहीं म्हणतां कांहीं नाहीं वाटलं तुम्हांला आपल्या पोरानं चोरी केलीन् हें कबूल करायला ? अन् तें कुणापाशीं ? या गधडीच्या भावापाशीं ? थूः साऱ्या जिनगानीवर....... ”

**नाना** पहिले पहिले शब्द ऐकूनच इतका चकित झाला कीं, त्याला तो उभा होता तेथून हलवेनाच. तो चित्रासारखा तटस्थ उभा राहून ते विजेप्रमाणें कडकड करून बिचाऱ्या विठ्ठलभटजींच्या डोक्यावर आदळणारे शब्द ऐकत होता. परंतु रखमाबाईचे ते शब्द—विशेषतः शेवटले शब्द—ऐकून विठ्ठलभटजी संतापानें उठून, “ आग लाव तुझ्या तोंडाला आणखी संसाराला.— मरो, जळो तो संसार ! आजपासून तुमच्या या घरांत राहील तो दोन बा.... ”

रखमाबाई त्यांचे शब्द खालीं कुठली पडूं द्यायला ! ती लागलीच म्हणते “ पुरे पुरे ! वेळेनावारीं असल्या भलत्यान् सलत्याच शपथा माझ्या घरांत वाहूं नका, सांगतें आहे. तुम्हांला जायचं असलं तर जा हवं तिथं. पण हें असलं वाईट बोलणं नाहीं माझ्या कामास पडायचं.— मला हें असलं “ मी बोआ होईन, मी बोआ होईन, ” हें बुजगावणं नको, समजलांत ? व्हा कसे चालते ! आहे कुठें मण्णांत जायला जागा ! जा. मी दिखील कंटाळलें आहें आतां या तुमच्या नित्य कटकटीला. जा. मग आम्ही चांगला स्वस्थपणानं संसार करूं. आणखी या अवदसेला घेऊन जा पाहिजे तर. बरी आहे चांगली सगळ्या कामाला... आहेच तुमचा पहिल्यापासून तिच्याकडे ओढा. मी आपल्या पोराचं चांगलं दुसरं लगीन करून घेईन ! ”

हीं शेवटलीं दोन तीन वाक्यें ऐकून **नाना**च्या अंगावर शहारे आले. " ही चांडाळीण अवदसा राक्षसीण आहे कीं माणूस आहे ! आहे तरी कोण ? " असें त्याला वाटून तो त्या पावली आंत घुसून **गोदावरी**ला घेऊन जावें इतका त्वेष त्याला आला आणि तो पुढें जाणार, तोंच—

" मर जळ. अवदसेच्या जिभेला हाड म्हणून कसें तें नाहींच. हा चाललों मीं. पहातों बरं आतां मष्णांत तरी जागा मिळते का नाहीं ती ! हें असलं भलभलतं बोलणं—" याच्यापुढें त्यांनीं एकसारखा शिव्यांचा भडिमार चालविला असता; परंतु त्राटिका बायकोच्या पुढें अगदीं निर्बळ अशा भिक्षुकाच्या शिव्या त्या. त्याला कांहीं ताळतंत्र थोडेंच आहे ! आणि त्या शिव्या देत देत ब्राह्मण तसा पाय आपटीत आपटीत उघडा बोडका घराच्या बाहेर पडला. **नाना**ला त्या वेळीं त्याची कींव येऊन तो त्यांस दारांतच म्हणतो: " मी आपल्याकडेच आलों होतों."या वेळीं **नाना**ला केवळ असें दाखववें लागलें कीं आपण हें पुढल्या दारांत पाऊल टाकून आंत आलों एवढेंच. कारण न जाणों ती अवदसा त्याच्या मागोमाग होतीच. ती " आमचीं बोलणीं बाहेर उभें राहून ऐकत होता " असें म्हणून आणखी तमाशा करायची ! परंतु एक टाळायला जावें तों एक होतें याची काय व्यवस्था ? " मी आपल्याकडेच आलों होतों " हे शब्द आंतून त्या त्राटि-केनें ऐकलेच. आणि लागलीच **नाना**चा शब्द ओळखुन बाहेर येऊन म्हणते: " कशाला ! त्यांच्याकडे कशाला आलांत ? माझ्याकडे या. रांडे-च्यांनो ! आतांशा पुरुषांना लाजा कशा त्या ठाऊकच नाहींशा झाल्या आहेत वाटतं ? सकाळीं ना तुला सांगितलं माझ्या उंबऱ्यांत पाऊल घालूं नकोस म्हणून ? "

**नाना**ला त्या बोलण्याचा अतिशय संताप आला. परंतु तितका गिळून तो मुकाट्यानें म्हणतो, " काय करूं ! बहिणीसाठीं हज्जारदां यावं लागतं." हे शब्द त्याच्या तोंडून अगदीं इच्छा नसतां बाहेर पडले. जें मनांत होतें, तें एकदम बाहेर पडलें, परंतु रखमाबाईला तेवढेंच पुरून ती ताबडतोब म्हणते, " मग जा घेऊन आणखी बसव कोणाच्या तरी घरीं. तिचा नवरा गेला तुरुंगांत ! आतां काय ! "

मनुष्य कितीही सहनशील झाला, तरी कित्येक वेळां अति आलें ह्मणजे त्याचा संताप माईनासा होऊन बाहेर तो पडतोच. त्यांतून विठ्ठलभटजी तर मूळचा तामसीच. रखमाबाईचे ते शेवटले शब्द ऐकून तो इतका संतापला

कीं तिच्या अंगावर धांवून, " चल नीघ आंत. नाहीं तर आज काठीनं तुझं डोकं फोडतों " असें आरडला. त्याबरोबर मग काय विचारतां ! रखमाबाईच्या अंगाला आग लागली. तिनें नुसता थयथयाट केला. " मारा. मारा. आतां या थेरडेपणांत तेवढेच सोपस्कार राहिले आहेत. हौस पुरवून घ्या एकदां. हं; अग बाईग ! काय माझे धिंड-वडे मांडले आहेत ! आतां मी कशाला या घरांत राहूं ? आतां मी जाणार. विहिरींत जीव देणार. सोयऱ्याधायऱ्यांच्या देखत माझा असा अपमान ? माराच तुम्ही आतां. मी तुमचा तमाशा पहातें. हं ! मारा ! "

असें आरडत ओरडत त्या अवदसेनें आंतल्या दारांत उंबरठ्याबाहेर फतकल मारली, आणखी हवे तें बडबडत, हातपाय किंवा डोकें आपटीत, आक्रोश चालविला. " मारा ! मारा ! आज तुम्ही मला माराच. आज तुम्ही माझं डोकं फोडाच. आज तुम्ही माझं मढं बाहेर काढाच. त्या-खेरीज मी तुम्हांला इथून हलूं द्यायची नाहीं. " असें एकसारखें चाललें होतें. तो आक्रोश आणि तें रडणें भेंकणें ऐकून रस्त्यावरले लोक दाराशीं जमा झाले. रखमाबाईनें विठ्ठलभटजींच्या धोतराचा सोगा धरला. तो तिला खास मारताही इतका संतापला होता. परंतु **नानानें** त्याला मागें ओढलें. घरांतलीं मालकाचीं व दुसऱ्या बिऱ्हाडांतलींही माणसें धांवून आलीं; आणि विठ्ठलभटजींच्या पंचाचा सोगा, सोडून 'तुम्ही आंत जा. हा रस्त्यावर असा तमाशा करूं नका ' म्हणून सर्व मंडळी रखमाबाईला परोपरीनें सांगूं लागली, परंतु ती एकाचेंही ऐकेना. " मारा. मला तेवढा एकदां संस्कार लागूं द्या. माझं एकदां मढं उलथूं द्या. म्हणजे सुटलांत. सोयऱ्याधायऱ्यांच्या देखत माझा असा अपमान ? आतां काय मला जगून करायचं आहे ! " असा किंवा अशाच अर्थाचा तिचा दुसरा कांहीं आक्रोश एकसारखा चालला होता. तीं कांहीं केल्या पंचाचा सोगा सोडीना. त्यांत त्या तामसी ब्राह्म-णाची वेड्यावांकड्या शिव्या देण्याचीही गर्दी चालू होती. इतक्यांत, इतक्या सगळ्याचें मूळ जे विनोबा तेही आले, आणखी मग जो त्या बाईनें आक्रांत केला आहे तो तर विचारूंच नये ! " अरे, माझं हे मढं पाडता-हेत. मग तूं मला उचलून ने. हं ! पाडा आतां मढं, घाला डोक्यांत काठी माझ्या अन् फोडा माझं डोकं ! बांधा माझी तिरडी. लावा मला गोंवऱ्यान् टाका मला जाळून. विन्या, अरे एकदां माझ्या नांवानं ठणाणा बोंबल म्हणजे यांना सुख होईल. अग बाईग ! अग आईग ! ......नाहीं मी

आतां सोडायची ! पाडा माझं मढं. टाका मला मारून. त्या अवदसेला सांगा माझा गळा कापायला...... " एक आणि दोन ! शेवटीं विनोबांनीं जाऊन तिच्या हातून तो सोगा सोडविला. **नानानें** व मंडळीनीं विठ्ठलभट-जींस तावडतोब बाहेर नेलें. आणि **विन्या** व इतर बायका मंडळींनीं **रखमाबाई**ची समजूत घालून आंत नेण्याची खटपट केली.

**नाना**ला बिचाऱ्याला असें झालें कीं, आपण या ठिकाणीं आलों कोठून! विठ्ठलभटजीला बाहेर आणलें, तों तो संतापानें " मी आतां जाणार. मी या घरांत अन्नग्रहण करीन तर हजार ** चा ! " अशा तऱ्हेच्या आणा व शपथा वाहूं लागला. उघडा बोडकाच रस्त्यानें धावूं लागला. कोणीं एकानें त्याचें पांघरावयाचें धोतर व पागोटें आंतून आणलें, तें कसें तरी त्याच्या अंगावर व डोक्यावर ठेवून **नानानें** त्याला हळूहळू बोलून शांत केलें आणि बुधवारांत आणलें. नंतर हलकेंच त्या गंध्याच्या रुपयांची गोष्ट काढली. त्याबरोबर म्हातारा आणखी संतापला आणि म्हणतो: " जाऊं द्या ! मरूं द्या * * ला ! बरं झालं तिनं आपल्या पाटल्या दिल्या आहेत. त्या करायच्या वेळीं नुसता प्राण घेतला होतान् तिनं. आतां आल्या कनई देणं ? त्या सकाळीच **गण्या**गंध्यानं नेल्यान्. चला त्याच्या दुकानावर जाऊन त्याला सांगूं टाक फुंकून न् घे आपले रुपये वसूल करून म्हणून. त्याच्याबद्दल मुळींसुद्धां आतां वाईट वाटायला नको. "

तें विठ्ठलभटजीचें बोलणें ऐकून **नाना** आपण आतां पुढें काय करावे याविषयीं बुचकळ्यांत पडला. रुपये आपण आणले आहेत हें तो अजून बोलला नव्हताच; आणि आतां त्या पाटल्या त्या अवदलेनें दिल्या आहेत असें ऐकतांच त्याच्याही मनांत असें आलें कीं, आतां आपण जास्त फाजीलपणा करूंच नये. आपण तरी दुसऱ्याचे उसनवारीनें रुपये आणले आहेत तेव्हां ते बचले तर बरेंच. असा विचार करीत करीत तो विठ्ठलभटजींबरोबर चालला होता, तों **विठ्ठलभट**जी मधेंच म्हणतो, " अरे हा आज गेला वाटतं कुठें ! गेला असेल शिंचा. जाऊं द्या कीं. जा तुम्ही आतां. तुम्हांला नको काळजी. तिनें दिल्या आहेत आपल्या पाटल्या त्या आतां विकल्या-सुद्धां असतील ? "

इतकें झाल्यावर **नाना** कशाला रहातो आहे ! पडत्या फळाची आज्ञा घेऊन—परंतु जातां जातां, तुम्हांला केव्हां जरूर लागलीच तर मला कळवा—असें बोलून तेथून चालता झाला.

*

# प्रकरण १७ वें.

## प्रेमाचें पत्र.

**गणपतराव** आपल्या खोलींत आपल्या टेबलाजवळ एकटाच होता. फार आनंदांत दिसला. त्याच्या चर्येवर कितीतरी उल्हास दिसत होता! त्याच्या पुढें एक चिताड चिताड लिहिलेलें पत्र होतें, तें तो तीन-तीनदां आपल्या हातीं घेऊन वारंवार वाची आणि पुन: तें त्याच्या पाकिटांत घाली. एकदां दोनदां त्या पत्राचें त्यानें चुंबन घेतलें, परंतु ही गोष्ट बोला-वयाची नव्हे. त्याच्या आनंदमयतेचें कारण तें पत्र असावें हें उघड दिसतें. एकंदर पत्र वीस ओळींच्या वर नव्हतें आणि दर ओळींत सात किंवा आठ अक्षरांपेक्षां अधिक अक्षरें नव्हतीं. त्यांत कित्येक अक्षरांवर डाग पडले होते, आणि कित्येक खोडलीं होतीं. इतकें स्वल्प पत्र असतांही **गणपतरावास** तें तीन तीनदां वाचण्याची जरूरी पडली, तेव्हां लिहिणारी व्यक्ति फार गहन आणि तिच्या लिहिण्याचा अर्थ फार खोल असा असला पाहिजे! त्याखेरीज त्याला तें पत्र इतक्यांदा वाचण्याची जरूरी काय होती! पुनः एकदां **गणपतरावा**नें तें पत्र पाकिटांतून काढलें आणि पुनः एकदां वाचलें. आपल्याशींच हंसला आणि पुन: तें पत्र त्यानें आपल्या ओंठा-जवळ नेलें. जणूं काय डोळ्यांनीं अक्षरें पाहून जो अर्थ त्यास लागला नाहीं तो ओंठांनीं त्या ओळींची रुचि घेऊन त्यास लागणार होता! पुनः त्यानें तें पत्र पाकिटांत घातलें आणि आपल्यापुढें ठेवलें. वा! पण हा काय चमत्कार! त्या पत्रावर पत्ता लिहिल्याचें अक्षर जें दिसतें आहे, तें त्याचें स्वत:चेंच! आपल्या हातानेंच आपला पत्ता लिहून त्यानें आपण आपल्यालाच तें पत्र पाठविलें होतें? आणि तें असें वेडेंवांकडे बालबोध अक्षर? वांकडयातिकडया ओळी? सतराशें डाग आणि न जाणों अठराशें चुकाही त्यांत असतील! असें पत्र आपणच लिहून आपणच वाचून —एकदां नाहीं, दोनदां नाहीं, पंचवीसदां वाचून— तीनतीनदां त्याचें चुंबन घेऊन इतकें आनंदी होण्याइतकी अहंता, इतकें वेड त्याला आलें कोठून! तें काय असेल तें असो! तें पत्र त्याला त्याच सकाळीं पोष्टांतून आलें. आणि तेव्हांपासून तो अगदीं आनंद, उल्हास, हास्य यांचें माहेरघर झाला

होता. दोन वेळां त्यानें **नाना**ला दाखविलें. **नाना**नें त्याबद्दल त्याची थट्टाही केली. परंतु त्या थट्टेनें त्याचा आनंद दुणावला. इतकें त्याच्या आनंदास कारण झालेलें पत्र आहे तरी काय, तें पहाण्याची उत्कंठा सर्वांस झाली असेल तेव्हां तें येथें देतों. अर्थातच अस्सल पत्रांतील डाग, वेडें-वांकडें अक्षर, वांकडयातिकडयाच्या ओळी या येथें हुबेहूब उतरून देणें शक्य नाहीं, याबद्दल आमचे वाचक क्षमा करतील.

॥ श्री ॥

माझे साटांग नमसकार. माझी प्रकुति बरी आहे. मामंजिची बरी आहे. सासूबाइची बरी आहे. पत्र लीहण्याला ऊशीर झला क्ष्यमा असावी. मला लीहतां येत नाहीं हें ठावूकच आहे. हसूं नवे. भावूजीला नमसकार. लक्षुमी-बाईला नमसकार सांगावे. मी पुण्यास गेल्यावर त्यांचि ओळख करून घेईन. माझी प्रर्कुति बरी आहे. आपलया प्रर्कुतिला जपत जाव. आता इकडे कधी याच. माझी प्रकुति बरी आहे. सगळ्यांची बरी आहे. आता जाते.

आपली पतनी,

सरस्वती.

**गणपतरावा**च्या उल्हासाचें कारण हें पत्र होय. ह्या पत्राच्या खालची सही पाहिली म्हणजे त्यास, या असल्या इतरांच्या दृष्टीनं वेडयावांगाड्या पत्रानेंही कां आनंद झाला हें सहज समजणार आहे. त्यानें त्या पत्राचें इतक्यांदा चुंबन कां घेतलें हेंही सहज ध्यानांत येणार आहे. कितीही वेडेंवांकडें असलें, तरी त्याला अत्यंत प्रियकर अशा अक्षरांचें तें पत्र अगदीं पहिलेंच होय. तेव्हां तें त्याला कुठें ठेऊं आणि कुठें न ठेऊं असें झालें असेल यांत नवल नाहीं. ज्या हातानें तें पत्र लिहिलें ते हात त्याच्या उत्तमार्धाचे होत. त्याच हातांच्या साहाय्यानें तो आपले अनेक बेत सिद्धीस नेणार होता. त्या हाताचें ग्रहण केल्या दिवसापासून त्या हातांविषयीं त्याला अत्यंत अभिमान वाटूं लागला होता. त्या हातांनींच आपल्या समाजांतील उलथापालथी करण्याचा त्याचा निश्चय. ते हात तितके करण्यास समर्थ आहेत कीं नाहींत याबद्दल त्यास केव्हांही अणुमात्र शंका आली नाहीं. आपल्या व त्या हातांच्या, त्याचप्रमाणें आपल्या मित्रांच्या व मित्रांनाही अत्यंत प्रिय असे जे तसेच नाजूक हात, त्या हातांच्या जोरावर त्याच्या सर्व इमारती होत्या. तेव्हां अशा हातांनीं प्रथमच लिहून पाठविलेलीं अक्षरें वाचून त्यास आनंद होईल यांत नवल काय ? किती दिवस तरी त्याला

अशी इच्छा होती कीं, आपल्या बायकोनें आपणास पत्र ल्याहावें. दर सुटींत घरीं गेला म्हणजे त्यानें तिच्या पाठीस लागावें कीं मला पत्र लिहीत जा. शेवटीं ती इच्छा सफल झाली. या पाठीस लागण्याचें चीज झालें. त्या पत्राचें उत्तर ल्याहावें असें फार फार त्याच्या मनांत आलें, आणि त्या भरांत त्यानें एक लांबलचक उत्तर लिहिलेंही. तें पुनः पुनः वाचून पाहिलें. जणूं काय परीक्षेचा कागदच लिहिला असून तो पुनः वाचतो आहे. त्यांत कांहीं कमीजास्ती केलें. या पत्रांतील एकंदर मजकूर उत्तेजनपर होता. आणि त्यांतही विशेष हें होतें कीं, त्यानें आपले हेतु काय, आपल्या इमारती काय, हे हेतु साध्य करण्याचे मार्ग कोणते, त्या इमारतींची रचना उत्तम होण्यास कसे कसे उद्योग केले पाहिजेत, त्यांत आपल्या बायकोनें आपणास किती मदत केली पाहिजे, वगैरे वगैरे अनेक विषय आणले होते. त्यानें तो एक लहानसा निबंधच लिहिला होता म्हटलें तरी चालेल. बायकोला पत्र म्हणून लिहिण्याचा त्याचा उद्देश, परंतु क्वचित् तिला न समजण्याजोगे शब्द व विचारही त्यांत आले होते ! तो आपल्या मनांतील विषयांवर बोलूं किंवा लिहूं लागला म्हणजे मग त्याला भान रहातच नसे, या त्याच्या विशेषास अनुसरूनच ते सर्व होते. तें पत्र पुरें करून लागलीच नानाकडे जाऊन त्यानें त्याला तें वाचण्यास सांगितलें. पत्र वाचून पाहून नाना हळूंच हंसला आणि म्हणतो, "एकूण हा निबंध, हा आपल्या पुढल्या आयुष्याचा 'प्रोग्राम' ( कर्तव्य–टिप्पणी ) सरस्वती वहिनीकडे पाठविणार आपण ! पण आधीं मला असं सांग, कीं तुला पत्र जसं इथें निर्विघ्नपणानं येऊन पोंचतं, तसं तिला पोंचेल का ? तिच्या नांवानें तुझं हें पत्र जाणार तें आधीं जाईल कोणाच्या हातीं? ते उघडून बिघडून जरी पाह्यचे नाहींत, तरी पण सुनेच्या नांवानं पत्र आलेलं पाहून सगळी घरांतली मंडळी म्हणतील काय ? हंसतील किती ? तुझ्या पत्रानं आनंद व्हायचा तो एकीकडेच राहून तिला किती ओशाळल्यासारखं होईल, याचा कांहीं विचार ?"

**गणपतराव:**— त्याचा विचार काय करायचा आहे ? असं केव्हां तरी एकदां झालंच पाहिजे. त्यांत काय झालं ? आम्ही कांहीं दुसऱ्या कोणाच्या बायकोला पत्र लिहीत नाहीं, लिहितों ते आपल्याच बायकोला. त्याबद्दल लोक कोण म्हणून आणखी काय म्हणून टीका करणार ? आणि त्यांनीं केली ह्मणून आम्हीं तरी काय म्हणून ऐकून घ्यावं ? आपण तर बोआ हें पत्र पाठवून देणार.

**नाना**:–पाठवा बोवा आपण, पण त्याचा विचार एवढाच करावयाचा कीं, आपल्या या करण्यापासून दुसऱ्याला आनंद व्हावा अशी इच्छा आहे कीं त्रास व्हावा अशी इच्छा आहे ? माझा अगदीं असा पक्का समज आहे कीं, यापासून सरस्वती वहिनाला आनंद होण्याचं एकीकडेच राहून त्रास मात्र फार होईल. किती जरी तुझ्या घरचीं माणसं चांगलीं असलीं तरी अगदींच नवीन अशी गोष्ट पाहिली ह्मणजे त्याबद्दल त्यांच्या मनाला चमत्कारिक वाटल्याखेरीज रहाणार नाहीं. आणि असं चमत्कारिक वाटलं, ह्मणजे सगळीं वडील माणसंच तीं, तीं थोडंबहुत तरी वेडंवांकडं, टोंचून खोंचून बोलल्याखेरीज रहाणार नाहींत. अर्थात्च तें पत्र आल्याबद्दलचा आनंद एकीकडेच राहून उलट सरस्वती वहिनी तुला शिव्या मात्र देईल, कीं यांच्या या नसत्या नादांत आपल्याला त्रास सोसावा लागतो. तूच ना मला परवां सांगितलंस गांवाहून आलास तेव्हां, कीं मीं पत्र लिहीन ह्मटलं तेव्हां ‘नको नको, मामंजींना पत्र येईल त्यावरून मला आपला समाचार कळेल, प्रत्यक्ष पत्र ल्याहायला नको’ असं तिनं म्हटलंन् म्हणून ? मग काय तर ? अन् आतां तुला जायला दिवस ते किती राहिले बाबा ? एक महिना सुद्धां राहिला नाहीं. तोंपर्यंत धीर धरला तर कांहीं हरकत नाहीं, समजलांत ? ठेवा तें पत्र आपल्या जवळच आतां. दुसऱ्याला त्रास होईल असं करूं नका.

**गणपतराव**:– एः ! तुझ्या बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तूं असाच दुसऱ्याच्या उत्साहावर पाणी ओतणारा. आपण देणार पत्र टपालांत टाकून.

**नाना**:– “ माझं ऐक तूं. आतां महिन्यानं तुला जायचंच आहे, तेव्हां स्वतःच वाचून दाखव आणि अर्थही समजावून सांग.” इतकें बोलून हंसला.

**गणपतरावानें** त्यावेळीं त्याला आपला रुकार दिला नाहीं. परंतु ते दिवशीं तें पत्र गेलें नाहीं. आपल्या खोलींत गेल्यानंतर त्याचा विचार बदलला. तथापि तो दिवस त्यास मोठ्या आनंदांत गेला. परीक्षेचे दिवस आतां अगदींच नजीक येत चालले होते. अर्थात्च या दोघांचे अभ्यासही फार जारीनें चालू होते. ते दिवशींच्या त्या पत्रानें व त्या पत्रामुळें मनांत उद्भवलेल्या विचारांनीं त्याचा उत्साह फार वाढला. तें पत्र ह्मणजे आपल्या भावी विचारांस कृतिस्वरूप देण्याचें एक आपल्या पत्नीचें अभिवचन त्याला वाटलें. तें पत्र त्यानंतर त्यानें कितीदां तरी वाचलें असेल !

---

# प्रकरण १८ वें.

## परीक्षेसाठीं मुंबईस.

**कांहींच** दिवस गेले. परीक्षेसाठीं मुंबईस जाण्याची तयारी झाली. नाना, विष्णुपंत व गणपतराव हे बरोबरच जाणार होते. विष्णुपंतांची परीक्षा आधीं होती, तरी त्यांच्या बरोबर या दोघांनींही जाण्याचा बेत केला. नाना व गणपतराव यांनीं विष्णुपंताच्या घरीं जेवून रात्रीं तिघांनींही गांवांतूनच जाण्याचा विचार केला. ते दोघे दोनप्रहरीच गांवांत गेले होते. गणपतरावास आपल्या सासुरवाडच्या मंडळीला भेटावयाचें होतें. नानास आपल्या बहिणीला जाऊन भेटावें अशी इच्छा होती, गणपतरावालाही तिला एकदां पहावें असें वाटतच होतें, परंतु दोघांनींही जावें किंवा नाहीं याबद्दल विचारच होता. नानाला तर तिच्या घरीं जाणें म्हणजे एक मोठें संकट वाटे, न जाणो, आपण गेलों असतां काय होईल आणि काय न होईल ! त्यांतून गणपतराव आपल्याबरोबर येणें मुळींच इष्ट नाहीं हें जाणून त्या राजश्रींना, त्यानें विष्णुपंताच्या देखत तसें स्पष्ट सांगितलेंही. दुपारचें जेवण जेवून मंडळी बसली असतां नाना त्यास म्हणाला, "माझी आई आपण आमच्याबरोबर कांहीं येऊं नका. तेथें आपण गेलां आणि कांहीं वेडें-वांकडें आपल्या दृष्टीस पडलें तर आपण काय डोक्यांत राख घालाल आणि काय नाहीं ? मी तिला आपला निरोप सांगेन."

**गणपतराव**:– मला तूं अगदीं मूर्ख समजतो आहेस कीं काय, नाना ? अरे, मी एक चकार शब्दसुद्धां बोलणार नाहीं मग तर झालेंना ?

**नाना**:– चकारशब्द बोलण्याचं कांहीं नाहीं बाबा, पण ती बाई तुला पाहिल्याबरोबर चवताळून अंगावर येईल. ते राजश्री असले, तर तेही त्याचप्रमाणें करतील आणखी मग आपलं डोकं ठिकाणावर राहणार नाहीं, आपणही कांहीं तरी विचित्र बोलाल त्यांत आणखी गोंदीबिंदी आपल्या दृष्टीस पडली, तर काय कराल याचा नेमच नाहीं. तेव्हां, मी जाऊन येतों, आणखी आपल्याला सगळी हकीकत सांगतों. तेवढ्यावर आपण संतुष्ट रहावं. समजलांत ? आपण मूर्ख नाहीं. चांगले वेडे आहां ह्मणून आपल्यासंबंधानं एवढी खबरदारी घ्यावी लागते. दुसरं काय ?

गणपतरावाला हें बोलणें किंचित् लागलेंसें दिसलें. तथापि तो कांहीं एक बोलला नाहीं. विष्णुपंतांनीं तें ताडलें. गोदावरीच्यासंबंधानें गणपतरावाच्या मनांत फारच कळकळ आहे आणि त्यामुळें त्याच्या मनांतून तिला पहावें, भेटावें व तिच्याशीं बोलावेंसें वाटत होतें, हें त्याला पक्कें ठाऊक होतें. वर दिलेलें नाना व गणपतराव यांच्यांत चाललेलें भाषण ऐकून त्यांच्या मनांत एक विचार आला. हा विचार थोडे दिवसांपूर्वीं मूळ त्यांच्या गृहदेवतेनेंच त्यांच्या जवळ बोलून दाखविला होता, परंतु तो अमलांत आणणें शक्य नाहीं असें वाटून त्या वेळीं तसाच राहिला. तो विचार हा कीं, लक्ष्मीबाईनें जाऊन रखमाबाईची ओळख करावी; आणि तिला खुलवून मधून मधून गोदावरीला आपल्या घरीं रहाण्याला म्हणून आणीत जावें. परंतु असें करूं गेल्यास आपल्यास यश येणें शक्य नाहीं, असें मनांत येऊन व त्यासंबंधानें नानाचा काय तो विचार घेऊन मगच काय तें करावें असें ठरून तें तितकेंच राहिलें. त्यानंतर विष्णुपंताची व नानाची गांठ पडली, नाहीं असें नाहीं; परंतु तें राहिलें तें राहिलेंच ! नाना व गणपतराव यांच्या या आतांच्या बोलण्यावरून तो विचार एकदम विष्णुपंतांच्या मनांत आला आणि त्याप्रमाणें लागलीच त्यांनीं बोलून दाखविला. त्याबरोबर गणपतरावानें एकदम उडीच मारली असें म्हटलें, तरी शोभेल. ते ताबडतोब म्हणतात, " वा ! छान छान ! आजच्या आज जमलं तर पहा ! आणखी माझी खात्री आहे, लक्ष्मीवहिनी जर स्वतः गेल्या तर ती बाई कांहीं नाहीं म्हणायची नाहीं. अवश्य जावं बोआ त्यांनीं. गोदी इथें येऊन आम्हांला भेटली म्हणजे मग आणखी काय पाहिजे ? जा, जा, म्हणावं त्यांना. पाहूं तर खरं बरं काय म्हणते ती ? चांगल्या दागदागिन्यांनीं लदून जा म्हणावं म्हणजे ती बाई अगदीं दिपून जाईल. खाशी युक्ति काढलीत बोआ तुम्हीं !

**विष्णुपंतः**— खाशी युक्ति खरी, पण ती सफळ होईल तेव्हांना त्या युक्तीचा उपयोग ? त्या बाईचं वर्णन जें मी तुमच्या तोंडून ऐकलं त्यावरून मला तर कांहीं वाटत नाहीं कीं ती बाई बोलावणं गेल्याबरोबर पाठवीलशी. दुसरं असं, कीं तिथें जाऊन पाठवा असं म्हणायला कारण काय सांगणार ?

**गणपतरावः**— एः ! कारण दुसरं काय सांगायचं ? कारण हेंच कीं, नाना आमच्या घरीं आला आहे. त्याला आतां इथून जायचं आहे मुंबईला परीक्षेला, तेव्हां आजचा दिवस बोलावलें आहे आमच्या इथें राह्यला; दुसरं हो आणखी कारण काय पाहिजे याच्यापेक्षां ?

**नाना**:—तें कांहीं जुळायचं नाहीं, तुम्हांला सांगतों. ती बाई म्हणजे शुद्ध त्राटिका आहे. ती वेडंवांकडं बोलून लक्ष्मीवहिनींचा विनाकारण उपमर्द मात्र करायची आणखी त्यांना असं होईल कीं, आपण कुठून या नसत्या भानगडींत पडलों.

**विष्णुपंत**:— नाहीं. नाहीं. त्याची नको तुम्हांला काळजी. असल्या उपमर्दाला न् बोलण्याला मुळींच ती जुमानणार नाहीं. तें नाहीं हो. ती तर फार उत्सुक आहे. नाहीं पाठवलं तर नाहीं, पण आपण यत्न तर करायला हरकत नाहीं. परवांच तिच्या मनांतून दोन चांगले मोठमोठाले खण घेऊन जावं आणखी ते दोघींना देऊन रखमाबाईला जरा खुलवून एकदोनदां जेवायचं आमंत्रण करून मग हळूच एखाददुसरा दिवस गोदूताईला राह्यला पाठवलं तर पहावं, असं होतं. पण तुम्हांला विचारलं नाहीं कांहीं नाहीं, एकदम आपण असं कसं करावं, असं वाटून तें तितकंच ठेवलं.

**गणपतराव**:— मी तुम्हांला सांगतों **विष्णुपंत**, तुम्ही आतां सांगितल्याप्रमाणें दोन खण घेऊन चांगल्या दागदागिन्यानं लढून अशा लक्ष्मीवहिनींना जाऊं द्या, त्या बाईनं जर गोदीला पाठवा असं म्हटल्याबरोबर घेऊन जा असं म्हटलं नाहीं, तर नांव बदलून ठेवीन.

( अपूर्ण. )

